# मऱ्हाटा पातशाह
(संशोधनात्मक)

**लेखक :** केतन कैलास पुरी

**न्यू ईरा पब्लिशिंग हाऊस**
३, वृंदावन अपार्टमेंट,
पु. ल. देशपांडे गार्डनसमोर,
सिंहगड रोड, पुणे – ४११०३०
फोन : ०२० २४२५२११४, ८७९८२०२०२०
**Email Id :** newerapublish@outlook.com
**Website :** www.newerapublish.com.
**ISBN :** 978-81-94782834



**मुखपृष्ठ : प्रमोद मोर्ती**

**अंतर्गत सजावट व मुद्रितशोधन :**
सौ. हेमलता थिटे–ढवळीकर

**प्रथमावृत्ती : १४ मे २०२१**
**द्वितीयावृत्ती : ६ जून २०२१**

**मूल्य : ३००/–**





'या हिंदुस्थानचं मर्दानी दैवत छत्रपती शिवाजी महाराज' असं म्हणत ज्यांनी आमच्यात इतिहासाची गोडी निर्माण केली, त्या थोर इतिहासतपस्वी, दुर्गमहर्षी स्व. श्री. प्रमोद मांडेसरांना माझी ही कलाकृती सस्नेह अर्पण...!

# लेखकाचे मनोगत

'छत्रपती शिवाजी महाराज' या तीन शब्दांभोवती महाराष्ट्रातील इतिहाससंशोधकांच्या तीन पिढ्यांचे विश्व फिरत आहे. शिवाजी महाराजांच्या चरित्रावर शेकडो ग्रंथांचे लिखाण झाले आहे. महाराष्ट्रात जन्म घेणाऱ्या प्रत्येकाला शिवाजी महाराजांच्या आयुष्यावर चार पानं तरी लिहिण्याचे स्वप्न असते. शिवरायांच्या चरित्रात नवनिर्मितीचा सार सामावलाय, त्याचेच हे प्रतीक आहे. माझ्यासारख्या सामान्य व्यक्तीला शिवचरित्राची एक अपरिचित बाजू मांडण्याची प्रेरणा यामधूनच मिळाली, असं म्हटलं तर ते चुकीचे ठरणार नाही.

या पुस्तकाचा पाया रचला गेला तो २२ डिसेंबर २०१९ रोजी. उस्मानाबाद शहरात होणाऱ्या साहित्य संमेलनात शिवरायांच्या चित्रांविषयी माहिती देणारी छोटीशी पुस्तिका प्रकाशित करण्याचा मालोजीराव जगदाळे आणि माझा मानस होता, पण काही तांत्रिक अडचणींमुळे हा विषय रखडला. ही पुस्तिका फार फार तर २५-३० पानांची झाली असती, त्यामुळे आम्हीसुद्धा या विषयाचा पुनर्विचार केला नाही. मध्यंतरी कोरोना महामारीमुळे संपूर्ण देश 'टाळेबंदी'त अडकला. या रिकाम्या वेळेचा फायदा पुस्तकाचे लिखाण करण्यासाठी झाला.

रशिया, जर्मनी, फ्रान्स, लंडन, व्हेनिस यांसारख्या परदेशांतील ठिकाणांवरून शिवाजी महाराजांच्या चित्रांवर झालेले संशोधन या काळात आम्हाला उपलब्ध झाले. एकेका चित्रावर दोन-तीन शोधनिबंध, काही संशोधकीय मासिके, काही समकालीन नोंदी अशी माहिती मिळत गेली. मराठी भाषेतील साधनांपेक्षा इंग्रजी साधने विपुल प्रमाणात आणि अगदी सहजपणे उपलब्ध झाली. काही सन्माननीय अपवाद वगळता या विषयाकडे महाराष्ट्रातल्या इतिहास संशोधक-अभ्यासकांनी दुर्लक्ष केले. मराठ्यांच्या इतिहासाचे भीष्माचार्य म्हणवले जाणारे 'वा. सी. बेंद्रे', प्रा.ग.ह. खरे, द. वि. काळे, डॉ. बाळकृष्ण, द. बा. पारसनीस, य. न. केळकर या संशोधकांनी शिवाजी महाराजांच्या अनेक चित्रांवर प्रकाश टाकण्याचे काम केले आहे. अगदी अलीकडच्या काळात डॉ. अजित पटवर्धन आणि मालोजीराव जगदाळे या दोघांनी शिवाजी महाराजांच्या काही अप्रकाशित आणि समकालीन चित्रांविषयी ससंदर्भ मांडणी केली आहे. ही मोजकी नावे सोडल्यास इतर कुणीही या विषयाकडे लक्ष दिलं नाही.

६ जून १६७४ रोजी झालेल्या राज्याभिषेकानंतर शिवाजी महाराजांनी कर्नाटकवर

स्वारी केली. या स्वारीमध्ये शिवाजी महाराजांच्या संपर्कात अनेक चित्रकार आले. त्यातील काही डच राजदूतांच्या हाताखाली काम करत होते. 'हर्बर्ट डी यागर' नावाचा डच राजदूत भारतात कार्यरत होता. काही व्यापारी सवलतींसाठी शिवाजी महाराजांना भेटायला आलेल्या हर्बर्ट डी यागरने शिवाजी महाराजांचे चित्र तयार करवून घेतले. केवळ शिवाजी महाराजांचेच नाही, तर मराठ्यांच्या दरबारातील इतर काही महत्त्वाच्या अधिकाऱ्यांचीही चित्रे त्याने काढल्याची नोंद आढळून आली. एवढेच कशाला, शिवाजी महाराजांनी आपल्या पदरी काही चित्रकार सुद्धा ठेवून घेतले होते, असे यागर म्हणतो. शिवाजी महाराजांच्या पदरी कोणताही चित्रकार नव्हता, हा गैरसमज या नवीन माहितीमुळे नक्कीच दूर होईल, असे वाटते. डी यागर शिवाजी महाराजांना भेटला होता. या भेटीबाबत केवळ प्रा. खरे सोडल्यास इतर कुणीही दाखल घेतल्याचे दिसून येत नाही. शिवाजी महाराजांच्या कपड्यांचे, सुवर्णजडीत मोजडीचे, मनसदीचे, शामियान्याचे एवढे सखोल वर्णन इतर कोणत्याही समकालीन कागदपत्रांत वर्णिले नाही. शिवाजी महाराजांच्या तलवारीविषयी अनेक ऐतिहासिक साधने सविस्तर चर्चा करतात. इंद्रजीत सावंत सरांच्या 'शोध भवानी तलवारीचा' या पुस्तकात सर्व माहिती आलेलीच आहे. पण, महाराजांच्या तलवारीची म्यान कशी असावी, याचे ओझरते वर्णन यागर करतो. माझ्या माहितीप्रमाणे शिवरायांच्या तलवारीची म्यान कशी होती, याची माहिती देणारी ही एकमेव नोंद असावी, यामुळेच यागरची भेट आणि त्याचा वृत्तांत मराठ्यांच्या इतिहाससंशोधनात मैलाचा दगड ठरेल.

निकोलाओ मनूची हा मध्ययुगीन कालखंडात भारतामध्ये येऊन गेलेला एक परकीय प्रवासी. मनूचीने लिहिलेल्या पुस्तकामधून मुघलकालीन भारताचे वास्तव चित्रण आपल्या नजरेसमोर उभे राहते. मनूचीने सुद्धा शिवाजी महाराजांचे एक चित्र काढून घेतले होते. आजवर ते चित्र 'मीर महंमद' ने काढल्याचं आपण वाचत-ऐकत आलो आहोत. पण, Pauline Lunsingh Scheurleer आणि Gijs Kruijtzer यांच्या संशोधनानुसार हा दावा फेटाळला गेला. मीर महंमद हा चित्रकारच नव्हता, तर त्याने शिवाजी महाराजांचे चित्र काढण्याचा प्रश्न येतोच कुठून? पुढे Gijs Kruijtzer यांनी आपल्या एका शोध निबंधात या चित्राविषयी सविस्तर चर्चा करून या चित्राचे निर्माते हे डच राजदूतांच्या हाताखाली काम करणारे चित्रकार होते, हे सप्रमाण सिद्ध केले. यामुळे 'मीर महंमद' विषयी जे काही आपण वाचले, ते या नवीन संशोधनामुळे नक्कीच मागे पडेल अशी खात्री आहे.

शिवाजी महाराजांची चित्रे आज जगभर विखुरलेली आहेत. रशिया, जर्मनी, लंडन,

फ्रान्स, नेदरलँड्स या देशामध्ये शिवाजी महाराजांची चित्रे पाहायला मिळतात. ही सर्व चित्रे समकालीन आहेत हे विशेष. महाराजांच्या चित्रांना जगभर पोहोचवण्यात निकोलस विटसेन कसा कारणीभूत ठरला, याविषयी सविस्तर चर्चा या पुस्तकात केली आहे. चित्रांचा मागोवा घेताना मला मालोजीरावांची प्रचंड मदत झाली. रिक्सम्युजियम, गिमे म्युजियम, बर्लिन आणि लेनिनग्राड येथील राष्ट्रीय ग्रंथागार इ. ठिकाणी मेल करून या चित्रांविषयी माहिती जमा केली. तसेच, GijsKruijtzer यांच्याशी मेलद्वारे संपर्क साधून शिवाजी महाराजांच्या चित्राविषयी चर्चा करण्याची संधी मला उपलब्ध झाली. एक परकीय व्यक्ती शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीचा अभ्यास करताना अनेक डच साधनांचा अभ्यास करून संशोधकीय लिखाण प्रसिद्ध करते, ही प्रचंड कौतुकाची गोष्ट वाटत होती. याच कुतूहलापोटी Gijs यांच्याशी संपर्क साधला. त्यांच्याकडून काही माहिती मिळाली जी या पुस्तकासाठी उपयुक्त ठरली. जगभरातील अनेक संग्रहालयांनी शिवरायांचे चित्र कुणी काढले, संग्रहालयात कुठून आले, एखाद्या विशिष्ट अल्बममध्ये त्या चित्रांचा का समावेश झाला, त्यांचा कॅटलॉग क्रमांक काय अशा अनेक प्रश्नांची उत्तरे तत्परतेने दिली. या माहितीसाठी अथवा दुर्मिळ चित्रांच्या छायाप्रतीसाठी यांच्यापैकी कुणीच कोणताही मोबदला अथवा आढेवेढे घेतले नाहीत हे विशेष. भारत इतिहास संशोधन मंडळात संशोधक श्री. अजित पटवर्धन यांनी केलेल्या शिवरायांच्या चित्रावरील पाक्षिक सभेचा वृत्तांत अभ्यासायला मिळाला. श्री. पटवर्धन यांच्या सादरीकरणामुळे बर्लिन आणि रशिया येथील शिवरायांच्या चित्रांचा नोंदणी क्रमांक उपलब्ध झाला. तसेच, मालोजीराव जगदाळे यांनी शिवाजी महाराजांच्या चित्राशी संबंधित निकोलस विटसेनचा एक शोधनिबंध उपलब्ध करून दिला. त्यांच्या संग्रहात असलेल्या शिवाजी महाराजांच्या दोन्ही चित्रांची मूळ प्रत पुस्तकात छापण्यासाठी उपलब्ध करून दिली. याचबरोबर मंचर येथे राहणारे इतिहास अभ्यासक डॉ. प्रमोद बाणखेले सरांनी त्यांच्या संग्रही असणाऱ्या BnF आणि सालारजंग संग्रहालयातील शिवरायांच्या चित्रांच्या छायांकित प्रती उदार मनाने उपलब्ध करून दिल्या. या सर्वांच्या संशोधनामुळे, नोंदींमुळे आणि निरीक्षणांमुळे सदर पुस्तकात अनेक गोष्टींवर चिकित्सक चर्चा करताना प्रचंड मदत झाली. अर्थात, प्रा. ग. ह. खरे यांचा 'शिवाजीमहाराजांची चित्रे' हा दुर्मिळ लेख या पुस्तकाच्या निर्मितीसाठी कारणीभूत ठरला.

शिवाजी महाराज नेमके कसे दिसत, याविषयी अनेक डच, फ्रेंच, पोर्तुगीज, इंग्रज, राजस्थानी, मराठी कागदपत्रांमधून केलेले लिखाण आज उपलब्ध आहे. हे

समकालीन वर्णन चित्रांसोबत पडताळून पाहील्यास अगदी जुळून येते. या शारीरिक वर्णनांमुळे शिवाजी महाराजांच्या चित्रांची अस्सलता ठरवता आली. यातील बऱ्याच नोंदी एवढ्या सुंदर आणि ऐतिहासिकदृष्ट्या महत्वाच्या आहेत, की त्यांविषयी चर्चा करणे इथे अप्रस्तुत वाटले नाही. इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज, डच या परकियांनी शिवाजी महाराजांविषयी लिखाण करताना बऱ्याचदा त्यांचा उल्लेख एकेरी केला आहे. समकालीन नोंदींच्या अस्सलतेला कोणताही धक्का लागू नये, म्हणून हे उतारे जसेच्या तसे पुस्तकात घेतले आहेत. तसेच, शिवाजी महाराजांचे बोलणे, त्यांचे लिखाण कसे असावे, याविषयी आजवर कुणीही जास्त अभ्यास केलेला दिसून येत नाही. व्यक्तीच्या शरीराची रचना, त्याचे बोलणे, लिखाण, राहणीमान, स्वभावातील वैशिष्ट्ये या गोष्टी त्याचे व्यक्तिमत्व समजून घेताना उपयोगी पडतात. चित्रांचे वर्णन करताना शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाच्या नोंदींचा आधार घेणे अपरिहार्य होते. त्याचबरोबर शिवाजी महाराजांचे बोलणे कशा स्वरूपाचे असावे, याविषयी एकटे सेतुमाधवराव पगडी सोडल्यास इतर कुणी लक्ष दिले नाही. आज कोणत्याही ठोस पुराव्याच्या आधारावर आपण शिवाजी महाराजांचे बोलणे कसे असावे, हे ठामपणे सांगू शकत नाही, पण समकालीन अस्सल कागदपत्रांमध्ये शिवाजी महाराजांच्या तोंडी घालण्यात आलेल्या वाक्यांवरून बोलण्याचा मथितार्थ तरी आपल्याला समजू शकतो. आपल्या पुस्तकात सेतूमाधवराव म्हणतात,

> 'महाराजांच्या व्यक्तिमत्वाचा अभ्यास करत असताना महाराजांचे बोलणे कसे असावे, याविषयी कुणीही काम केलेले दिसत नाही. महाराजांचे विविध प्रसंगी काढलेले उद्गार एकत्र केले, तर त्यातून महाराजांच्या व्यक्तिमत्त्वावर आणि धोरणांवर प्रकाश पडू शकतो. पण असे काम केलेले आढळत नाही. शिवाजी महाराजांनी लिहिलेली पत्रे आज अगदी कमी प्रमाणत उपलब्ध आहेत. त्यापेक्षा इतर समकालीन साधनांचा विचार केल्यास महाराजांचे उद्गार सापडण्याची शक्यता अधिक आहे. इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज महाराजांना भेटले. त्यांनी आपल्या रिपोर्टमध्ये महाराजांच्या तोंडी घातलेले उद्गार खरे समजण्यास अडचण पडू नये. सभासद, कवी परमानंद यांनी शिवाजी महाराजांना पाहिले होते. परमानंद तर महाराजांच्या जवळचा होता. पण, त्याच्या काव्यातील अतिरंजितपणा आणि महाराजांची स्वगते यातून वगळावी लागतील. अर्थात, विविध साधनांमध्ये आलेले उद्गार

कितपत अधिकृत आहेत याची कसून छाननी करावी लागेल.'

सेतुमाधवराव यांचे म्हणणे सर्वार्थाने खरे आहे. शिवाजी महाराजांच्या बोलण्याच्या स्वभाववैशिष्ट्यांचा समावेश या पुस्तकात करत असताना मोजक्याच आणि जास्त विश्वासार्ह साधनांचा उपयोग केला. यांमध्ये मला भावलेली वाक्ये आहेत शिवाजी महाराजांच्या आग्रा भेटीतील. परकालदासने लिहिलेल्या 'डिंगल' भाषेतील पत्रात शिवाजी महाराजांच्या तोंडी काही वाक्ये घातली आहेत. मिश्र हिंदी स्वरूपातील ही वाक्ये खुद्द महाराजांनीच उद्गारली असावीत, असा अनेक अभ्यासकांचा अंदाज आहे. संपूर्ण पत्रव्यवहार डिंगल भाषेतला असला, तरीही महाराज काय बोलले, ते हिंदीमध्ये लिहिले आहे. त्यामुळे, या वाक्यांची अस्सलता समजून घेण्यास आपल्याला मदत होते. भीमसेन सक्सेनाने शिवाजी महाराजांना औरंगाबाद येथे पाहिले होते, त्यामुळे औरंगाबाद भेटीत महाराजांनी काढलेले उद्गार त्याने प्रत्यक्ष ऐकलेले असावेत, त्यामुळे शिवाजी महाराजांच्या बोलण्याची थोडीफार का होईना कल्पना आपल्याला येईल. अर्थात, या उद्गारांच्या बाबतीत कोणते निकष लावावेत, हे जरी स्पष्टपणे सांगता येत नसले तरीही शिवाजी महाराजांच्या व्यक्तित्त्वाची ही बाजू समजून घेणे, ही मनोरंजक आणि फार उद्बोधक बाब आहे. या सर्व गोष्टींचा विचार करता महाराजांची कोणती प्रतिमा आपल्या नजरेसमोर उभी राहते, याचा अंदाज लावण्याचे काम मी वाचकांवर आणि अभ्यासकांवर सोडतो.

मराठ्यांना कलेची जाण नव्हती, मराठ्यांकडे कलात्मक दृष्टी नव्हती असा सर्रास आरोप इतिहासकारांकडून केला जातो, पण मराठ्यांच्या चित्रशैलीमुळे अठराव्या शतकात संपूर्ण दख्खन भाग रंगून गेला होता, हे फार कमी इतिहासकारांनी ठामपणे मांडले, ज्यात सी. शिवराममूर्ती, संशोधक म. श्री. माटे, संशोधक कमल गोखले, डॉ. देशमुख यांची नावे अग्रक्रमाने सांगता येतील. मराठ्यांच्या चित्रकलेला उभारी देण्याचे काम केले ते थोरल्या शाहू छत्रपतींनी. या काळात शिवाजी महाराज, संभाजी महाराज अशा स्वराज्याच्या छत्रपतींची चित्रे शाहू महाराजांनी काढवून घेतली. सदर पुस्तकाचा मध्यवर्ती विषय हा 'शिवरायांची चित्र' हा असला, तरीही थोरल्या शाहू छत्रपतींच्या काळात तयार करण्यात आलेल्या संभाजी महाराजांच्या चित्राविषयी चर्चा करणे इथे अप्रस्तुत वाटले नसते. त्यामुळे, संभाजी महाराजांची चित्रे तसेच मराठ्यांच्या पदरी असणाऱ्या चित्रकारांची थोडक्यात माहिती पुस्तकाच्या शेवटच्या प्रकरणात समाविष्ट करण्यात आली आहे.

अलीकडच्या काळात शिवरायांच्या चित्रांची प्रचंड प्रमाणात निर्मिती झाली

असली, तरीही शिवाजी महाराजांचे रूप घरोघरी पोहोचवणारे महादेव विश्वनाथ धुरंधर आणि भवानराव पंतप्रतिनिधी यांच्या ऐतिहासिक योगदानाची चर्चा 'उपसंहार' मध्ये सविस्तरपणे केली आहे. तसेच, भवानरावांचे सुपुत्र आप्पासाहेब पंतप्रतिनिधी यांनी त्यांच्या आयुष्यात पाहिलेले एक प्रचंड मोठे आणि महागडे स्वप्न, जे आजही अपूर्ण आहे, त्याविषयी थोडक्यात माहिती यामध्ये समाविष्ट केली आहे. श्री. वा. सी. बेंद्रे यांनी शिवरायांचे चित्र प्रकाशित करण्याआधी शिवाजी महाराजांची कोणती चित्रे विविध पुस्तकांमधून प्रकाशित करण्यात आली होती, याचीही माहिती या 'उपसंहार' मध्ये दिली आहे. असे या पुस्तकाचे एकंदरीत स्वरूप आहे.

या पुस्तकाचे लिखाण करताना अनेक परदेशी इतिहास अभ्यासकांच्या संशोधनाची मदत झाली. बरीच साधने डच भाषेत उपलब्ध होती. माझ्या ओळखीत असणाऱ्या बऱ्याच लोकांना जर्मन, पोर्तुगीज, फ्रेंच इ. भाषा येतात, पण डच भाषा कुणालाही समजत नव्हती. अखेरीस गुगल आणि 'Dutch-English' शब्दकोशांचा वापर करून चार-पाच शोधनिबंध जमेल तसे भाषांतरित केले. या कामात माझा बराच वेळ खर्ची पडला, पण यातून अनेक नवीन गोष्टी तुमच्यासमोर मांडता आल्या. मीर महंमदने शिवाजी महाराजांचे चित्र काढले, हा गैरसमज दूर झाला तो याच डच भाषेतील शोधनिबंधांमुळे. पुस्तकासाठी माहिती जमा करताना अनेक अपरिचित गोष्टीसुद्धा वाचण्यास मिळाल्या. हर्बर्ट डी यागरने शिवाजी महाराजांच्या भेटीचे केलेले वर्णन प्रचंड वैभवशाली आहे. डी यागरच्या वर्णनामुळे शिवाजी महाराजांची वेगळीच प्रतिमा आपल्यासमोर उभी राहते.

हे पुस्तक पूर्ण करण्यासाठी छत्रपती शिवाजी महाराजांनंतर 'दुर्गमहर्षी प्रमोद मारुती मांडे' या चार शब्दांनी प्रेरणा दिली. आज जो काही संशोधन-लेखन-वाचनाचा वारसा आम्हा सर्वांना लाभला आहे, त्याचे मूळ मांडे सरांनी दिलेल्या शिकवणुकीत आहे. मांडे सरांच्या सहवासामुळे आज कित्येक तरूण इतिहाससंशोधक महाराष्ट्रात तयार झालेले पाहायला मिळतात. टीव्हीवर प्रमोद मांडे सरांची राजू परुळेकर यांनी घेतलेली एक मुलाखत प्रसारित झाली होती. त्यामध्ये श्री. परुळेकर यांनी मांडे सरांना एक फार सुंदर प्रश्न विचारला,

'अहो मांडे, तुम्ही हे सगळं सांगताय अन् 'गडकिल्ले' 'स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा' 'सह्याद्रीचे रत्नभांडार' ही पुस्तकेही तुम्ही लिहिलीत, असं सर्व काही करत असताना तुम्हाला कधी प्रश्न पडला का, की आपण जे पेरतोय, ते कधीतरी उगवून येईल?'

मांडे सर आपल्या नेहमीच्या बेफिकिरी तोऱ्यात खुर्चीवर मागे रेलले आणि अतिशय

आत्मविश्वासाने एका शब्दात उत्तर दिले, 'हो. नक्कीच उगवून येईल.' सरांनी आपल्या ज्ञानाने मशागत केलेली 'वैचारिक शेती' आज धनधान्याने फुलून गेली आहे, पण पालवी फुटलेल्या अंकुरांचा हा 'ज्ञानदाता' आज आमच्यात नाही. सरांच्या विचारांवर आयुष्याभर मार्गक्रमण करत राहू, हा निश्चय आजही कायम आहे. प्रामाणिकपणा रुजवणाऱ्या या गुरूला 'मऱ्हाटा पातशाहा' ही माझ्याकडून पुस्तकरूपी गुरुदक्षिणा होय.

इयत्ता नववीत असताना पन्हाळगड किल्ल्यावर इंद्रजीत सावंत सरलिखित 'शोध भवानी तलवारीचा' हे पुस्तक घरच्यांकडे हट्ट करून मागवून घेतले होते. या वयात संशोधनात्मक लिखाणाची समज नव्हती, तरीही 'शोध भवानी तलवारीचा' या पुस्तकाचा प्रचंड प्रभाव त्या वेळी माझ्या बालमनावर पडला होता, आणि आज माझ्या पुस्तकासाठी सावंत सरांनी दिलेल्या शुभेच्छा ही माझ्यासाठी अभिमानाची आणि मनोबल वाढवणारी बाब आहे.

आयुष्याच्या वळणावर 'ओंकार नायगावकर' या तरूण इतिहासप्रेमी व्यक्तिमत्त्वाची गाठ पडली. माझ्या आयुष्यात आमूलाग्र बदल घडवून आणण्याचे काम ओंकारदादांनी केले. 'ओंकार नायगावकर'सारखा गुरु तरुण वयात लाभला, ही नशिबाने घडवून आणलेली गोष्ट आहे. त्यांच्या मार्गदर्शनाशिवाय या पुस्तकाची एक ओळही लिहिता आली नसती. समाजात मला वेगळी ओळख देण्यासाठी धडपडणाऱ्या माझ्या या मार्गदर्शकाचे शतशः आभार.

पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये 'प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व' या विषयाचे शिक्षण देणारे माझे गुरु डॉ. विजय साठे सर, डॉ. अभिजित दांडेकर सर आणि डॉ. श्रीकांत गणवीर सर यांचा मी आभारी आहे. तसेच माझे गुरु 'डॉ. गोपाल जोगे' सर यांनी दिलेल्या चिकित्सक दृष्टीमुळे हे पुस्तक 'संशोधनात्मक'दृष्ट्या परिपूर्ण झाल्याची खात्री वाटते.

शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकानंतर त्यांनी कर्नाटकाची भव्य मोहीम आखली. या मोहिमेत असतानाच डचांनी शिवाजी महाराजांची अनेक चित्रे रेखाटली. दक्षिण भारतात शिवाजी महाराज 'सम्राट' म्हणून उतरले होते. या गोष्टी नजरेसमोर ठेवून पुस्तकाचे 'मऱ्हाटा पातशाह' असे नामकरण करण्यात आले. अतिशय कमी वेळात 'मऱ्हाटा पातशाह'साठी उत्कृष्ट सुलेखन करणारे कलाकार निखिल पवार यांना मनापासून धन्यवाद! त्यांच्याच कलाकृतीतून पुस्तकातील प्रकरणांची शीर्षके सजली आहेत.

माझ्या स्वप्नातील शिवाजी महाराजांच्या प्रतिमेला सत्यात उतरवणारे कलाकार

प्रमोद मोर्ती यांचे कितीही धन्यवाद मानले तरी कमीच. आपल्या कलेने श्री. मोर्ती यांनी अतिशय सुंदर मुखपृष्ठ साकारले. शिवाजी महाराजांच्या समकालीन आणि अस्सल चित्रांमध्ये दाखवण्यात आलेल्या सर्व गोष्टी एकत्र करून मुखपृष्ठावरील चित्र साकार झाले आहे. यातील बहुतेक सर्वच गोष्टी पुराव्यांच्या आधारे रेखाटण्यात आल्यात त्यामुळे चित्राचे ऐतिहासिक मोलसुद्धा आपल्याला जाणवते. या अद्वितीय कलाकृतीसाठी प्रमोददादांचे मनःपूर्वक आभार आणि या सुंदर निर्मितीसाठी अभिनंदनसुद्धा.

माझ्या लिखाणात ज्या ज्या चुका आढळल्यात त्यांची दुरुस्ती करणारा अतिशय बुद्धिमान मित्र आणि मोठा भाऊ श्रीनिवास कचरे याला लाख धन्यवाद! नवीन संसारातून वेळ काढून श्रीदादांनी केलेल्या मदतीसाठी उपकृत राहीन.

इतिहाससंशोधक मालोजीराव जगदाळे यांच्या मदतीशिवाय अनेक दुर्मिळ साधने उपलब्ध झाली नसती. या पुस्तकात मालोजीरावांनी त्यांच्या संग्रही असणाऱ्या शिवाजी महाराजांच्या दोन अस्सल चित्रांच्या प्रती छापण्यासाठी उपलब्ध करून दिल्या. त्यांच्या खंबीर पाठिंब्यासाठी विशेष धन्यवाद! इतिहासावर प्रचंड प्रेम करणाऱ्या डॉ. प्रमोद बाणखेले सरांनाही धन्यवाद! पुस्तक लिखाणासाठी त्यांचे मार्गदर्शन उपयुक्त ठरले. तसेच, वेळोवेळी माझ्या लिखाणाची पडताळणी करून योग्य त्या सूचना देणारे माझे मित्र लेखक श्री. अभिषेक कुंभार आणि सिद्धार्थ शेलार यांचा मी मनस्वी आभारी आहे. त्याचबरोबर, कोरोनासारख्या गंभीर आजारात ज्यांनी असंख्य लोकांचे प्राण वाचवणारे देवदूत आणि प्रसिद्ध लेखक डॉ. प्रकाश कोयाडे यांच्या सततच्या चौकशीमुळे पुस्तक वेळेत पूर्ण करता आले. त्यांनी दाखवलेल्या नि:स्वार्थ प्रेमासाठी त्यांना शतशः धन्यवाद! इतिहास अभ्यासक आणि लेखक प्रशांत लवटे पाटील, अभ्यासक संतोषराजे गायकवाड, रवीराज फुगे, विशाल सावंत, अभिजीत दरेकर, मयूर जाधव, पियुष गांगर्डे, गणेश मोकाटे, अभिजित तळेकर, श्रीपाद कुलकर्णी, सौरव गांगर्डे यांनी लिखाणात वेळोवेळी मदत केली, त्याबद्दल या सर्वांचे आभार मी मानतो. साताऱ्याचे शस्त्रअभ्यासक आणि संशोधक विक्रमसिंह पाटील ऊर्फ अण्णासाहेब यांच्यामुळे शस्त्रांवरील विविध प्राण्यांच्या अंकनाविषयी बरीच माहिती मिळाली, जी या पुस्तकात मांडण्यासाठी उपयुक्त ठरली. त्यांच्या या नि:स्वार्थ प्रेमासाठी धन्यवाद. साताऱ्याच्या श्री. अरविंद पवार यांनी संभाजी महाराजांची चित्रे उपलब्ध करून दिल्याबद्दल त्यांचे शतशः आभार.

'आम्हीच ते वेडे ज्यांना आस इतिहासाची' या माझ्या परिवारातील सर्वच

मित्रमंडळींचा पुस्तकाला खंबीर पाठिंबा लाभला. दीड-दोनशेजणांच्या या परिवाराने दिवस-रात्र एक करून पुस्तकाच्या प्रसिद्धीसाठी जे कष्ट घेतले, त्याचे कर्ज आजन्म बाळगण्यात मला मनस्वी आनंद आहे. इतिहास अभ्यासक समीर इंगवले, विक्रांत निकम, अतुल चव्हाण, वाचनप्रिय व्यक्तिमत्त्व अमित चव्हाण, भूषण महानोर, रोहित चव्हाण, रोहन पवार, पुनित चव्हाण, प्रसाद काळे देशमुख या सर्वांनी वेळोवेळी लिखाणाकडे जातीने लक्ष दिले. त्यांच्यासारखे मार्गदर्शक मित्र लाभले, ही अभिमानाची बाब आहे.

'श्रीशंभूछत्रपती राज्याभिषेक सोहळा, किल्ले रायगड'चे सन्माननीय पदाधिकारी विवेक मोरे दादा, अभिजित राऊत, शुभम देवारे, अजिंक्य भालेराव व इतर सर्व सदस्यांना मनापासून धन्यवाद!

उस्मानाबादच्या 'शिवराज्याभिषेक सोहळा समिती'चे अध्यक्ष अभिजित निंबाळकर, प्रसन्न नायगावकर, अमर मते, वैभव मारवाडकर, अक्षय गंधम, डॉ. मयुर लोणकर, प्रीतिश इंदलकर, मंगेश मुळे, हृषिकेश नायगावकर, अक्षय पुनगडे, विशाल रोहिले-शेलार, गणेश करवर, दिलीप आदटराव यांच्या भक्कम मदतीने बऱ्याच गोष्टी सहजतेने पार पडल्या. आदित्य जेऊरकर याने पुस्तकप्रसिद्धीसाठी अनेक कष्ट घेतले. त्याच्या कलेचे लक्ष लक्ष आभार.

माझे मोठे भाऊ आणि कायम मदतीसाठी खंबीरपणे उभे असलेले उद्योजक शेखर घोडके, डॉ. सूरज मोटे, धीरज मोटे आणि 'शरदचंद्र पवार अभिष्ठचिंतन सोहळा समिती' परिवाराचे मनःपूर्वक धन्यवाद. शेखर भैय्या आणि सूरज दादांनी 'मऱ्हाटा पातशाह' हे पुस्तक त्यांचेच आहे, या भावनेतून जे काही प्रेम आणि सोबत दिली, त्याचे शब्दात वर्णन करणे शक्य नाही.

पुण्याचे शस्त्रनिर्माते व अभ्यासक सत्यजित वैद्य यांनी पुस्तकासाठी विविध शस्त्रांची चित्रे उपलब्ध करून दिली. त्यांची साथ अशीच कायम राहील, याबाबत कोणतीही शंका नाही. त्यांचेही आभार. माझ्या अभ्यासाला कमी-जास्त लागणाऱ्या सर्व गोष्टींची काळजी घेणाऱ्या अमित साळुंके, सुदर्शन गायकवाड, समर सोनटक्के, शहाजी भोयटेआणि प्रदीप कोळगे या जिवलगांचा आभारी आहे.

घरच्या सर्वच जबाबदारीमधून कायम मोकळीक देणाऱ्या माझ्या आई-वडिलांमुळे हे पुस्तक मी लिहू शकलो. वेळोवेळी येणाऱ्या तांत्रिक अडचणी अगदी शून्य मिनिटात सोडवणाऱ्या लहान भावाचे या पुस्तकनिर्मितीत फार मोठे योगदान आहे. लहानपणापासून माझ्यात वाचनाची आवड निर्माण व्हावी, याकडे लक्ष देणारे माझे

आजोबा श्री. विजय भारती, दुर्मिळ माहितीचा कायम पुरवठा करणारा माझा मामा आणि अनेक पुस्तके भेट म्हणून देणाऱ्या माझ्या दोन्ही मावशा या सर्व रक्ताच्या नातेवाईकांचे आशीर्वाद कायम सोबत होते.

स्वप्नील कोलते पाटील, तू कायम सोबत आहेस. शेवटपर्यंत राहशील.

सरतेशेवटी, माझ्यावर विश्वास टाकून या पुस्तकाच्या प्रकाशनाची जबाबदारी घेणारे, त्यांच्याच भाषेत सांगायचे झाल्यास माझे 'मेंटॉर' शरद तांदळे सर यांचे लक्ष लक्ष आभार. तसेच अतिशय कमी वेळात पुस्तकाची अंतर्गत रचना व मुद्रितशोधन करून देणाऱ्या सौ. हेमलता थिटे यांचेही आभार.

आज हे माझ पहिलं पुस्तक तुम्हा रसिकांच्या, अभ्यासकांच्या आणि संशोधकांच्या हाती देताना माझ्या मनी संमिश्र भावना दाटून आल्या आहेत. बोटांवर मोजता येतील, एवढे अभ्यासक सोडल्यास आजवर शिवचरित्राचे हे अंग कायम दुर्लक्षित राहिले आहे. या पुस्तकात दिलेल्या अनेक गोष्टी संशोधक, अभ्यासक आणि वाचकांसाठी पहिल्यांदाच मराठी भाषेत उपलब्ध होत आहेत. येणाऱ्या काळात मराठ्यांच्या इतिहासाशी निगडित 'नवीन संशोधन' मांडण्याचा प्रयत्न असेल. त्यातील हे पहिले पुष्प..

जे जे चांगलं ते शिवछत्रपतींचं, जे जे वाईट ते माझं..

बहुत काय लिहिणे? लेकराचे अगत्य असो द्यावे.

चांगभलं!!

**केतन पुरी**
ketanpuritheexplorer@gmail.com

'आम्हीच ते वेडे ज्यांना आस इतिहासाची' म्हणून काही तरूण मराठ्यांच्या, शिवाजी महाराजांच्या इतिहासाची सेवा करत आहेत. श्री शिवछत्रपतींच्या व्यक्तिमत्त्वाने, त्यांच्या प्रेरणादायी इतिहासाने भारावून जाऊन छत्रपतींच्या इतिहासातील अनेक बंद दालने इतिहासाची आस असलेले हे तरूण धडाधड उघडत आहेत. केतन पुरी हे यातीलच बिनीचे शिलेदार आहेत. श्री शिवछत्रपतींचे दिसणे-चालणे-बोलणे कसे होते, याचा अभ्यास आजपर्यंत अनेक संशोधक करत आले आहेत. द. वी. काळे, ग. ह. खरे, वा. सी. बेंद्रे यांसारख्या इतिहास अभ्यासकांनी शिवछत्रपतींच्या चित्रांचा शोध घेऊन तो महाराष्ट्रापुढे मांडला आहे. अनेक नामवंत चित्रकारांनी श्री शिवछत्रपतींचे रूप आपल्या कुंचल्यातून साकारले आहे. असे असले तरीही 'महाराष्ट्रभू'च्या या प्रेरणास्थानाचे 'रूप' समजून घेण्याची या भूमीपुत्रांची तहान काय भागत नाही.

एकविसाव्या शतकात संगणक क्रांती झाली आणि ज्ञानाचा एकप्रकारे विस्फोट झाला. यातूनच जगभरातील नामवंत संग्रहालयांची दालनेही खुली झाली. यामुळे शिवछत्रपतींची समकालीन चित्रे उपलब्ध झाली. काही चित्रांच्या मूळ प्रतीच मालोजीराव जगदाळेंसारख्या संशोधकांनी महाराष्ट्रात आणल्या. तर काही 'रिस्क म्युजियम'सारख्या संग्रहालयात असणारी चित्रे माहितीजालावर उपलब्ध झाली. अजून जगभर पसरलेल्या चित्रसंग्रहातील शिवछत्रपतींची चित्रे उपलब्ध होत आहेत.

या चित्रांचा काळ, त्यांचे चित्रकार, ती चित्रे कुठे संग्रहित आहेत, त्यांची शैली, लांबी-रुंदी अशा अनेक गोष्टी नव्या दमाचा तरूण संशोधक आपल्या अभ्यासाने प्रस्तुत पुस्तकाच्या निमित्ताने महाराष्ट्रासमोर आणत आहे. या शिवछत्रपतींच्या चित्रांबरोबरच शिवरायांना समक्ष पाहून केलेली वर्णनेही प्रस्तुत पुस्तकाच्या निमित्ताने आपल्यासमोर येत आहेत. या चित्रांच्या माहितीच्या खजिन्याचे स्वागत इतिहासप्रेमी करतील, यात शंका नाही.

तरूण इतिहास संशोधक केतन पुरी यांना माझ्या मनःपूर्वक शुभेच्छा.

आगे बढो..!!

**इंद्रजित सावंत.**

दि. १ मे २०२१, कोल्हापूर.



## अनुक्रमणिका




चित्र क्र. १

श्री छत्रपति शिवाजी महाराज



Den Heer SEVA GI.

Copied from the Painting secured by
Van Valentyn just after the Surat Sack of 1664 A. D.
MacKenzie Collection, Vol. XIII.

WITH KIND PERMISSION FROM THE INDIA OFFICE, LONDON

Published by Mr. V. S. Bendrey.
Gaikawadwada, 568 Narayan, Poona 2.



चित्र क्र. २





चित्र क्र. ९ अ, चित्र क्र. ९ ब

# १

छत्रपती शिवाजी महाराज दिसतात कसे, हा प्रश्न शंभरएक वर्षाखाली प्रत्येकालाच पडला होता. सन १९२०पर्यंत शिवाजी महाराजांचे एकही अधिकृत चित्र सर्वसामान्य लोकांसमोर आले नव्हते. मराठ्यांच्या इतिहासाचे भीष्माचार्य वा. सी. बेंद्रे यांनी सर्वप्रथम शिवाजी महाराजांच्या अस्सल चित्राची छायाप्रत भारतात आणली आणि शिवाजी महाराजांचे तेजस्वी रूप सर्वांसमोर आले. अर्थात, त्यानंतर बराच काळ लोटला आहे.

शिवाजी महाराजांच्या हयातीत आणि त्यांच्या मृत्यूनंतर आठ-दहा वर्षांनी काढलेली अस्सल आणि ज्यांना आपण 'समकालीन' म्हणू शकतो, अशी तब्बल चौदा चित्रे आज उपलब्ध आहेत. पण ही सर्व चित्रे शिवाजी महाराजांचीच आहेत हे कोणत्या निकषांवर ठरवले गेले, हा प्रश्न काही वर्षांपूर्वी पडला होता तेव्हा मदतीला अनेक ऐतिहासिक व्यक्ती धावून आल्या. त्यामध्ये परकालदास होता, परमानंद होता, सभासद होता. कधी कधी थेव्हनॉट, एस्केलिऑट, हर्बर्ट डी यागर यांसारख्या परकीय व्यक्तीसुद्धा होत्या. हेन्री ऑक्सेंडनच्या डायरीने तर संपूर्ण राज्याभिषेकाचा प्रसंग जिवंत केला. शिवाजी महाराजांच्या हयातीत लोकांना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे आकर्षण होते. त्याचमुळे, शिवाजी महाराजांचे वर्णन करणारे कित्येक समकालीन संदर्भ आज उपलब्ध आहेत. ज्या ज्या लोकांनी शिवाजी महाराजांना पाहिले, त्यांनी महाराजांचे रूप आपल्या शब्दांत नोंदवून ठेवले, तर काहींनी त्यांच्याविषयी माहिती जमा करून लिहिली. या सर्वांच्या नोंदींचा मागोवा घेतल्यास शिवाजी महाराजांचे संपूर्ण व्यक्तिमत्त्व आपल्या नजरेसमोर भक्कमपणे उभे राहते.

डॉ. बाळकृष्णलिखित 'शिवाजी महाराजांचे व्यक्तिमत्त्व'[१] हा लेख वाचताना काही

[१] *छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथ*, पृ. ५५

महत्त्वाच्या ऐतिहासिक नोंदी नजरेस पडल्या. या नोंदी अनेक परकीय प्रवाशांनी, तसेच महाराजांच्या इतिहासाचे पुनर्लेखन करणाऱ्या परकीय अभ्यासकांनी केलेल्या आहेत. डॉ. बाळकृष्ण म्हणजे कोल्हापूरच्या मातीतून तयार झालेले एक महान व्यक्तिमत्त्व. लंडन विद्यापीठातून पीएच. डी. पदवी प्राप्त केलेले बाळकृष्ण कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयात प्राचार्य म्हणून कार्यरत होते. त्यांनी छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवनचरित्रावर आधारित 'शिवाजी द ग्रेट' नावाने १६०० पृष्ठे असलेले चार खंड प्रकाशित केले. डॉ. बाळकृष्ण यांचे मराठ्यांच्या संशोधन क्षेत्रातील योगदान प्रचंड मोठे आहे. सदर लेखामध्ये त्यांनी अनेक परकीय प्रवाशांची नावे दिली आहेत ज्यामध्ये स्टिफन उस्टिक (इंग्रजांचा राजदूत, इसवी सन १६७४), थॉमस निकोल्स (सन १६७३), हेन्री ऑक्सेंडन (सन १६७४), सेम्यूअल ऑस्टीन आर. जोन्स, एडवर्ड ऑस्टीन (सन १६७५), लेफ्ट. एडम्स आणि मॉलव्हेवर (सन १६७६) जॉन चाईल्ड (सन १६७८) आणि अजून अशी बरीच नावे सांगता येतील, ज्यांनी शिवाजी महाराजांची प्रत्यक्ष भेट घेतली. पण दुर्दैवाची बाब ही, की या सर्वांच्या लिखाणातून महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाचे वर्णन वाचायला मिळत नाही. उदाहरणादाखल डॉ. बाळकृष्ण लिहितात, 'तेगनापट्टणम येथे असणाऱ्या डच वखारीचा प्रमुख मोठा नजराणा घेऊन जुलै १६७७मध्ये शिवाजीराजांना भेटायला आला होता. याच महिन्यात फ्रेंचांचा 'जर्मेन' नावाचा प्रतिनिधी कोलेरून नदीच्या किनाऱ्यावर भेटीसाठी दाखल झाला होता. या दोघांनी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाविषयी कोठेही, कोणतीही नोंद करून ठेवलेली नाही.' पण, तेगनापट्टणम् येथील डच वखारप्रमुख म्हणून जुलै-ऑगस्ट दरम्यान शिवाजीराजांना भेटणारी व्यक्ती ही दुसरी-तिसरी कुणी नसून 'हर्बर्ट डी यागर'[२] होय. खरेतर, बाळकृष्णांनी जेव्हा हे मत प्रकट केले त्यानंतरच्या काही वर्षांनी ग. ह. खरे यांना डी यागरच्या डायरीतील काही महत्त्वाच्या नोंदी मिळाल्या. त्याचे सर्वात पहिल्यांदा भाषांतर करून प्रसिद्ध करण्याचे काम खऱ्यांनी केले.[३] या हर्बर्टने शिवाजी महाराजांचे केलेले वर्णन आपल्याला पुढे एका चित्राच्या संदर्भात वाचायला मिळेलच.

आधी आपण शिवाजी महाराजांविषयी समकालीन साधनांमध्ये काय लिहून ठेवले आहे याचा आढावा घेऊ, मग या सर्व नोंदींची एकत्र चर्चा करणे योग्य ठरेल. काही

---

*२. हर्बर्ट डी यागर हा data processing officer तसेच राजदूत म्हणून डच वखारीत कार्यरत होता.*

*३. त्रैमासिक, भारत इतिहास संशोधन मंडळ, वर्ष ४७*

(जणांच्या चर्चेतून, ऐकण्यात आलेल्या गोष्टींवरून 'एस्केलिऑट' हा शिवाजीराजांचे वर्णन करताना लिहितो,

'मध्यम उंची आणि प्रमाणबद्ध शरीर. राजा कामात क्रियाशील, नजरेत तीक्ष्ण, भेदक आणि वर्णाने इतरांपेक्षा उजळ असून नेहमी स्मितहास्य करीत बोलतो. त्याची मान व खांद्याचा भाग पुढे झुकलेला दिसतो.'

थेव्हनॉटच्या[४] दृष्टीने शिवाजीराजा उंचीला कमी, पिवळट तपकिरी रंगाचा होता. शिवाजीराजाचे डोळे अतिशय तेजस्वी आणि तीक्ष्ण असून, त्यामधून राजाची तीक्ष्ण बुद्धिमत्ता जाणवते. हा राजा नेहमी दिवसातून एकदाच जेवण घेतो. त्याचे आरोग्य चांगले आहे.

फादर डी ऑर्किन्स म्हणतो, 'राजा चैतन्यशील, पण काहीसा अस्वस्थ वाटतो. मात्र, कितीही अस्वस्थ वाटला तरी तो निर्णयक्षमता आणि पुरुषार्थ यांत मुळीच कमी नाही.'

अजून एक प्रसिद्ध परकीय प्रवासी म्हणजे कॉस्मा दा गार्डा. गार्डाने शिवरायांवर लिहिलेले चरित्र "Vida e -ccoens do Famoso e felicissimo Sevagy' इसवी सन १७३० मध्ये प्रकाशित केले. पोर्तुगीज भाषेतील हे शिवचरित्र इसवी सन १६९५ साली लिहून पूर्ण झाले होते. सुरेंद्रनाथ सेन यांनी त्यांच्या एका पुस्तकात कॉस्माचा उल्लेख 'शिवाजी महाराजांचा उत्साही चाहता' असा केला आहे.[५] कॉस्माने केलेले शिवाजी महाराजांचे वर्णन आपल्याला अनेक ठिकाणी सर्रास वाचायला मिळते. तो म्हणतो, 'राजा कामास जलद आणि त्याच्या चालीत उत्साह होता. त्याचा चेहरा स्वच्छ आणि वर्ण गौर होता. विशेषतः त्याचे काळेभोर मोठे मोठे डोळे इतके चैतन्यपूर्ण होते, की त्यातून तेजस्वी किरण बाहेर पडत आहेत असे वाटते. यात त्याची चलाख, स्वच्छ आणि तीव्र बुद्धिमत्ता भरच टाकीत असे.'

जोनाथन स्कॉट म्हणतो, 'शिवाजीराजा आपल्या योजना चातुर्याने आखीत असे आणि चिकाटीने पूर्णत्वास नेत असे. तो त्याच्या मनातील उद्दिष्टास पूरक ठरेल असेच निवडत असे. त्याच्या मनातील निश्चयाची माहिती कोणालाही होत नसे. तो निश्चय प्रत्यक्षात उतरला की मगच ती माहिती सर्वांना कळत असे.' स्कॉटचे हे वर्णन

४. *थेव्हनॉट हा फ्रेंच प्रवासी होता. The travels of Monsieur deThevenot या पुस्तकात त्याने शिवाजी महाराजांवर चौदा-पंधरा पाने लिहिली आहेत.*

५. *Foreign Biographies of Shivaji*

अनेकांगाने महत्त्वाचे वाटते.

पहिल्या सुरतेच्या स्वारीसमयी शिवाजी महाराजांना प्रत्यक्ष पाहिलेल्या 'जॉन एस्केलिऑट' याने शिवाजी महाराजांविषयी वर्णन केलेले एक पत्र आज उपलब्ध आहे. तो इस्ट इंडिया कंपनीचा राजदूत म्हणून सुरतेत काम पाहत होता. २६ जानेवारी १६६४ रोजी सर थॉमस ब्राऊन[६] यांना त्याने एक पत्र लिहिले. एस्केलिऑट लिहितो,

'पाच तारखेची मंगळवारची सकाळ कोतवालाने वाजवलेल्या भोंग्याच्या आवाजाने झाली. कोणी मोगल सरदार आपल्या बारा हजार फौजेनिशी शहराजवळ येऊन थडकलाय, अशी बातमी होती. नंतर कळले, 'तो' आलाय. दख्खनेतील लोक आणि महामहीम बादशाह ज्याला 'राजा' म्हणून संबोधतात तो आलाय. ज्याच्या नावाने दक्षिणेतील सुलतानांना घाम फुटतो, तो येतोय. त्याच्याबद्दल सांगायचे झाल्यास तो उंचीने माझ्यापेक्षा थोडा लहान, पण ताठ आणि उत्कृष्ट बांध्याचा आहे. रोज व्यायाम करून कमावलेले शरीर आहे. प्रसन्न चेहरा आहे, बोलताना मंद स्मित करतो. त्याच्या लोकांमध्ये तो सर्वात गोरा आहे. डोळे भेदक आणि बोलके आहेत. कठोर, शांत, क्रूर, विचारी, दयाळू अशी परस्परविरोधी विशेषणे त्याला देता येतील. त्याच्या लोकांमध्ये तो अतिशय लोकप्रिय आहे आणि लोक त्यासाठी काहीही करायला तयार होतात. गद्दारी व चूक करणाऱ्याला तो भयानक शिक्षा करतो. बादशाहने त्याच्या रयतेचा केलेला छळ आणि नासधूस याचा बदला घेण्यासाठी व औरंगजेबाला अद्दल घडवण्यासाठी तो येथे आला असावा.'

मोंटगोमेरी मार्टिन म्हणतो, 'शिवाजीराजाजवळ असे काही गुण होते, जे हिंदू समाजात कौतुकास्पद म्हणावे लागतील. अकस्मात येणाऱ्या कोणत्याही आपत्तीला तो तोंड द्यायला तयार असे. कितीही मोठ्या आपत्तीचा त्याला धाक असा वाटत नसे. यश त्याच्या डोक्यात जात नसे. तो अत्यंत मितव्ययी असून त्याची वागणूक सर्वप्रिय अशी असे. भावना तीव्र असत. आपल्या लोकांत तो मुक्तपणे वावरे आणि परकीय सत्तेचा मुकाबला करण्याची प्रेरणा त्यांना देई. औरंगजेब बादशहाच्या वक्रगामी चालींना उत्तर देताना तोही वक्रचालींचा वापर करत असे. मात्र, हे करत असताना आपले वैयक्तिक धाडस वापरायलाही विसरत नसे. त्याने दक्षिणेतील मोहिमांत केलेल्या चढाया आपण डोळ्यांनी पाहिल्याचे लोक अभिमानाने सांगतात आणि जतन

---

*६. सर थॉमस ब्राऊन हे औषधशास्त्र तसेच विज्ञानाचे प्राध्यापक म्हणून ऑक्सफर्ड विद्यापीठात कार्यरत होते. राणीच्या दरबारातील मुत्सद्दी म्हणूनसुद्धा त्यांचा लौकिक होता.*

करून ठेवलेल्या त्याच्या प्रसिद्ध तलवारीकडे ते एखाद्या मूर्तीप्रमाणे पूज्य भावाने पाहतात.'[७]

प्रसिद्ध इतिहासकार स्कॉट वॉरिंगला सुद्धा महाराजांवर लिखाण केल्याविना राहवले नाही. त्यांनी लिहून ठेवले आहे, 'सैनिक म्हणून शिवाजीराजाची प्रज्ञा इतर आशियाई सेनानायकांपेक्षा श्रेष्ठ प्रतीची होती. त्याच्या नियोजनात एकाहून अधिक विजयांचा समावेश असे. त्याचे साध्य झालेले उद्दिष्ट समजूनही त्यातून नेमका किती लाभ झाला असेल, हे सहजासहजी लक्षात येत नसे. नंतरच्या मोहिमांत प्राप्त झालेल्या विजयामुळे हे लाभ लोकांना समजत. त्याच्या व्यक्तिगत कामगिरीचे स्वरूप चकित करण्याजोगे होते. अदम्य संयमाच्या सहाय्याने त्याने कोणतीही वाट पायाखाली घातली नाही, असे झाले नाही. त्याच्या मागोमाग दौड करणाऱ्या सैनिकांना तो गंतव्य ठिकाणी अत्यंत जवळच्या पण अनोळखी रस्त्याने घेऊन जाई. तेथे पोहचल्यावर समोरचा शत्रू कोण, हे सैनिकांना समजत असे. राजाच्या भावना त्याच्या काबूत असत. शब्दांवरून आणि कृतीवरून त्याच्या मनात काय चालले आहे, याचा अंदाज त्याच्या अनुयायांनाही येत नसे. कोणतीही आणीबाणीची परिस्थिती त्याला गोंधळात टाकू शकत नसे. कोणतेही संकट त्याला विचलित करू शकत नसे.'[८]

काही इंग्रज इतिहासकार तर महाराजांची तुलना सिकंदर, हनीबल, सीझर यांच्याशी करतात. पोर्तुगीजांच्या समकालीन नोंदीसुद्धा याला साक्षी आहेत. या सर्व गोष्टी ध्यानात घेतल्यास शिवाजी महाराजांचे व्यक्तिमत्त्व आपल्या नजरेसमोर ठळकपणे उभे राहते. काळेभोर, विशाल आणि भेदक डोळे, मध्यम उंची, भरीव बांधा, उजळ कांती आणि चेहऱ्यावर सतत स्मितहास्य या बाह्यरूपांबरोबरच शिवाजी महाराजांच्या तीक्ष्ण बुद्धी, निर्णय घेण्याची क्षमता, कमालीचे साहस व शौर्य, विलक्षण विचार करण्याची पद्धत अशा अनेक व्यक्तिमत्त्वगुणांचे वर्णन या प्रवाशांनी करून ठेवले आहे. शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर त्यांच्या नित्य वापरात असलेल्या वस्तूंचे काय झाले असावे, याचाही अंदाज एका उताऱ्यावरून आपल्याला येतो. शिवाजी महाराजांच्या पश्चात

*७. बाळकृष्ण यांनी उल्लेखलेला मोंटगोमेरी मार्टिन हा कदाचित प्रसिद्ध रॉबर्ट मार्टिन असावा. परंतु, त्याने शिवाजी महाराजांवर काही लिखाण केलेले वाचण्यात आलेले नाही. फिल्डमार्शल मोंटगोमेरी यांचे नाव मार्टिन नाहीय. डॉ. बाळकृष्ण यांनी सांगितलेला मार्टिन नेमका कोण, हे नक्की सांगता येणे अवघड आहे.*

*८. स्कॉट वारिंग याच्या उताऱ्याचा विचार केल्यास, त्यातील काही बाबी निरर्थक वाटतात. म्हणजे, जोवर शत्रू समोर येत नसे, तोवर मराठ्यांच्या सैन्याला कुणासोबत युद्ध करायचे आहे, हे माहीत नसे. अर्थात, इतिहासात असणारे पुरावे आणि एकूणच घडलेल्या सर्वच गोष्टींचा सारासार विचार करता हे विधान*

त्यांच्या तलवारीला स्वराज्याच्या 'देवघरात' स्थान देण्यात आले.[१] एकूणच काय, तर या सर्व लोकांवर धीरगंभीर, पराक्रमी आणि महान मुत्सद्दी म्हणून शिवाजी महाराजांची छाप पडली होती.

काही प्रसिद्ध परकीय इतिहासकारांनी शिवाजी महाराजांविषयी टिपून ठेवलेल्या काही नोंदी पाहू या. या सर्व नोंदी उत्तरकाळातील आहेत. शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीनंतर शंभर-दीडशे वर्षांनी या इतिहासकारांनी मराठ्यांचा इतिहास जमेल त्या प्रकारे संशोधन करत लिहून ठेवण्याचा प्रयत्न केला. परंतु, तत्कालीन कालखंडात त्यांना मिळालेले काही महत्त्वपूर्ण उल्लेख तसेच लोकांच्या चर्चेमध्ये आलेल्या काही परंपरागत गोष्टींमुळे या नोंदी इथे देणे विपर्यास ठरणार नाही. Historical fragments या जगप्रसिद्ध पुस्तकात रॉबर्ट ऑर्म लिहितो,

'शिवाजीराजाच्या प्रतिभाशक्तीवर आणि तलवार उपसून फौजेच्या आघाडीवर राहण्याचा त्याचा गुण सर्व सैनिक आणि सेनापतींना खूष करत असे.'

'The conquerors, Warriors and Statesmen of India' या जगप्रसिद्ध पुस्तकात जनरल एडवर्ड सलव्हान हे शिवाजी महाराजांविषयी लिहितात, 'राजाच्या अंगी तत्कालीन अशांत स्थितीत यशस्वी होण्यासाठी लागणारे सर्व गुण होते. चर्चेच्या वेळी सावध पण धूर्त आणि कामगिरीच्या वेळी निर्भय, साहस हे त्यांच्यातील विशेष गुण होते. त्यांची सहनशक्ती व ऊर्जा, निर्णयक्षमता अप्रतिम म्हणावी लागेल. त्याच्या देशवासियांनी काढलेल्या त्याच्या चित्रात शुभ्र घोड्यावरून दौड करीत असता तो

---

*हास्यास्पद वाटते. शिवाजी महाराजांनी कोणतीही कृती पूर्वनियोजनाशिवाय केलेली नाही. आपल्या सैन्याला असे अचानक शत्रूसमोर उभे करणे, ही कोणती युद्धनीती असावी? असा प्रश्न पडतो. पण, त्यांनी शिवाजी महाराजांच्या संयम, मनावर असलेला ताबा आणि संपूर्ण प्रदेश पायाखाली घातल्याची जी नोंद नमूद केली आहे, ती निश्चितच गौरवास्पद आणि शिवाजी महाराजांच्या कर्तृत्वाला उजाळा देणारी आहे.*

*१. एक विशेष नोंद इथे सांगावीशी वाटते. संभाजी महाराजांनी 'जुवे बेट' प्रकरणात जातीने लक्ष घातले होते. याच बेटावर झालेल्या लढाईत संभाजी महाराजांनी पोर्तुगीजांविरोधात 'भवानी तलवार' वापरली होती, असा उल्लेख स. शं. देसाई यांनी अनुवादित केलेल्या समकालीन पोर्तुगीज कागदपत्रांमधून आढळतो. एवढेच नव्हे, तर शिवाजी महाराजांच्या नित्यपूजेत असलेला स्फटिक बाण 'चंद्रशेखर' हा राजाराम महाराजांनी आपल्यासोबत बाळगला होता. आज हा बाण सातारा येथे जलमंदिर राजवाड्याच्या देवघरात आहे. शिवाजी महाराजांच्या नित्य वापरातील अनेक वस्तू सातारा, तसेच कोल्हापूर राजघराण्यांकडे आजसुद्धा जतन करून ठेवण्यात आल्या आहेत.*

कच्चे तांदूळ तोंडात टाकीत जात असल्याचे दाखवले आहे.[१०] हे वर्णन निश्चितच अंगावर शहारे आणणारे आहे.

'History of Deccan' या पुस्तकात स्कॉट लिहितो,

'शिवाजीराजा हा अप्रतिम सैनिक होता. शासनकलेत तो निपुण होता. सद्गुणी आणि धर्मशील व्यक्तींचा तो मित्र होता. त्याचे नियोजन हुशारीचे आणि कार्यवाही चिकाटीची असे. तो सर्वांशी विचारविनिमय करी, मात्र निर्णय त्याच्या मनातील उद्देशाला सुसंगत असाच घेई. त्याच्या मनातील उद्देश त्याच्या कार्यवाहीनंतरच स्पष्ट होत असे.'

मराठ्यांचा इतिहास सलगपणे लिहून काढण्याचा पहिला मान मिळतो, तो जेम्स डग्लसला. सातार्‍याला राहून मराठ्यांच्या इतिहासावर मोठ्या प्रमाणात प्रकाश टाकण्याचा प्रयत्न जेम्स डग्लसने केला.[११] त्याच्या प्रसिद्ध पुस्तकात, 'Book of Bombay' मध्ये शिवाजी महाराजांविषयी लिहिताना डग्लस म्हणतो,

'एखादे शिकारीचे सावज जसे सदैव जागरूक आणि सावधान असते, तसाच शिवाजीराजा कोणत्याही आणीबाणीच्या प्रसंगाला तोंड द्यायला सदैव सज्ज असे. या संदर्भात जे राजांच्या बोटांत होते, ते औरंगजेबाच्या संपूर्ण देहात नव्हते. एक डोळा सदैव उघडा असल्याप्रमाणे त्याची झोप सदैव सावध असे. धाडसाच्या बाबतीत ऑर्मची साक्ष अर्थपूर्ण आहे. एका हातात नागवी तलवार घेऊन घौडदौड करीत शिवाजीराजा शत्रूच्या प्रदेशावर चालून जात असल्याचे प्रसंग आपण आपल्या डोळ्यांनी पाहिल्याचे त्याचे सैनिक इतरांना अभिमानाने सांगत असत.'

एकूणच काय, तर शिवाजी महाराजांवर लिखाण करीत असताना डग्लसने ऑर्मच्या

---

*१०. शिवाजी महाराजांची सध्या उपलब्ध असलेली समकालीन चित्रे अतिशय वेगळ्या धाटणीची आहेत. त्यातही, समकालीन मराठी चित्रकारांनी शिवाजी महाराजांची काढलेली चित्रे सध्या तरी अस्तित्वात नाहीत. यात जे वर्णन आले आहे, तशाप्रकरचे चित्र ना एतद्देशीय ना परकीय व्यक्तीने काढले. अगदी अशाच प्रकारचे वर्णन बाजीराव पेशव्यांचेसुद्धा आढळून येते. बादशाह महम्मदशाहला बाजीरावांचा पराक्रम ऐकून त्यांचे चित्र काढून घेण्याची इच्छा निर्माण झाली. तेव्हा, जे चित्र काढण्यात आले त्यात बाजीराव आपल्या घोड्यावर एक पाय मुडपून बसले होते, पाठीवर भाला होता आणि शेतातल्या कणसाचे दाणे हातावर मळून खात होते, अशा आशयाचे चित्र चित्रकाराने चितारल्याचे वर्णन वाचण्यास मिळते. सर रिचर्ड टेंपल यांनीसुद्धा बाजीरावांविषयी अगदी याचप्रकारची नोंद आपल्या पुस्तकात करून ठेवली आहे.*

*११ सन १८८२ साली प्रकाशित झालेल्या 'बुक ऑफ बॉम्बे'मध्ये डग्लसने शिवाजी महाराजांचे एक फार सुंदर चित्र छापले आहे.*

पुस्तकात असलेल्या नोंदीचा पुरस्कार केलेला आपल्याला दिसून येतो. वरील वर्णने वाचल्यास एक गोष्ट आपल्या लक्षात येते, ती म्हणजे शिवाजी महाराजांच्या कमालीच्या धाडसाचे, चाणाक्ष बुद्धिमत्तेचे, संयमाचे, धडाडीच्या निर्णयक्षमतेचे कौतुक करण्यावाचून कुणालाही राहवले नाही. अनेक वर्णनांमध्ये अजून एक गोष्ट सतत अधोरेखित होते, ती म्हणजे शिवाजीमहाराजांचे घोडदळ. शिवाजी महाराज घोड्यावर स्वार होऊन शत्रूच्या मुलूखात जाऊन आपले शौर्य दाखवीत, त्यामुळेच महाराजांच्या सैन्यामध्ये जोश संचारत असे. आपल्या घोडदळाच्या बळावर महाराजांनी कित्येकदा जलद हालचाली करून विजयश्री खेचून आणली होती. महाराजांच्या अंगी असणाऱ्या गुणांमुळे हा राजा एतद्देशीयांबरोबर परकीय लोकांच्याही कौतुकास पात्र होणे साहजिक आहे. राज्यकारभार, प्रशासन आणि राज्यविस्तार हातात हात घालून जगातील आघाडीच्या सेनानायकांच्या रांगेत शिवाजीराजांचे स्थान अव्वल समजले जाते, ही बाब यातून स्पष्ट होते.

ही सर्व वर्णने एकामागून एक मांडत असताना डॉ. बाळकृष्ण म्हणतात, 'हा महान विजेता दैवाचा गुलाम नसून त्याचा स्वामी होता.' या वाक्याला स्पष्टीकरण देताना बाळकृष्ण पुढे म्हणतात, 'वैयक्तिक शौर्य, सेनेचा संघटक, नायक, धैर्य, सावधानता, कल्पकता हे गुण ठळकपणे शिवाजीराजांच्या अंगी दिसून येतात. आपल्या विजयाचा जास्तीत जास्त फायदा उठवणे व शत्रू बेसावध असताना अचानक हल्ला चढवून चकित करणे, याबाबतीत दुसरा कोणताही समकालीन राजा अथवा सरदार महाराजांच्या बरोबरीस उभा राहू शकत नव्हता. जीवावर उदार होऊन हे साहसकृत्य करण्यात महाराज मागचा-पुढचा विचार करीत नसत. असे समर्थ मानवी मन दैवाचे गुलाम कधीच होत नसते. शिवाजी राजा दैवाचा जणू लाडका पुत्रच! साहजिकच, त्यांच्यावर नेहमी विजयाचा वर्षाव होत राहिला.'[१२]

ही सर्व वर्णने एकत्र वाचल्यास महाराजांचे व्यक्तिमत्त्व कसे होते, याचे एक स्पष्ट चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभे राहते. एखाद्या व्यक्तीला पूर्णपणे समजून घेण्यासाठी त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या सर्व बाजूंचा विचार आपल्याला करावा लागतो. शिवाजी महाराजांवर परकीय लेखक, प्रवासी, सैन्य अधिकारी तसेच इतिहास संशोधक-अभ्यासक यांनी किती खोलवर जाऊन निरीक्षण केले आहे, याचा आपल्याला वरील नोंदी वाचून अंदाज येऊ शकतो. आता काही स्वदेशी बखरकार तसेच समकालीन लेखकांनी शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वावर काय लिहून ठेवले आहे, याकडे एक

१२. *छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथ*, पृ. ५५

दृष्टिक्षेप टाकू.

समकालीन साधनांमध्ये सर्वोच्च स्थानी असलेले साधन म्हणजे 'शिवभारत'. कवींद्र परमानंद याने हा ग्रंथ रचला. आपले पराक्रमी आजोबा मालोजीराजेंपासूनचा इतिहास लिहिण्याची आज्ञा आपल्याला खुद्द शिवरायांनीच दिली, असे परमानंद लिहितो. हा काव्यात्मक ग्रंथ संस्कृत भाषेत रचलेला असून यामध्ये एकूण बत्तीस अध्याय आणि २२६२ श्लोक आहेत. मात्र, हा ग्रंथ अर्धवट आहे. इतिहासअभ्यासक स. मा. दिवेकर यांनी अतिशय प्रतिकूल परिस्थितीत या ग्रंथाची मूळ प्रत तंजावरच्या 'सरस्वती महाल' मधून मिळवली आणि अनुवादनाचे काम पूर्ण केले. शिवाजी महाराजांनी दिलेल्या आदेशावरून रचण्यात आलेले 'शिवभारत' अतिशय महत्त्वाचे आणि विश्वसनीय समकालीन साधन आहे. शिवजन्म आणि अफजलखान वध सोडला तर इतर कोणत्याही तिथी-तारखांचा उल्लेख शिवभारतात नाही. पण दिलेल्या दोन्ही तारखा अगदी अचूक आहेत. शिवजन्माची तारीख निश्चित करण्यासाठी शिवभारताची फार मदत झाली. सन १९२७ मध्ये श्री. स. मा. दिवेकर यांनी 'शिवभारत' प्रकाशित केले. शिवचरित्राचा अभ्यास करणाऱ्या संशोधकांसाठी 'शिवभारत' विश्वसनीय साधन आहे. या ग्रंथाच्या २१व्या अध्यायात अफझलखानाच्या भेटीसाठी सज्ज होणाऱ्या छत्रपती शिवाजीराजांचे रूप वर्णिले आहे. परमानंद म्हणतो,

'उत्तम कवच घातलेला शिवाजी राजा भोसला, तुरा खोवलेल्या शुभ्र पगडीने व केशराचा शिडकाव मारलेल्या अंगरख्याने फारच शोभत होता. त्या वज्रशरीरास कवचाची काय गरज?'[१३] पुढे परमानंद म्हणतो,

'एका हातात पट्टा व दुसऱ्या हातात तलवार धारण करणारा तो शिवाजी राजा, प्रत्यक्ष नंदक खड्ग व कौमुदकी गदा धारण करणाऱ्या विष्णूप्रमाणे दिसत होता.'

परमानंदाने शिवाजी महाराजांच्या आज्ञेने हा ग्रंथ पूर्ण केला, असा निर्वाळा त्याने स्वतः ग्रंथाच्या सुरुवातीस दिलेला आहे. राजाच्या छत्रछायेखाली राहून कला, साहित्य यांची वृद्धी होत असल्याचे पुरावे आपल्याला प्राचीन काळापासून आढळून येतात. एवढेच कशाला, 'राधामाधवविलासचंपू' हा शहाजी महाराज आणि जिजाऊ माँसाहेब यांच्या आयुष्यावर आधारित काव्यमय ग्रंथ लिहिणाऱ्या जयराम पिंड्येला शहाजीराजांकडून 'राजाश्रय' होता. राजाप्रती असणारी आदरयुक्त भावना, राजाच्या आश्रयाखाली झालेली कलेची वृद्धी आणि उपकाराच्या भावनेतून कवी अथवा

*१३ मूळ शिवभारत संस्कृत भाषेत रचण्यात आले आहे. परंतु, सदर पुस्तकात केवळ त्या संस्कृत श्लोकांचा मराठी अनुवाद समाविष्ट करण्यात आला आहे.*

रचनाकार राजाचे वर्णन करताना कौतुकाच्या भावनेत त्याच्या पराक्रमाची तुलना तो अतुलनीय अशा देव-देवतांसोबत करतो. राजाला प्रत्यक्ष भगवंताचा अवतार समजून त्याच्या शौर्याला वेगळीच उंची देण्याचा प्रयत्न करतो. राजाच्या मदतीमुळे त्याचे आश्रित, दरबारी, त्याची प्रजा सुखसमाधानाचे आणि ऐश्वर्याचे आयुष्य जगत असते. म्हणूनच, या सर्वांच्या दृष्टीने राजा देवासमान असतो. याच भावनेतून परमानंदाने शिवाजी महाराजांची तुलना गदाधारी विष्णूसोबत केली. याचा अर्थ शिवाजी महाराजांना देवत्व देणे अथवा त्यांना प्रत्यक्ष विष्णूचा अवतार ठरवणे योग्य नव्हे. शिवभारत लिहिणारे कवींद्र परमानंद ही एक धार्मिक व्यक्ती होती. तत्कालीन काळाचा आणि धार्मिक परिस्थितीचा एकूणच विचार करता देवदेवतांचे प्रभुत्व समाजावर जोरदारपणे प्रस्थापित झालेले होते. एक व्यक्ती म्हणून शिवाजी महाराजांनी त्यांच्या आयुष्यात केलेले पराक्रम, त्यांचे साहस आणि त्यांनी केलेले कार्य अतुलनीय होते. पौरुष, स्वाभिमान आणि शौर्याचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे छत्रपती शिवाजी महाराज! त्यामुळे कवीने जरी ही तुलना केली असली तरीही ते अलंकारिक वर्णन आहे, कवीचा कल्पनाविलास आहे. त्याला किती महत्त्व द्यावे, हे आपल्यावर आहे.

पुढे, २९ व्या अध्यायात परमानंद म्हणतो,

'भालदारांनी तेथे त्याची वर्दी दिल्यावर (मोगली दूत) त्याने मस्तक लववून आजानुबाहू शिवाजी राजांचे दुरून दर्शन घेतले. तो अतिसुंदर व उंच मानेच्या, रुंद छातीच्या, शिकवलेल्या, सुलक्षणी, धिप्पाड शरीराच्या, महाबलवान, दोन्ही बाजूंस पंखांप्रमाणे बाणांचे दोन भाते असलेल्या. रत्नजडित अलंकार घातलेल्या अशा घोड्यावर-गरुडावर विष्णू बसतो तसा आरूढ होऊन अंगात कवच घातलेल्या व हातात धनुष्यबाण व तलवार असणाऱ्या घोडदळाच्या समूदायामध्ये होता. त्याच्या अंगावर अभेद्य असे कवच होते. त्याच्या मस्तकावर उत्कृष्ट शीरस्त्राण शोभत होते. वैकक्ष हारासारखा व प्रचंड ढालीने शोभणारा दुपेटा त्याने परिधान केला होता. सोनेरी कमरपट्ट्यात लटकणाऱ्या तलवारीच्या योगे तो शोभत होता. त्याच्या तेजस्वी उजव्या हातात उंच भाला होता. तो अत्यंत सौम्य असूनही आपल्या तेजाने अत्यंत उग्र दिसत होता.'

ही वर्णने समजून घेतल्यास एक गोष्ट ठळकपणे जाणवते, ती म्हणजे शिवाजी महाराजांनी प्रसंगानुरूप धारण केलेला पेहराव. अफझलखान वधासमयी महाराजांनी परिधान केलेल्या पेहरावामध्ये संपूर्णपणे स्वसंरक्षणात्मक योजना आखल्याचे पाहायला

मिळते. यात शिवाजी महाराजांनी मस्तकावर धारण केलेल्या पगडीचे वर्णन सर्वात महत्त्वाचे. शिवाजीराजांच्या उपलब्ध असणाऱ्या समकालीन चित्रांमध्ये त्यांनी धारण केलेली विशिष्ट पगडी आपल्याला आढळते. अनेक चित्रांतील पगडी आणि इथे दिलेल्या वर्णनात एक समानता आहे, ती म्हणजे शुभ्र पगडीत खोवलेला तुरा. शिवाजी महाराजांच्या बऱ्याच चित्रांमध्ये तुरा खोवलेली वैशिष्ट्यपूर्ण अशी पांढरी पगडी दिसून येते. दुसरे वर्णन आहे उंबरखिंडीतले. कारतलबखानाचा माज ज्या ठिकाणी शिवाजीराजांनी मोडला, त्या उंबरखिंडीतील युद्धासाठी शिवाजी महाराज नेमके कसे सिद्ध झाले, याबाबतचे हे वर्णन. शिवाजीराजे युद्धास जात असताना कशाप्रकारे वेशभूषा करत हे यात सविस्तरपणे वाचायला मिळते. 'शिवभारता'त या स्वरूपाचे आलेले हे एकमेव विस्तृत वर्णन. अजून एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे शिवाजी महाराजांच्या घोड्याचे सुद्धा वर्णन आपल्याला यात आढळते. शिवाजी महाराजांचा घोडा नेमका कसा होता, त्याचे विशेष गुण कोणते होते, त्याच्या अंगावर कोणत्या प्रकारच्या अलंकारांची सजावट होती याचे उल्लेख आपल्याला वाचायला मिळतात. मनूचीच्या संग्रहात असणाऱ्या दोन चित्रांमध्ये शिवाजी महाराज अश्वारूढ आहेत. इतर समकालीन चित्रांमध्ये शिवाजी महाराज उभे असल्याचे आढळून येते. विशेष म्हणजे मनूचीच्या संग्रहात असणाऱ्या चित्रातील घोडा आणि शिवभारतात वर्णिलेल्या घोड्यामध्ये भरपूर साम्य आहे. म्हणजेच, उंबरखिंडीतील वर्णन वाचत असताना त्या चित्रातील घोडा जरी नजरेसमोर आणला तरीही चालेल, इतके ते वर्णन जुळून येते. दोन समकालीन साधनांमधून एकाच गोष्टीविषयी तंतोतंत जुळून येणाऱ्या नोंदी असतील तर त्या साधनांचे ऐतिहासिक महत्त्व किती असेल, याचा आपण अंदाज लावू शकतो.

दुसरे म्हणजे खानाला कोंडीत पकडायला निघालेल्या शिवाजी महाराजांनी केलेली सिद्धता. अंगात घातलेले कवच, डोक्यावर उत्कृष्ट शिरस्त्राण, प्रचंड मोठी ढाल, सोनेरी कमरपट्ट्यात लटकणारी तलवार, उजव्या हातात लांब भाला, डाव्या हातात धनुष्यबाण असे तेजस्वी रूप. हे सारे वाचत असताना शिवाजी महाराजांची युद्धसज्ज प्रतिमा नजरेसमोर तरळून जाते. युद्धभूमीवर असे रूप धारण केलेला राजा असेल, तर सैनिकांच्या अंगात कित्येक हत्तींचे बळ येत असेल!

शिवकाळातील अजून एक विश्वसनीय साधनग्रंथ म्हणजे 'सभासद बखर'. कृष्णाजी अनंत सभासद याने ही बखर पूर्ण केली. छत्रपती संभाजी महाराजांच्या दुर्दैवी मृत्यूनंतर राजाराम महाराज स्वराज्याचे छत्रपती झाले. अतिशय खडतर परिस्थितीत त्यांनी

स्वराज्याचे रक्षण केले, संवर्धन केले. एवढ्या धामधूमीच्या परिस्थितीतसुद्धा राजाराम महाराजांनी अत्यंत नेटाने लढा दिला. याचदरम्यान राजाराम महाराजांनी आपल्या पदरी असणाऱ्या कृष्णाजी अनंत सभासदास शिवरायांचे चरित्र लिहिण्याची आज्ञा केली. हीच बखर 'सभासद बखर' म्हणून प्रसिद्ध आहे. या बखरीच्या पाच प्रती अभ्यासकांना उपलब्ध झाल्या, ज्यातील दोन अस्सल तर तीन नक्कल केलेल्या होत्या. इतिहास संशोधक का. ना. साने यांनी सदर बखरीचे संपादन केले.

यात तीन प्रसंगाची नोंद आवर्जून घेण्यासारखी आहे. पहिला प्रसंग, अफझलखान वध, दुसरा सुरतेची स्वारी- वणीदिंडोरीची लढाई आणि तिसरा प्रसंग छत्रपती शिवाजी महाराजांच्या भागानगरी भेटीचा. आधी सभासद काय सांगतो ते पाहू. अफझलखान भेटीची सिद्धता करताना सविस्तर वर्णन करताना सभासद लिहितो,

'खासा राजियांनी स्नान करून भोजन केले. जरीची कुडती घातली. डोईस मंदील बांधिला. त्यांत तोडा बांधिला. पायात चोळणा घालून कास कसली व हातात एक बिचवा व वाघनख चढविले. बराबर जिऊ महाला म्हणून मर्दाना होता. त्याजवळ एक पट्टा व एक फिरंग व ढाल, तैसाच संभाजी कावजी महालदाराजवळ पट्टा, फिरंग व ढाल ऐसे दोघे माणसे मर्दानी आपणाबराबरी भेटीस घेतली.'

अफझलखान वधासाठी शिवाजी महाराजांनी जी सिद्धता केली, त्याचे बरेचसे मिळतेजुळते वर्णन सभासद बखर आणि शिवभारतात आपल्याला दिसून येते. शिवचरित्राचा अभ्यास करत असताना अशी अनेक साम्यं विविध साधनांत आपल्याला आढळून येतात.

आता पुढील गोष्टीकडे वळू या. 'सुरत' हे मुघलांच्या साम्राज्यातील एक महत्त्वाचे बंदर. या शहरात अनेक धनाढ्य व्यापारी राहत असत. इंग्रज, फ्रेंच, मुघल, पर्शियन, आर्मेनियन, डच, हबशी, पोर्तुगीज, अफगाणी, इराणी लोकांच्या व्यापारासाठी ही अत्यंत उपयुक्त जागा. अनेक परकीय सत्तांच्या वखारीसुद्धा या शहरात होत्या. सुरतेमध्ये वीरजी व्होरा, मोहनदास व शांतीदास झवेरी, हाजी कासम, सैद बैग, हरी वैश्य यांसारखे अतिश्रीमंत व्यापारी राहत असत. सुरत शहरातून जाणाऱ्या महसुलापैकी निम्म्यापेक्षा जास्त महसूल एकट्या वीरजी व्होराचा होता. सोने, चांदी, कापड, मसाले, धान्य, जनावर; इतकेच नाही, तर गुलामांची विक्रीसुद्धा या बाजारात होई. मक्केला जाण्यासाठी सर्व भाविक सुरतेच्या बंदरावरूनच निघत असत, त्यामुळे या शहराला मक्केचे प्रवेशद्वार म्हटले जाई. अशा सुरतेवर शिवाजी महाराजांनी दोनदा

स्वारी केली आणि मुघल साम्राज्याच्या जोरदार कानशिलात लगावली. पहिल्या सुरत स्वारीनंतर तिथल्या इंग्रज वखारीचा प्रेसिडेंट सर जॉर्ज ओक्सिंडेन याने लंडन येथील ईस्ट इंडिया कंपनीच्या मुख्य कार्यालयाला २६ नोव्हेंबर १६६४ रोजी लिहिलेले पत्र बरेच बोलके आहे. तो लिहितो,

'जेव्हापासून 'तो' इथे येऊन गेला आहे, तेव्हापासून आम्ही सगळेच भीतीच्या छायेखाली वावरत आहोत. असे वाटत आहे की 'तो' पुन्हा येईल आणि तसाच अग्नीप्रलय पुन्हा घडेल. तो शहराजवळ आल्याच्या नवनवीन अफवा रोज उठत आहेत. भीतीने लोक सैरावैरा पळत आहेत. जे लोक तेव्हा शहर सोडून गेले, ते अजून आले नाहीत. वीरजी व्होरा, हाजी कासम आणि इतर व्यापारी अजूनही आजारीच आहेत. सर्वशक्तिमान बादशाहने आम्हाला दिलासा देण्याचा प्रयत्न केला, पण तोच स्वतः हादरून गेला आहे. सध्या तरी इथे शांतता आहे, पण तीही भीषण वाटत आहे. 'तो' पुन्हा येऊ नये, म्हणून आम्ही सगळेच देवाकडे प्रार्थना करीत आहोत.'

शिवाजी महाराजांनी पहिल्यांदा सुरतेवर स्वारी केल्यानंतर तिथले वातावरण असे दहशतमय झाले होते. सुरतेवरून लिहिलेल्या अजून एका पत्रात शिवाजी महाराजांच्या पराक्रमाचे वर्णन वाचायला मिळते. पत्रात लिहिले आहे,

'हा खोडसाळ शिवाजी लुटीसाठी इतका कुप्रसिद्ध आहे, की आलेल्या अहवालानुसार तो जणू हवाई शरीराचा (airy body) असून त्याला पंख आहेत. अन्यथा लोक सांगतात त्याप्रमाणे तो एकाच वेळी अनेक ठिकाणी कसा हजर असू शकतो? काही वेळा तो एका ठिकाणी असल्याचे दिसून येते, तर एक-दोन दिवसांतच फार दूरच्या स्थळी हजर असल्याचे समजते. नंतर असाच तो पाच-सहा ठिकाणी आढळून येतो आणि तेथे अमाप जाळपोळ आणि लुटालूट करतो. त्याच्या हर्क्युलससारख्या पराक्रमाचे वर्णन करणे महाकर्मकठीण आहे. तो सर्वच लोकांच्या चर्चेचा विषय बनला आहे.

परत एकदा मराठ्यांचे सैन्य शिवाजी महाराजांच्या नेतृत्वाखाली सुरतेवर[१४] चालून

*१४. या दुसऱ्या सुरत स्वारीची बातमी "The London Gazette' या तत्कालीन वृत्तपत्रामध्ये छापून आली होती. लंडनच्या राजाची अधिकृत मान्यता असलेले हे वृत्तपत्र होते. युरोप, उत्तर अमेरिका तसेच आशिया खंडात ज्या ज्या ठिकाणी इंग्रजांच्या वसाहती आहेत, त्या सर्व ठिकाणी हे वृत्तपत्र वितरीत करण्यात येई. शहर तसेच गावांच्या चौकांमध्ये उभारून सरकारी निवेदक हे वृत्तपत्र वाचत असे. १७ फेब्रुवारी ते २० फेब्रुवारी १६७२ दरम्यान प्रकाशित झालेल्या वृत्तपत्राच्या पहिल्या पानावर शिवाजी महाराजांची बातमी छापून आली होती, ज्यात शिवाजी एक बंडखोर, ज्याने मोगलांना अनेक लढायांत पराजित केले आहे.*

गेले. सुरतेला 'बदसुरत' केले. शिवाजी महाराज जेव्हा हे सर्व धन घेऊन परतत होते तेव्हा साल्हेर किल्ल्यानजिक त्यांना मुघलांच्या फौजेशी सामना करावा लागला. हीच ती जगप्रसिद्ध वणीदिंडोरीची लढाई. या लढाईत शिवाजी महाराजांनी आडमार्गाने सर्व धन सुरक्षित ठिकाणी हलवले आणि मुघलांच्या फौजेला खासे जाऊन भिडले. या लढाईचे वर्णन सभासदाने फार थोडक्यात पण मार्मिकपणे केले आहे. तो लिहितो,

'राजा खासा घोड्यावर बसून बख्तर घुगी घालून, हाती पटे चढवून मालमत्ता घोडी, पाईंचे लोक पुढे रवाना करून, आपण दहा हजार स्वारांनिशी सडे सडे राऊत उभे राहिले.' शिवाजी महाराजांचे जेवढे वर्णन आपण वाचले, त्यांमध्ये हे वर्णन सर्वात वेगळे आणि प्रचंड आश्वासक आहे, असे वाटते. कारण, दहा हजार फौजेच्या तोंडावर खासा राजा नेतृत्व करीत उभा आहे, तेसुद्धा दोन्ही हातात पट्टे चढवून! या लढाईत शिवाजी महाराजांनी किती अतुलनीय शौर्य गाजवले असेल, याची केवळ कल्पना केली तरी अंगावर शहारे येतात. युद्धसज्ज शिवछत्रपतींचे हे रूपवर्णन दुर्मिळ आणि प्रेरणादायी आहे, हे निश्चित.

यानंतरचा अजून एक महत्त्वाचा प्रसंग म्हणजे छत्रपती शिवाजी महाराज आणि कुतुबशहा यांची भागानगरी येथे झालेली भेट. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकानंतर निघालेली ही पहिली प्रचंड मोठी मोहीम होती. दक्षिणेच्या छोट्या-मोठ्या राज्यांना एकत्र करणे आणि स्वराज्याचा विस्तार करणे या हेतूने शिवाजी महाराजांनी कर्नाटकची मोहीम आखली होती. शिवाजी महाराजांची अनेक समकालीन चित्रे याच कर्नाटकस्वारीमुळे अस्तित्वात आली. यावेळेस शिवाजी महाराजांचे भव्य स्वागत करण्यासाठी कुतुबशाहने कशी व्यवस्था केली होती, याचे सविस्तर वर्णन करताना बखरकार म्हणतो,

'सुमुहूर्त पाहून पातशहाचे भेटीस नगरामध्ये चालिले. पातशाहांनी कुल नगर शृंगारिले. चौफेरी बिदीस कुंकुम-केशराचे सडे, रंगमाळा घातल्या. गुढीया, तोरणे, पताका, निशाणे नगरात लाविली. नगर नागरिक लोक कोट्यानकोटी राजास पाहावयास उभे राहिले. नारींनी मंगळआर्ता अगणित उजळून राजियास वंदिले. सोने-रुपियांची फुले राजियावरि उधळली.'

---

*तो आता जवळजवळ सबंध देशाचा शासनकर्ता बनला आहे, असे छापून आले होते. जगभरात वितरीत होणाऱ्या या वृत्तपत्राच्या पहिल्या पानावर शिवरायांची बातमी छापून येणे, ही निश्चितच अभिमानाची बाब आहे. राजकीयदृष्ट्या शिवाजी महाराजांचे महत्त्व इंग्रजांनी ओळखले होते.*

शिवाजी महाराज हे एक अभिषिक्त सम्राट म्हणून कुतुबशाहच्या भेटीस गेले होते. त्यांनी स्वबळावर एक साम्राज्य उभा केले होते, त्यामुळे त्यांचे स्वागतसुद्धा एखाद्या सम्राटाला शोभेल असेच व्हायला हवे, या गोष्टीकडे कुतुबशाहचे मंत्री मादण्णा आणि आकण्णा यांनी जातीने लक्ष दिले होते. स्वराज्यासाठी सर्वांगांनी ही स्वारी अतिशय यशस्वी ठरली. दख्खनेतल्या सर्व सत्तांची मोट बांधून दिल्लीवर आक्रमण करण्याची त्यांची योजना होती. एकूणच काय, तर सभासद आपल्या लेखणीतून शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकण्याचे काम करतो.

शिवाजी महाराजांच्या काळातच काही परकीय व्यक्तींनी शिवाजीराजांना प्रत्यक्ष पाहिले होते. त्यातील काही जणांनी त्या भेटीचे वर्णन लिहून ठेवले आहे. या सर्व नोंदींमध्ये एका इंग्रज व्यक्तीच्या डायरीमध्ये एक महत्त्वाची नोंद आढळते. या व्यक्तीचे नाव 'हेन्री ऑक्झेंडन'. ६ जून १६७४ हा तमाम मराठीजनांसाठी स्वाभिमानाचा दिन. रायगड किल्ल्यावर शिवाजीराजांना राज्याभिषेक झाला आणि मराठा स्वराज्याच्या पहिल्या छत्रपतीची अधिकृत घोषणा झाली. या प्रसंगी तमाम भारतातील छोट्या-मोठ्या राजेरजवाड्यांचे प्रतिनिधी शिवाजी महाराजांना शुभेच्छा देण्यासाठी रायगडावर उपस्थित होते. ऑक्झेंडनसुद्धा यासमयी रायगडावर होता. शिवाजी महाराज आणि इंग्रजांमध्ये कित्येक वर्षांपासून तहाच्या वाटाघाटी सुरू होत्या. कोकणच्या प्रदेशात व्यापार वाढवणे, राजापूरच्या वखारीत मराठ्यांच्या सैन्यामुळे झालेले नुकसान भरून काढणे, नव्या सवलती मिळवणे, पूर्वी झालेल्या तहावर पुन्हा एकदा शिक्कामोर्तब करून घेणे, नवीन मागण्या कायमस्वरूपी मंजूर होतील अशी व्यवस्था करणे, स्वराज्यात आपले (इंग्रजांचे) चलन चालवण्यासाठी परवानगी मिळवणे या आणि अशा अनेक मागण्या होत्या. आपल्याला हव्या त्या गोष्टी पदरात पाडून घेता येतील, या हेतूने इंग्रजांच्या वखारीतून हेन्री ऑक्झेंडनची रायगडावर रवानगी झाली. दुभाषी म्हणून नारायण शेणवी यास सोबत देण्यात आले. २४ मार्च १६७४ रोजी ऑक्झेंडन आणि नारायण शेणवी गडाच्या पायथ्याला येऊन पोहोचले. काही दिवसांनी तहाच्या अटींवर दोन्ही बाजूंनी शिक्कामोर्तब झाला. ही आनंदाची बातमी मुंबईच्या डेप्युटी गव्हर्नरपर्यंत पोहोचवण्यासाठी नारायण शेणव्याने एक पत्र लिहिले,

'येत्या जूनमध्ये राज्याभिषेक करून घेण्याच्या उद्देशाने 'शिवाजी' तयारी करत आहे. सोने, हिरे यांनी जडवलेले भव्य सिंहासन तयार होत आहे. असंख्य विद्वानांना निमंत्रण जाईल. रायगडावर फार मोठ्या प्रमाणात दानधर्म होईल. आता ऑक्झेंडनसोबत शिवाजीकरिता चांगला नजराणा पाठवा. अरबी घोडा वगैरे न धाडता

राज्याभिषेकासमयी धारण करण्याजोगी मौल्यवान रत्ने पाठवावीत. नजराणा हजार-बाराशे रुपयांचा पाठवावा.'[१५]

सदर पत्र इथे देण्याचे कारण म्हणजे शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकासमयी नारायण शेणवी याने केलेली मागणी इंग्रजांच्या वखारीतून मंजूर झाली. शिवाजी महाराजांसोबत होणाऱ्या तहाच्या वाटाघाटी संपल्यानंतर हा नजराणा राज्याभिषेकावेळी नजर करण्याची जबाबदारी हेन्री आणि नारायण शेणवी यांच्यावरच आली. या हेन्रीला डायरी लिहिण्याची सवय होती. रायगडावर झालेल्या त्या ऐतिहासिक वकिलीचे त्याने प्रतिनिधित्व केले. त्याच्या डायरीमध्ये केलेल्या नोंदीवरून शिवाजी महाराज, रायगड, राज्याभिषेक उत्सव आणि मराठ्यांच्या दैनंदिन जीवनावर मोठा प्रकाश पडला.[१६] या समकालीन, ऐतिहासिक नोंदी आपल्यासमोर येण्यासाठी नारायण शेणवीचे हे पत्र कारणीभूत ठरले. शेणवीच्या सांगण्यावरून ६ मोत्ये, ३ अंगठ्या, एक शिरपेच, २ सालकड्या अशी एकूण ३,३१४ रुपयांची खरेदी सुरतेहून करण्यात आली.[१७]

या जोडगोळीची शिवाजी महाराजांसोबत पहिली भेट झाली २६ मे १६७४ रोजी. शिवाजी महाराज आणि संभाजी महाराजांना काही मौल्यवान भेटवस्तू 'नजराणा' म्हणून त्यांनी अर्पण केल्या. त्यांची राहण्याची व्यवस्था भवानी टोकाच्या जवळ एका इमारतीत केली होती. १३ जूनपर्यंत हेन्री रायगडावर होता. वीस कलमांच्या तहावर अंतिम शिक्कामोर्तब झाल्यावरच तो गडाखाली उतरला.[१८] राज्याभिषेकासारखा एवढा मोठा, महत्त्वाचा मंगलसोहळा साजरा होत असतानाही शिवाजी महाराजांचे

१५. *रायगडाची जीवनकथा*

१६. *हेन्रीच्या डायरीतील नोंदी अतिशय मनोरंजक आहेत. यातील एक इथे आवर्जून सांगावीशी वाटते. जेव्हा हेन्री आणि नारायण शेणवी रायगडाला निघाले, तेव्हा त्यांचा मुक्काम रेवदंड्याला पडला. रात्री आठ वाजताच रेवदंड्याच्या वेशी बंद होताना त्यांनी पाहिले. कुतूहल म्हणून चौकशी केली असता, शिवाजी महाराजांच्या भीतीने लवकर दरवाजे बंद केल्याचे तिथल्या स्थानिक लोकांकडून समजले. पूर्ण दख्खनेत मोठ्या प्रमाणात महाराजांचा भीतियुक्त दरारा असल्याचे यावरून आपल्याला दिसते.*

१७. *त्यावेळी सुरतेचा प्रेसिडेंट जॉर्ज ऑक्झेंडन होता. हा हेन्रीचा भाऊ. पुढे राज्याभिषेकानंतर दोन वर्षांनी म्हणजेच १६७६ साली हेन्री मुंबईचा डेप्युटी गव्हर्नर झाला. शिवाजी महाराजांमुळेच इंग्रजांनी आपली सुरतेची वखार मुंबईस हलवली. अप्रत्यक्षपणे आजचे मुंबईचे आंतरराष्ट्रीय व्यापारी केंद्र होण्यास शिवाजी महाराजच कारणीभूत ठरले.*

१८. *Factory records, भाग ६, पृ.क्र, १२४-१२८.*

१९. *रायगडाची जीवनकथा*

२० *पसासं, १६४३*

स्वराज्याकडे पुरेपूर लक्ष होते, हेच यावरून समजते. एवढ्या धामधुमीत सुद्धा शिवाजी महाराजांनी इंग्रजांसोबत वाटाघाटी केल्या आणि आपल्याला हवा तसा तह इंग्रजांना मान्य करण्यास भाग पाडले. 'अष्टावधानजागृत' हा शिवाजी महाराजांचा गुण विशेषत्वाने वाखणण्यासारखा आहे. राज्याभिषेकादिवशी गडावर उपस्थित असल्यामुळे हेन्रीने संपूर्ण समारंभाचे यथोचित वर्णन केले आहे. मंत्रमुग्ध करणाऱ्या त्या ऐतिहासिक मंगल कार्यक्रमाचे सविस्तर वर्णन इथे देणे योग्य राहील. कारण, याच लिखाणात हेन्रीने शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकला आहे. आधी राज्याभिषेकासंबंधी त्याने काय निरीक्षण केले, ते पाहू या.

सकाळी सात-आठच्या सुमारास हेन्री दरबारात पोहोचला. त्याने शिवाजी महाराजांना लवून मुजरा केला. नारायण शेणवीने हिरेजडीत अंगठी वर धरली. तिच्यावरून सूर्यकिरण परावर्तीत झाले, ज्यामुळे शिवाजी महाराजांचे लक्ष हेन्रीकडे वळले. शिवाजी महाराजांनी त्याला सिंहासनाच्या पायरीजवळ बोलावून घेतले. हेन्रीने ती अंगठी शिवाजी महराजांना नजर केली. शिवाजी महाराजांनी पोषाख देऊन त्याची पाठवणी केली. अगदी थोडाच वेळ तो सिंहासनाजवळ उभा होता. त्या वेळेत त्याने जे जे पाहिले, ते ते आपल्या डायरीत टिपून ठेवले.[१९]

'सिंहासनाच्या दोन्ही बाजूंस सुवर्णांकित भाल्याच्या टोकावर अनेक अधिकार निदर्शक व राजसत्तेची द्योतक चिन्हे मी पाहिली. उजव्या हाताला मोठ्या दातांच्या मत्स्यांची दोन मोठी सुवर्णाची शिरे होती. डाव्या हातास अनेक अश्वपुच्छे व एक मौल्यवान भाल्याच्या टोकावर समपातळीत लोंबणारी सोन्याच्या तराजूंची पारडी न्यायचिन्ह म्हणून तळपत होती. राजवाड्याच्या प्रवेशद्वारी आम्ही परत आलो, तिथे दोन लहान हत्ती दरवाज्याच्या दोन्ही बाजूंस झुलत होते. दोन देखणे पांढरे अश्व शृंगारलेल्या स्थितीत तेथे आणलेले दिसत होते. गडाचा मार्ग इतका बिकट, की हे प्राणी कुठून वर आणले असावेत याचा तर्कच आम्हाला करवेना.'[२०] या प्रसंगी हेन्रीने एक महत्त्वाची नोंद केली आहे. 'भगवा ध्वज' हे सार्वभौम राज्याचे निशाण म्हणून, तर 'जरीकिनार असलेला ध्वज'[२१] राष्ट्रीय उत्सवाच्या वेळी वापरण्याचे ठरवण्यात आले. पुढे हेन्रीने लिहिले आहे, जे सर्वात महत्त्वपूर्ण आहे-

'शिवाजी ४७ वर्षांचा असून देखणा होता, त्याच्या चर्येवरून त्याची बुद्धिमत्ता व चाणाक्षपणा सहज ध्यानात येई. त्याचा वर्ण इतर मराठ्यांपेक्षा पुष्कळच गौर होता. त्याची दृष्टी तीक्ष्ण असून नाक सरळ व टोकाशी बाकदार होते. त्याच्या दाढीस

*१९. रायगडाची जीवनकथा*

*२० पसासं, १६४३*

*२१ जरीकिनार - सोनेरी कापडाचा काठ.*

निमूळतेपणा असून बारीक मिशी (म्हणजे विरळ) होती. त्याचे भाषण निश्चयपूर्ण, स्पष्ट पण जलद होते.'[२२]

शिवाजी महाराजांना प्रत्यक्ष पाहून त्यांचे वर्णन करणाऱ्या काही मोजक्या लोकांमध्ये हेन्री आघाडीवर आहे. शिवाजी महाराजांचं व्यक्तिमत्त्व त्याने अगदी जवळून पाहिले. 'शिवाजीराजे वर्णाने इतरांपेक्षा गौरवर्णीय आहेत, त्यांची दृष्टी तीक्ष्ण आहे. नाक, दाढी, मिशी... ' या सर्व गोष्टींचे वर्णन शिवाजीराजांच्या उपलब्ध असणाऱ्या समकालीन चित्रांशी तंतोतंत मिळतेजुळते आहे. हेन्रीने शिवाजीराजांच्या वजनाविषयीसुद्धा लिहून ठेवले आहे. २९ मे १६७४ रोजी शिवाजीराजांची सुवर्णतुला झाली, त्यावेळी त्यांचे वजन १६,००० होन भरले. डचांच्या पत्रव्यवहारात आलेल्या नोंदीनुसार शिवाजीराजांची सोन्याबरोबरच चांदी, तांबे, जस्त, कथील, शिसे, लोखंड, ताग, कापूर, मीठ, खिळे, जायफळ, मसाले, लोणी, साखर, सर्व प्रकारची फळे, खाद्य या वस्तूंनीही तुला करण्यात आली होती.[२३] राज्याभिषेक सोहळ्याचे सविस्तर वर्णन उपलब्ध करून देणारी हेन्री ही एकमेव परकीय व्यक्ती. शिवाजी महाराजांच्या भोवती सुवर्णांकित भाल्याच्या टोकावर कोणकोणती शुभचिन्हे दिसत होती, याचेही वर्णन आपल्याला वाचायला मिळते. रायगडावर सजलेला राजदरबार आणि त्याचे वर्णन थेट शिवकाळात घेऊन जाणारे आहे. हेन्रीची ही भेट ऐतिहासिकदृष्ट्या अनेकांगांनी महत्त्वपूर्ण ठरली, हेच यावरून आपल्याला समजून येईल.

इसवी सन १९३९ मध्ये सर यदुनाथ सरकार यांना जयपूरच्या दफ्तरखान्यात राजस्थानी हिंदीच्या 'डिंगल' या बोलीभाषेत लिहिलेली काही पत्रे सापडली. छत्रपती शिवाजी महाराज आग्र्यास गेले असताना तिथे घडलेले राजकारण आणि घडलेल्या घटना हा या पत्रांचा मुख्य विषय होता. या पत्रांची संख्या ६८ इतकी आहे. शिवाजी महाराज आग्र्यात असताना त्यांच्यावर काय काय प्रसंग आले, ते प्रत्यक्ष पाहिलेल्या अधिकाऱ्यांचीही पत्रे आहेत. हा पत्रसंग्रह सर यदुनाथ सरकार आणि डॉ. रघुबिर सिंह यांनी संपादित करून प्रसिद्ध केला. यातील काही पत्रे अशा गोष्टींवर प्रकाश टाकतात

*२२ षष्ठसंमेलन वृत्त, पृ.५७ ते ६२*

*२३. अगदी याचप्रकारची एक नोंद वेंगुर्ल्याच्या डच वखारीतून अब्राहम ले फेबरने जॉन मास्टर या गव्हर्नर जनरलला १३ ऑक्टोबर १६७४ रोजी लिहिलेल्या पत्रात दिसून येते. यामध्ये अजून एक महत्त्वाची गोष्ट वाचायला मिळते, ती म्हणजे शिवाजी महाराजांच्या सिंहासनाचे 'शिवराज' असे नामकरण करण्यात आले होते. डच दफ्तराच्या खंड ३४ मध्ये शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेक सोहळ्याचे वर्णन करणारे पत्र समाविष्ट केले आहे. 'परकीयांच्या नजरेतून छत्रपती शिवाजी महाराज' पुस्तकात या डच पत्राचे संपूर्ण भाषांतर पृ. क्र. २३६ वर प्रकाशित करण्यात आले आहे.*

ज्यांचा उल्लेख इतर साधनांमध्ये सहजासहजी आढळून येत नाही. शिवाजी महाराजांच्या आग्रा भेटीसंबंधी तसेच आग्र्यात घडलेल्या घटना, शिवाजी महाराजांची आग्र्याहून झालेली सुटका आणि त्यानंतर झालेल्या घडामोडींचे सविस्तर वर्णन या पत्रातून येते. यातील काही पत्रांचा मजकूर इथे देणे अपरिहार्य आहे. सर्वप्रथम परकालदासचे १९ मे १६६६ रोजीचे पत्र पाहू या. परकालदास लिहितो,

'शिवाजीच्या बरोबर शंभर अनुयायी असून त्याच्या संरक्षणपथकात दोन-अडीचशे स्वार आहेत. त्यांपैकी शंभर शिलेदार असून इतर बारगीर आहेत. शिवाजी पालखीतून निघतो त्यावेळी त्याच्या समोर पायदळ शिपायांचे पथक चालत असे. शिवाजीचा झेंडा हा नारंगी आणि केसरी रंगाचा असून त्यावर सोनेरी आकृत्या काढलेल्या आहेत. त्याच्या लवाजम्यात उंट कमी आहेत, ते सुद्धा सामान वाहून नेण्यासाठी आहेत. पथकासोबत शंभर बंजाऱ्यांचा तांडा असून प्रत्येकापाशी गोणी वाहणाऱ्या बैलांची जोडी आहे. शिवाजीचे सर्व मोठे अधिकारी पालखीतून प्रवास करतात, त्यामुळे शिवाजीच्या लवाजम्यात बऱ्याच पालख्या आहेत.' पुढे शिवाजी महाराजांचे वर्णन करताना परकालदास लिहितो,

'शिवाजी हा दिसण्यात किरकोळ आहे, पण त्याचा रंग विलक्षण गोरा आहे. त्याचे राजतेज असे, की कोणीही त्याला पाहिले की आपोआपच वाटावे, हा राजा असला पाहिजे. त्याची हिंमत आणि मर्दुमकी पाहिली, की हा बुलंद हिमतीचा मर्द मनुष्य असला पाहिजे असे वाटू लागते. शिवाजीला दाढी आहे. शिवाजीचा मुलगा नऊ वर्षांचा आहे. तोही गोऱ्या रंगाचा असून विलक्षण देखणा आहे.'

शिवाजी महाराजांच्या सोबत असणाऱ्या लवाजम्याचे वर्णन करताना तो पुढे म्हणतो, 'शिवाजीचा लवाजमा लहानच, पण वैभवशाली आहे. समोर निशाणाचा हत्ती आहे. त्यावर ध्वज फडकत असतो. नंतर कोतवाल घोडा आहे. त्याला सोन्या-रुप्याचा साज चढविला आहे. पथकामागे हौदा अंबारी घातलेल्या दोन हत्तिणी आहेत. एक सुखपाल (पालखीचा एक प्रकार) लवाजम्यात आहे. त्याचे दांडे चांदीने मढवलेले आहेत, पण पालखीचे पाय आणि खुंट्या या सोन्याने मढवलेल्या आहेत.'

शिवाजी महाराज आग्र्याला गेले, तेव्हा फार मोजके लोक त्यांनी आपल्याबरोबर घेतले होते. त्यांच्या आग्राभेटीचे सविस्तर वर्णन करण्यात मराठी साधने कमी पडतात. मुघलांच्या साधनांमध्ये शिवाजी महाराजांनी औरंगजेबाचा भरदरबारात केलेला अपमान, शिवाजी महाराजांची कैद आणि शिवाजीराजांच्या सुटकेनंतर तयार झालेल्या अफवा

एवढेच काय ते पाहायला मिळते, पण या पत्रामधून शिवाजी महाराजांच्या आग्रा भेटीचे एकूणएक वर्णन आलेले आहे. शिवरायांचा लवाजमा किती भव्य आणि श्रीमंत पद्धतीचा होता, याचा सहज अंदाज येतो. हत्ती, घोडे, बैल, उंट यांसारखे प्राणी, महाराष्ट्रातून सोबत घेतलेले शंभर अनुयायी आणि दोन-अडीचशे सैनिक, वेगवेगळ्या प्रकारच्या आणि महागड्या रत्नांनी, सोन्याचांदीने मढलेल्या पालख्या या राजेशाही थाटात शिवाजी महाराजांनी जेव्हा आग्रा शहरात प्रवेश केला तेव्हा संपूर्ण शहर शिवाजी महाराजांना पाहायला लोटले नसते, तर नवलच. याच पत्रात शिवाजी महाराजांच्या स्वराज्याचा झेंडा कशा प्रकारचा होता, हेही वाचायला मिळते. महासिंग शेखावत नावाचा एक रजपूत सरदार होता. त्याने लिहिलेले एक पत्र आज उपलब्ध आहे. १८ जुलै १६६६ रोजी लिहिलेल्या पत्रात महासिंग म्हणतो,

*'सेवोजी स्याणो बहोत. जुबात करे सू ठीक ही कहो, जु फेर कहू का कहवा की हाजत नहीं. खरो ही भलो राजपूत. जिसो सुणो थो तिसोही देखो. असी राजपूतपणा की बात कहे. थी सू याद रहे तो समय ऊपर काम आवे.'* म्हणजे, 'शिवाजी फार शहाणा आहे. बोलेल ते योग्य बोलेल. त्यावर पुन्हा कुणालाही काहीही बोलण्याची आवश्यकता राहत नाही. तो खरा रजपूत आहे. आम्हाला त्याच्याविषयी जसे सांगण्यात आले/आम्ही त्याच्याविषयी जसे ऐकले, तसाच तो आहे. तो खऱ्या राजपुतासारख्या गोष्टी बोलतो. त्या लक्षात ठेवणे, हे एक दिवस आपल्या उपयोगी पडणार आहे.'

इथे शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाची झलक आपल्याला पाहायला मिळते. औरंगजेबाच्या नजरकैदेत असतानाही शिवाजी महाराज हे तमाम मुघल सरदार, अधिकारी तसेच आग्र्याच्या जनतेच्या आकर्षणाचे केंद्रबिंदू होते. यातूनच त्यांच्याशी अनेकांनी जवळीक वाढवण्याचा प्रयत्न केला असावा, त्यांच्याशी संवाद वाढवला असावा. शिवाजी महाराजांच्या गोष्टी ऐकून त्यांच्यावर निश्चितच फार प्रभाव पडलेला होता, हेच या पत्रातून दिसून येते. एकूणच काय, तर उत्तर भारतात शिवाजी महाराजांनी आपल्या नावाचा दरारा अतिशय भक्कमपणे प्रस्थापित केला होता, हे यावरून सहजपणे लक्षात येते.

म्हणूनच की काय, आग्र्यातील लोक उघडपणे औरंगजेबाच्या विरोधात बोलू लागले, 'आगे तो सेवाजी की मरदानगी व हिमती ते खलक सराही थी. और अब ओठो पातशाहजी की कुजुरी भी आई सखती करी करडा जवाब कहया, तीथे खल सेवाजी की मरदानगी ते बहुत सराहो छोजी.' म्हणजे, पूर्वी जनता शिवाजीची मर्दुमकी व हिंमत यांची स्तुती करीत होती आणि आता तर शिवाजी बादशहाच्या दरबारात येऊन प्रत्यक्ष तोंडावर कडक उत्तरे देतो, हे पाहून जनता शिवाजीच्या मर्दुमकीची

खूपच स्तुती करत आहे. शिवाजी महाराजांचे व्यक्तिमत्त्व त्या काळातसुद्धा लोकप्रिय होते. राज्याभिषेकासमयी 'आज्ञापत्रकार' रामचंद्रपंत अमात्य[२४] यांनी काढलेले उद्गार अतिशय प्रेरणादायी आहेत.

'सिंहसनारूढ होऊन छत्र धरून छत्रपति म्हणवले. केवळ नूतन सृष्टीच निर्माण केली. औरंगजेबाचा महाशत्रू स्वप्रतापसागरी निमग्न केला. दिगंत विख्यात कीर्ती संपादिली, ते हें राज्य.'

हे वाक्य अगदी खरे आहे. काबुल-कंदाहारपर्यंत पसरलेल्या अतिभव्य साम्राज्याला शिवाजी महाराजांनी प्रचंड धक्के दिले. राज्याभिषेकासमयी संपूर्ण दख्खनचा एकमेव स्वामी म्हणूनच शिवाजीराजांना सर्वांनी मान्य केले. सुरतेवर दोन वेळेस आक्रमण करून त्यांनी औरंगजेबाच्या साम्राज्याची अर्थव्यवस्था खिळखिळी करून टाकली. शाहिस्तेखान, जसवंतसिंग, बहलोलखान, कारतलबखान, बहादूरखान कोकलताश यांसारख्या अतिमहत्त्वाच्या मुघल सेनापतींना धूळ चारून मुघलांच्या सेनेचे लढाईचे मनोबल खचवले. स्वतःचे अस्तित्व सिद्ध करून स्व-पराक्रमावर 'स्वराज्य' स्थापन केले आणि रयतेने शिवाजी महाराजांना आपला 'छत्रपती' म्हणून मान्य केले. राज्याभिषेकासारख्या संपूर्ण इतिहासाला कलाटणी देणाऱ्या प्रसंगाचे वर्णन करताना सभासद म्हणतो,

'या युगी सर्व पृथ्वीवर म्लेंच्छ पातशाह. 'मऱ्हाटा' पातशाह येवढा छत्रपती झाला, ही गोष्ट सामान्य झाली नाही.' समकालीन मराठी साधनांमध्ये 'जेधे करिना' हे एक महत्त्वाचे साधन आहे. शिवाजी महाराजांवर निष्ठा ठेवून स्वराज्याप्रती सर्वस्व अर्पण करणाऱ्या सर्व मावळ्यांच्या मनातील भावना यथार्थपणे प्रकट झालेल्या आहेत.

'हे मऱ्हाष्ट राज्य आहे. अवघियांनी राजश्री-स्वामी संनिध राहोन यकनिष्ठेने शेवा करावी.' शिवाजी महाराजांविषयी आदर, प्रेम तसेच सन्मानयुक्त भावना तत्कालीन महाराष्ट्राच्या मनात होती. 'राजश्री स्वामीं'च्या साथीला सारे 'मऱ्हाष्ट' राज्य उभे होते. हे रयतेचे राज्य होते. म्हणूनच शिवाजी महाराजांच्या अकाली मृत्युनंतर सुद्धा २७ वर्षे इथला एकूण एक माणूस लढला. हेच शिवाजी महाराजांच्या स्वराज्यलढ्याचे यश. शिवाजी महाराजांच्या सर्वच गुणांचे परकीयांनी बारकाईने निरीक्षण करून ठेवले आहे. एका इंग्रजी पत्रात शिवाजी महाराजांचा उल्लेख "The greatest diplomatist of

---

*२४. लोकसंस्कृतीचे गाढे अभ्यासक व उपासक रा. चिं. ढेरे यांनी ७ जून १९६० रोजी विवेचनात्मक टीपा आणि चिकित्सक चर्चेसहित 'रामचंद्रपंत अमात्य प्रणीत स्वराज्यनीती आज्ञापत्र' नामक पुस्तक प्रकाशित केले.*

eastern part' म्हणजेच, 'पूर्वेकडील देशांतील सर्वश्रेष्ठ मुत्सद्दी' म्हणून आला आहे. शिवाजी महाराजांचे मनसुबे फार मोठे होते. महाराष्ट्र शासनाने सन २०११ साली 'छत्रपती शिवाजी महाराज स्मृतिग्रंथ' प्रकाशित केला. छत्रपती शिवाजी महाराज, पर्यायाने मराठ्यांच्या इतिहासावर संशोधन करणाऱ्या सर्व महत्त्वाच्या इतिहास संशोधकांचे लेख या प्रसंगी या ग्रंथात संकलित करण्यात आले. यामधील एक लेख फार महत्त्वाचा आहे. डॉ. आप्पासाहेब पवार लिखित 'दिल्ली जिंकण्याची शिवाजीराजांची प्रतिज्ञा' हा मूळ इंग्रजीमध्ये असलेला लेख प्रा. कमलाकर दीक्षित यांनी अनुवादित केला आहे. या लेखाच्या विषयावरून शिवाजी महाराजांच्या राजकीय दूरदृष्टीची जाणीव होते. शिवाजी महाराजांची राज्याभिषेकानंतरची कर्नाटक स्वारी हा त्याचाच परिपाक होय. या लेखामध्ये आलेला एक उल्लेख मात्र आवर्जून इथे नोंदवण्यासारखा आहे. मुंबईकर इंग्रजांनी लिहिलेल्या एका पत्राचा सारांश या लेखात दिलाय. इंग्रज म्हणतात,

'समर्थ विजेता होण्याच्या महत्त्वाकांक्षेने शिवाजी गेल्या पावसाळ्याच्या अखेरीस रायरी (रायगड) सोडून कर्नाटकवर चालून गेला. त्याच्या फौजेत २०,००० घोडदळ आणि ४०,००० पायदळ होते. सीझरच्या स्पेनमधील 'तो आला, त्याने पाहिले आणि त्याने जिंकले' अशा विजयासारखा त्याने विजय मिळवला. यावेळी सोने, हिरे, पाचू, माणके वगैरेंच्या रूपात त्याने इतकी संपत्ती संपादित केली आहे, की पुढील अनेक लढायांसाठी ती उपयोगी पडेल.'[२५]

शिवाजी महाराजांनी केलेल्या कर्नाटक स्वारीला समोर ठेवून त्याचा तपशील आपल्या लंडन येथील मुख्यालयाला सांगणारे हे पत्र. या पत्राला अनेक कंगोरे आहेत. उदाहरणार्थ, शिवाजी महाराजांनी कर्नाटक तसेच तामिळनाडूच्या काही भागांवर आपले वर्चस्व सिद्ध केले होते. त्या विजयाची तुलना इंग्रजांनी सीझरसोबत केली आहे. या स्वारीमध्ये शिवाजी महाराजांना अमाप धनाची प्राप्ती झाली, ही गोष्ट खरी आहे, पण या धनाचा वापर स्वराज्यरक्षणासाठी होईल याची खात्रीही इंग्रजांना होती. त्यांच्या निरीक्षणशक्तीला मानलेच पाहिजे. यामध्ये मला एक गोष्ट ठळकपणे नजरेस आणायची आहे, ती म्हणजे शिवाजी महाराजांच्या सैन्याचे वर्णन. कर्नाटक स्वारीच्या वेळी शिवाजी महाराजांनी किती सैन्य सोबत नेले, याविषयी आज मतमतांतरे आहेत. अर्थात, इंग्रजांच्या पत्रांत येणारा आकडा हा चुकीचासुद्धा असू शकतो, परंतु शिवाजी महाराजांच्या सैन्यात २० हजारांचे घोडदळ आणि ४० हजारांचे पायदळ होते, अशी

२५. *छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथ*, पृ. ५५-६३.

ठरावीक संख्या देणारे वर्णन दुर्मिळच म्हणावे लागेल. शिवाजी महाराजांच्या फौजेचे हे भव्य स्वरूप पाहून दख्खनेतील एकाही राजाला महाराजांच्या विरोधात उभे राहण्याची हिम्मत झालीच नसेल, हे नक्की.

१६ जानेवारी १६७७ रोजी हेन्री गेरी याने हे पत्र आपल्या कंपनी सरकारला लिहिले. या पत्रात पुढे हेन्री म्हणतो,

'दख्खनचे स्वामी झाल्यामुळे त्यांनी आपल्या देवाला वचन दिले आहे, की दिल्लीला पोहोचून औरंगजेबाला शांत केल्याशिवाय ते आपली तलवार म्यान करणार नाहीत. शिवाजी महाराजांच्या स्वराज्यविस्ताराचा अंदाज आपण सहजपणे लावू शकतो.'

शिवाजी महाराजांच्या चरित्राचा अभ्यास करणे हा मराठा इतिहास संशोधक, मराठी लेखक तसेच मराठी कादंबरीकारांचा आवडीचा विषय आहे. शिवाजी महाराज नेमके दिसायचे कसे, याविषयी आजही प्रत्येक व्यक्तीच्या मनात कुतूहल आहे. त्यांच्या रूपाचे, व्यक्तिमत्त्वाचे, स्वभाववैशिष्ट्यांचे वर्णन वाचून आपल्या नजरेसमोर त्यांचे एक स्पष्ट रूप उभे राहते. मध्यम उंची, मजबूत बांधा, तेजस्वी तशीच करारी चर्या, काळेभोर डोळे, बाकदार नाक, मानेवर रुळणारे केस, टोकदार दाढी, गौर वर्ण आणि चेहऱ्यावर सतत झळकणारे स्मितहास्य. शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाविषयी अनेक उदाहरणे आपण पाहिलीत. या सर्व गोष्टींचा उपयोग पुढे इतिहाससंशोधकांना जगभरात पसरलेल्या शिवाजी महाराजांच्या चित्रांचा मागोवा घेताना झाला नसेल तरच नवल!



## २

आजवर अनेक संशोधकांनी छत्रपती शिवाजी महाराजांच्या चित्रांचा मागोवा घेतला. सर्वप्रथम याचे श्रेय जाते इतिहासातील भीष्माचार्य म्हणवले जाणारे वा. सी. बेंद्रे यांना. सन १९३३मध्ये मराठ्यांच्या इतिहासावर संशोधन करण्यासाठी त्यांनी परदेशांतील अनेक कागदपत्रांचा अभ्यास केला. यातूनच शिवाजी महाराजांच्या अस्सल चित्राची एक नक्कलप्रत त्यांना आढळून आली.

शिवाजी महाराजांची एकूण किती चित्रे आज अस्तित्वात आहेत याचे उत्तर शोधण्याची मोहीम सुरु झाली ती इथूनच. यात सर्वांत जास्त संदर्भ व ऐतिहासिक पुराव्यांची जंत्री प्रा. ग. ह. खरे यांच्या हाती लागली. काळे, डॉ. बाळकृष्ण पारसनीस, य. न. केळकर यांसारख्या इतिहाससंशोधक-अभ्यासकांनी सुद्धा या दुर्लक्षित विषयाला आपल्या लेखणीने न्याय देण्याचे काम केले.

त्या काळाचा विचार करता शिवाजी महाराजांची जगभर पसरलेली चित्रे शोधणे, त्यांची अस्सलता पडताळून पाहणे, त्यासंबंधी प्रकाशित-अप्रकाशित कागदपत्रांची माहिती जमा करणे आणि त्याचे खरेपण सिद्ध करणे हे अतिशय कष्टाचे आणि प्रचंड अवघड काम होते. मराठ्यांच्या इतिहासाचे अनेक पैलू उजेडात यावेत यासाठी महाराष्ट्रातील संशोधकांच्या पिढ्या खपल्या. या सर्वांमध्ये प्रा. खरे आणि डॉ. बाळकृष्ण जास्त नशिबवान ठरले. त्यांच्या हाती अनेक अपरिचित नोंदी लागल्या. अर्थात खरे गुरुजींनी प्रकाशित केलेली माहिती मागील काही वर्षांत मिळालेल्या अनेक नवीन पुराव्यांमुळे बदलली. इतिहासाचे अध्ययन करताना अशा गोष्टी घडतातच. ज्या दिवशी एखाद्या घटनेविषयी-प्रसंगाविषयी नवीन पुरावा उपलब्ध

होतो, त्याक्षणी जुने मत, जुनी मांडणी निरर्थक ठरते. पण यामुळे खरे गुरुजींच्या संशोधनाचे मोल कमी होते, असे अजिबात नाही. डॉ. बाळकृष्ण हे पोर्तुगीज, डच, फ्रेंच, इंग्रज साधनांचा अभ्यास करून शिवाजी महाराजांच्या आयुष्यात घडून गेलेल्या अनेक अपरिचित आणि अप्रकाशित माहितीच्या आधारावर पाच खंडांत शिवचरित्राचे लिखाण करणारे महान इतिहास संशोधक. त्यांनी १९३० मध्ये 'शिवाजी अल्बम' या नावाने एक छोटी पुस्तिका प्रकाशित केली, त्यात शिवाजी महाराजांच्या काही समकालीन तसेच काही अठराव्या शतकात काढण्यात आलेली चित्रे छापली होती. अलीकडेच कोल्हापूरचे इतिहास संशोधक आणि लेखक इंद्रजीत सावंत सर यांनी डॉ. बाळकृष्ण यांच्या पुस्तकांचे पुनर्प्रकाशन केले. 'Shivaji The Great' पुस्तकाच्या नवीन आवृत्तीमध्ये सदर अल्बममधील काही चित्रांचा समावेश सावंत सरांमार्फत करण्यात आला. य. न. केळकरलिखित 'चित्रमय शिवाजी' पुस्तकाविषयी प्रचंड आकर्षण होते, पण त्या पुस्तकातून शिवाजी महाराजांच्या आयुष्यात घडून गेलेल्या घटनांची चित्रे आणि कृष्णधवल फोटो छापण्यात आले. खरेतर केळकर यांनी पुस्तकात शिवाजी महाराजांच्या चित्रांवर लिखाण केले असावे, असा समज पुस्तकाच्या शीर्षकावरून होतो. परंतु त्यांनीही या पुस्तकात बऱ्यापैकी चित्रे छापून सर्वसामान्य लोकांपर्यंत पोहोचवण्याचा प्रयत्न केला आहे. अलीकडच्या काळात शिवाजी महाराजांच्या चित्रावर नव्याने प्रकाश टाकण्याचे काम अजित पटवर्धन आणि मालोजीराव जगदाळे या पुण्याच्या दोन इतिहास संशोधकांनी केले आहे, हे इथे आवर्जून सांगावेसे वाटते. १४ फेब्रुवारी २०१४ रोजी भा. इ. सं. मं.च्या पाक्षिक सभेत अजित पटवर्धन यांनी शिवाजी महाराजांच्या काही समकालीन चित्रांना सर्वप्रथम उजेडात आणले. यामध्ये जर्मनी, रशिया, पॅरिस तसेच नेदरलँड्स येथील चित्रांचा प्रामुख्याने उल्लेख करता येईल. २०१५ साली मालोजीराव जगदाळे यांनी छत्रपती शिवाजी महाराजांची दोन अस्सल चित्रे भारतात आणली. तसे पाहायला गेले तर शिवाजी महाराज हयात असताना काढण्यात आलेले किंवा त्यांच्या मृत्यूनंतर दहाएक वर्षांत काढण्यात आलेले एकही अस्सल चित्र भारतात उपलब्ध नव्हते. त्यामुळे, मालोजीरावांचे हे कार्य शिवचरित्र संशोधनात प्रचंड मोठे यशच म्हणावे लागेल.[२६]

---

*२६. श्री वा. सी. बेंद्रे यांनी भारतामध्ये १९३३ साली आणलेल्या चित्राची प्रत अस्सल चित्रावरून तयार करून घेतलेली होती. त्यामुळे, बेंद्रे यांनी आणलेले चित्र ज्या मूळ चित्रावरून तयार करून घेतले, ती प्रत मालोजीराव जगदाळे यांनी प्रकाशित केली.*

शिवाजी महाराजांच्या अस्सल चित्रांचा मागोवा घेण्याआधी एक गोष्ट समजून घेणे इथे गरजेचे वाटते. शिवाजी महाराजांचे एकही चित्र मराठा शैलीत काढण्यात आलेले नाही. अर्थात, असे चित्र सध्यातरी उपलब्ध नसल्यामुळे इथे हे विधान करणे उचित ठरेल. शिवाजी महाराजांच्या सर्वच चित्रांवर गोवळकोंडा चित्रशैलीचा प्रभाव जास्त दिसून येतो. काही चित्रे तर पहाडी आणि मुघल शैलीत काढल्याचे दिसून येते. या दोन शैलींचा थोडक्यात मागोवा घेऊ यात.

**गोवळकोंडा शैली :** या शैलीतील चित्रे फार मोठ्या प्रमाणात उपलब्ध आहेत. यासाठी कारणीभूत ठरली गोवळकोंड्याची प्रदीर्घ आणि शांततापूर्ण कारकीर्द. दख्खन चित्रशैलीचा एक प्रकार म्हणजे गोवळकोंडा चित्रशैली. पण गोवळकोंड्याची काही चित्रे विजापूर तसेच अहमदनगर येथील चित्रांपेक्षा काहीशी वेगळ्या धाटणीची आहेत.[२७] त्यामुळे इथे मुद्दाम 'दखनी शैली' असा उल्लेख न करता 'गोवळकोंडा शैली' असा उल्लेख केला आहे. अनेक वर्षांपर्यंत या राज्यात मोठे युद्ध झाल्याच्या नोंदी आढळून येत नाहीत. त्यामुळे या राज्यात कलेचा प्रचार आणि प्रसार फार मोठ्या प्रमाणात झाला. तसेच गोवळकोंड्याचे सुलतान कलाप्रेमी असल्याने कलेच्या वृद्धीस भरपूर वाव मिळाला. या शैलीतील चित्रांची अनेक वैशिष्ट्ये आहेत. जसे की, चित्रामध्ये हमखास गालीचा दाखवण्यात येत असे आणि त्या गालिच्यावर कोणतीही बॉर्डर आखलेली नसे. अर्थात, हे केवळ एकच उदाहरण झाले. अशी अनेक उदाहरणे देऊन त्यांची चर्चा अनेक अभ्यासकांनी केलेलीच आहे. अब्दुल्ला कुतुबशहा (इसवी सन १६२६-१६७२) याचे चित्रकलेवर नितांत प्रेम. त्याच्या काळात चित्रकलेस विशेष हातभार लागला. इसवी सन १६५० नंतरची बरीचशी चित्रे खास बादशाहच्या वैयक्तिक देखरेखीखाली तयार झाली. मुघल शैलीचा काहीसा प्रभाव या शैलीवर जाणवत असला तरीही या चित्रांना वेगळी शैली आणि स्वतंत्र व्यक्तिमत्त्व होते हे मान्य करावेच लागेल. गुणवत्तेच्या दृष्टीने पाहायला गेल्यास अतिशय उत्कृष्ट, सरस आणि अतुलनीय म्हणूनच या चित्रांचा गौरव करावा लागेल. या शैलीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे, लांबसडक आणि मोठ्या कपड्यांवर केलेली कलाकुसर. आजही कापडावर काढलेली काही चित्रे जगभर प्रसिद्ध आहेत. यातीलच एका कापडाच्या

---

*२७. दखनेच्या चित्रशैलीचे तीन मुख्य भाग अभ्यासक सांगतात., अहमदनगर शैली, विजापूर शैली आणि गोवळकोंडा शैली. पुढे अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात हैद्राबाद येथील शैलीचा उदय आणि विकास झाला. याचबरोबर अठराव्या शतकाच्या मध्यान्हात तंजावर येथे मराठ्यांचीसुद्धा स्वतंत्र शैली उदयास आली. पण दखनी शैलीवरूनच या दोन्ही शैली प्रभावित होत्या, हे मान्य करावे लागेल.*

चित्राचा शिवाजी महाराजांच्या इतिहासाशी संबंध आहे. त्याविषयी सविस्तर पुढे पाहणार आहोत. कापडावर चित्रे काढण्याच्या कलेत मुघलांना महारथ प्राप्त झाली असली तरीही गोवळकोंड्याच्या चित्रांचे वैशिष्ट्य वेगळे आहे. ही चित्रे आकाराने लांबट आणि अतिशय श्रीमंत धाटणीची आहेत. सोन्याचा मनसोक्तपणे केलेला वापर या चित्रांवर आपण सहजपणे पाहू शकतो. शिवाजी महाराजांच्या कितीतरी चित्रांवर भरपूर प्रमाणात सोने वापरले आहे. बऱ्याच वेळेस इमारतीबाहेरच्या हिरवळीवर शाही दृश्ये चित्रित केलेली असतात. मासे आणि बदकांनी (विहरत असलेली) भरलेली पुष्करणी, अनेक पुष्पे, फिकट निळे–हिरवे आकाश आणि पिवळ्या रंगाच्या ठिकाणी सर्रासपणे वापरण्यात येणारे सोने. दृश्यात दाखवण्यात येणारे पुरुष मजबूत बांध्याचे. गुडघ्याच्या खाली जाणारा लांब पायघोळ अंगरखा, आखूड बाह्यांचा लोकरी कॉलरचा कोट,[२८] कमरेला लटकणारी धोप या काही समान गोष्टी आपण सहजपणे न्याहळू शकतो.[२९]

**मुघल चित्रशैली :** या शैलीची सुरुवात बाबरपासून झाली, असे अभ्यासकांचे मत आहे. अर्थात, हुमायूनच्या काळात फार कमी चित्रे तयार झाली. त्यामुळे काही अभ्यासक मूळ शैलीचा उगम बाबरपासून न होता अकबरापासून झाल्याचे मानतात. हुमायून युद्धात हरल्यानंतर 'शाह तहमस्प' याच्या पदरी आश्रयास राहिला. त्या वेळी इराणमध्ये 'हेरात कलम' अतिशय जोरदारपणे प्रसिद्ध झाले होते. हुमायूनने 'मीर सय्यद अली' आणि 'ख्वाजा अबू समद' या दोघांना अकबरास चित्रकलेचे धडे देण्यासाठी नियुक्त केले.[३०] अकबराच्या दरबारात सुद्धा यांनी काही काळ काम केल्याचे आपल्याला वाचावयास मिळते. मुघलांचं राज्य साम्राज्यात परिवर्तीत करणारा अकबर हा सर्वांत ताकदवान बादशाह ठरला. त्याच्या काळात मुघलांच्या राज्यात अंतर्गत शांतता मोठ्या प्रमाणात प्रस्थापित झाली होती. स्वतः बादशाह कलेचा उपभोक्ता असल्याकारणे अनेक कलांचा विकास याकाळात झाला. त्याचबरोबर, मुघलांच्या चित्रशैलीमध्ये भरपूर बदल होत गेले. अकबराच्या दरबारात असणाऱ्या सय्यद अली आणि अबू समद यांनी बसवन, दसवंत आणि केसूदास यांना प्रशिक्षण दिले. यांच्या चित्रांमधून वास्तवतेचे आणि वस्तुनिष्ठतेचे दर्शन घडत असे. त्यांची चित्रे जिवंत आणि हुबेहूब वाटत. उत्तर हिंदुस्तानी कलम आणि पर्शियन कलमचा

२८. *शाहजहान आणि औरंगजेबाची भरपूर चित्रे आज उपलब्ध आहेत. त्यांच्याही अनेक चित्रांमध्ये अशाच प्रकारचे कॉलरवाले कोट दिसून येतात.*

२९. *South Indian Paintings; सरदार नाईक बावणे संग्रहातील रंगचित्रे.*

३० *Album of Indian Painting.*

अपूर्व संगम या काळात घडून आला. केशव, मुकुंद, लाल, मिस्कीन, माधव, फारुख कुलमाक, जगन, महेश, खेमकरण, तारा, हरबन्स यांसारखे अनेक चित्रकार अकबराच्या दरबारात कामाला होते. जहांगीरच्या राजवटीतील काही नोंदी तर फार चमत्कारिक आहेत. 'ईस्ट इंडिया कंपनी' व्यापारासाठी भारतात पाय रोवू पाहत होती. जहांगीरची मर्जी संपादन करणे गरजेचे होते. त्यासाठी 'थोमस रो' या इंग्रज वकिलाला मुघलांच्या दरबारात पाठवण्यात आले तेव्हा जहांगीरने त्या इंग्रज वकिलाला काही रंगीत चित्रे भेट दिल्याची नोंद आढळते. जहांगीरला चित्रांचा संग्रह करण्याची प्रचंड आवड होती. त्या काळातील अनेक चित्रे आज प्रसिद्ध आहेत. भारतीय चित्रशैलीवर आधारित 'Indian Paintings' या पुस्तकाचे लिखाण करणाऱ्या फिलिप रोसन याने शाहजहानच्या काळातील 'दिल्ली कलम' नावाच्या नवीन प्रकाराविषयी माहिती दिली आहे. हा प्रकार शाहजहानच्या काळात विकसित झाला. लाहोर, बिकानेर, अयोध्या आणि लखनौमध्ये या शैलीचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाल्याचे पाहावयास मिळते. शाहजहानच्या काळात काढण्यात आलेले एक चित्र अतिशय प्रसिद्ध आहे, ते म्हणजे दारा शुकोहच्या लग्नाची वरात. आपल्या पारंपरिक 'सेहरा' मध्ये घोड्यावर बसलेला दारा शुकोह आणि त्याच्यासोबत बाजूच्या घोड्यावर बसलेला शाहजहान. संपूर्ण वरातीचे स्वागत करण्यासाठी थांबलेले वादक, संगीतकार, नृत्य कलाकार तसेच दूरवर अतिशय मोठ्या प्रमाणात होत असलेली आतिषबाजी आणि घोड्यावरून वाजवण्यात येणारे नगारे. श्रीमंत धाटणीचे हे चित्र तयार केले 'हाजी मदनी' या कलाकाराने. ताजमहलच्या निर्मितीमध्ये या मदनीने सुद्धा योगदान दिले होते. एवढेच नव्हे, तर शाहजहानने त्याच्या कारकिर्दीत काही जुन्या चित्रांना नवे रूप देण्याचा प्रयत्न सुद्धा केला होता. त्याबाबत एक उदाहरण म्हणजे जहांगीरला मार्च १६२१मध्ये 'नवीन वर्षाची भेट' म्हणून तुर्कांनी एक चित्र दिले. त्यावर एक झेब्रा रेखाटला होता. जहांगीरने तो झेब्रा इराणच्या 'शाह अब्बास'ला देण्याचे ठरवले. कारण या दोन राजांमध्ये अनेक अलौकिक, दुर्मिळ वस्तूंची भेटस्वरूपात देवाण-घेवाण होत असे. या शाह अब्बासने भेट म्हणून दिलेला एक बहिरी ससाणा अतिशय सुंदर होता. त्याचे चित्र 'जहांगीरनामा'मध्ये आढळते. राखाडी रंगाच्या ससाण्याचे चित्र काढले होते उस्ताद मन्सूर याने. त्याला जहांगीरने 'नादीर अल अस्र' हा किताब बहाल केला होता. तो तत्कालीन दशकातील सर्वोत्कृष्ट प्राणी रेखाटणारा चित्रकार म्हणून प्रसिद्ध होता. त्यानेच या झेब्र्याचे चित्र काढले होते. अशा अनेक गमतीजमती आपल्याला त्या 'जहांगीरनामा'मध्ये पाहवयास मिळतात. भेटस्वरुपात आलेला झेब्रा हा जहांगीरला

शुभ्र पांढऱ्या रंगाचा घोडा वाटला, ज्यावर कुणीतरी काळ्या रंगाने पट्ट्यांची कलाकुसर केली असावी. त्यामुळे शाह अब्बासला ही भेट अतिशय योग्य राहील, असे त्याचे मत होते. पण काही कारणांमुळे जहांगीरला हे चित्र इराणपर्यंत पोहोचवता आले नाही. शाहजहानच्या काळात जहांगीरच्या चित्रांचा संच त्याला मिळाला. त्यामध्ये हे झेब्र्याचे चित्रसुद्धा होते. शाहजहानने त्या चित्राच्या चारही बाजूंनी अत्यंत आकर्षक बॉर्डर रेखाटली, त्यामुळे हे चित्र अतिशय सुंदर आणि श्रीमंत धाटणीचे झाले. आज ते चित्र 'राजघराण्याची महत्त्वाची चित्रे' या संचामध्ये समाविष्ट झाले, ते त्याच्या दुर्मिळ कलाकुसरीमुळे आणि त्यामागील रंजक इतिहासामुळे. औरंगजेबाच्या काळात तर कलेवरच निर्बंध आले होते. राजाकडून कोणत्याही प्रकारे कलेला आश्रय नव्हता. त्यात प्रत्येक गोष्टीवर कडक नियमांचे पांघरून घातले होते. अभिजात कलेला मुरड घालण्याची पाळी आली. हौशी कलाकारांच्या कलेवरच मुघल शैली थोडीफार जिवंत राहिली. राज्यातील कलाकारांनी भारतभर भ्रमण करण्यास सुरुवात केली. इतर राजांचा आश्रय घेतला, त्यामुळे मुघल शैली भारतभर पसरली. अनेक चित्रांवर या शैलीचा प्रभाव दिसून येतो, त्याचे कारण हेच. तरीही औरंगजेबाच्या चित्रांची संख्या प्रचंड आहे. अगदी त्याच्या लहानपणापासून ते वृद्धापकाळापर्यंत! अखेरच्या सत्तावीस वर्षांत संपूर्ण दख्खन भूभाग त्याने पायाखाली तुडवला. एवढ्या धामधुमीच्या काळातसुद्धा त्याच्या चित्रकारांच्या फौजेने औरंगजेबाची एवढी चित्रे काढावीत, तेसुद्धा कलेवर प्रचंड निर्बंध घालणाऱ्या बादशाहचे, हे खरेच आश्चर्यकारक आहे. सातारच्या किल्ल्याचा वेढा असो वा गोवळकोंड्याची लढाई, औरंगजेबाच्या या चित्रांवरसुद्धा प्रचंड संशोधन झालं आहे. त्या अस्थिरतेच्या काळातसुद्धा चित्रांवर भरपूर प्रमाणात सोन्याचे काम आढळते. चित्रांवर अत्यंत बारीकाईने काम केलेले आढळते. औरंगजेबाच्या पालखीत त्याच्यासोबत कुराण आणि लाडकी झुल्फिकार सुद्धा दाखवण्यात आली. वेढ्यात उभा असणारे त्याचे महत्त्वाचे सरदार, त्यांची नावे, युद्धासाठी केलेली तयारी या सर्वच गोष्टींची रेलचेल चित्रात दिसते. तेसुद्धा लघुचित्रामध्ये, हा फार देखणा आणि सुंदर विषय आहे.

शिवाजी महाराजांची काढण्यात आलेली सर्व चित्रे याच 'लघुचित्रशैली' प्रकारातील. तत्कालीन भारतात या शैलीची चित्रे सर्वात जास्त प्रमाणात आढळून येतात. शिवाजी महाराजांची लघुचित्रे 'दखनी शैली'तील आहेत. उत्तरेच्या लघुचित्रांपेक्षा दक्षिणेतील चित्रांची ठेवण अतिशय सुंदर आणि आकर्षित करणारी आहे.

Miniatures म्हणजे लघुचित्रे. अभ्यासकांच्या मते, भारतात लघुचित्रशैली इसवी

सनाच्या दहाव्या शतकात उदयास आली असावी. हस्तलिखिते, पोथ्या यांमधून काढलेली लहान लहान चित्रे सर्वसामान्य लोकांपर्यंत पोहोचली. यातूनच लघुचित्रांचा प्रसार झाला. पाल राजघराण्याचा राजा महिपाल याच्या कारकिर्दीत तयार झालेला 'प्रज्ञापारमिता' या बौद्ध ग्रंथात सर्वप्रथम लघुचित्रांचे अस्तित्व आपल्याला दिसून येते (इसवी सन ९८४). मुघलांच्या काळात मात्र या चित्रांचा प्रचार फार मोठ्या प्रमाणात झाला. मुघल चित्र काढण्यासाठी जो कागद वापरत तो इराणवरून येत असे. खारीच्या केसांपासून तयार केलेल्या कुंचल्याने या चित्रावर बारीक कलाकुसर करण्यात येई. पुढे लघुचित्रणाचे हे सुंदर रूप राजस्थान आणि दख्खनेतील गोवळकोंडा, विजापूर राज्यांनी स्वीकारले. बुंदी-कोटा भागांमध्ये विकसित झालेली 'बुंदी चित्रशैली', जम्मूच्या शिवालिक टेकड्यांमध्ये बसोली खोऱ्यात उदयास आलेली अठराव्या शतकातील 'बसोली शैली' तसेच पहाडी प्रदेशातील 'कांग्रा चित्रशैली' या प्रसिद्ध चित्रशैलींना भारतीय लघुचित्रण शैलीचाच प्रकार मानण्यात येतो. आजही भारतात मध्ययुगामध्ये निर्माण झालेली लघुचित्रे जगभर पसरली आहेत. मराठ्यांच्या भित्तिचित्रांमागे सुद्धा या लघुचित्रांचा प्रभाव असल्याचे आपल्याला दिसून येते.

शिवाजी महाराजांच्या चित्रांचा विचार केल्यास अनेक गैरसमजांना सर्वमान्यता मिळाली आहे. अर्थात, जसजसे नवीन पुरावे मिळत राहतील, तसतसा इतिहास बदलत राहतो. अगदी हाच प्रकार या चित्रांविषयी घडला आहे. म्हणजे निकोलाओ मनूची कलेक्शनमध्ये असलेले चित्र 'मीर महंमद' या चित्रकाराने काढलेले आहे किंवा श्री. वा. सी. बेंद्रे यांनी प्रकाशित केलेले चित्र व्हॅलेंटीन याने १६६४च्या सुरत स्वारीसमयी काढले आहे, असे अनेक प्रवाद आज प्रस्थापित आहेत. अर्थात, यातील अनेक प्रवाद नवीन मिळालेल्या पुराव्यांच्या आधारे बदलू शकतात. जुन्या संशोधकांची काही मते या नवीन संशोधनामुळे कालबाह्य होऊ शकतात, हेच इतिहास संशोधनाचे दूरगामी परिणाम आहेत. इतिहास संशोधन-लेखनाची हीच पद्धत आहे. शिवाजी महाराजांच्या पदरी चित्रकार नव्हते. शिवराय आग्र्यास औरंगजेबाच्या भेटीस गेले असता त्यांच्या पदरी असणाऱ्या लोकांची आणि त्यांच्या हुद्द्याची यादी आहे, पण यामध्ये एकाही चित्रकाराचे नाव नाही. कर्नाटक स्वारीमध्ये शिवाजी महाराजांनी काही चित्रकार आपल्या पदरी ठेवून घेतल्याची नोंद आपल्याला डच कागदपत्रांमधून मिळते. एवढेच नव्हे, तर राज्याभिषेकासमयी सुद्धा शिवाजी महाराजांच्या पदरी एखादा चित्रकार असल्याची नोंद आढळत नाही. सर्वच चित्रांचे चित्रकार डच नाही तर इंग्रज आहेत. त्यांच्या निर्मितीचे ठिकाणसुद्धा मुख्यकरून दख्खन भाग आहे. आपण ज्या

चित्रांची चर्चा करणार आहोत त्यापैकी एक चित्र पहाडी शैलीतील असून निर्मितीचे ठिकाण राजस्थान सांगण्यात येते, तर एक चित्र साताऱ्यात तयार झालेले आहे. पण सातारच्या चित्राचा काळ शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतरचा (अठराव्या शतकाच्या सुरुवातीचा) सांगण्यात येतो. म्हणजेच, शिवाजी महाराजांची जेवढी समकालीन चित्र आज उपलब्ध आहेत, त्या सर्वांची निर्मिती गोवळकोंडा किंवा त्या ठिकाणच्या आजूबाजूला झाल्याचे निदर्शनास येते. चित्रांचा मागोवा घेत असताना काही अचंबित, आश्चर्यचकित करणारी तर काही माहिती नव्याने समोर आली. याविषयी सविस्तरपणे पाहूच, पण त्या आधी मागील संशोधनावर एक नजर टाकणे इथे महत्त्वाचे आहे. पूर्वसंशोधनातून आलेल्या मतांचा विचार केल्याशिवाय पुढे जाणे अशक्य आहे.

शिवाजी महाराजांच्या चरित्रावरील अनेक पुस्तकांचे लिखाण झाले आहे. कित्येक पुस्तकांमधून शिवाजी महाराजांच्या विशेष चित्रांना स्थानसुद्धा देण्यात आल्याचे आपल्याला दिसून येते. या सर्वांमध्ये सर्वांत मोठे योगदान आहे श्री वा. सी. बेंद्रे यांचे. 'छत्रपती शिवाजी महाराज' (पूर्वार्ध) या ग्रंथाच्या निवेदनात शिवाजी महाराजांचे अस्सल चित्र बेंद्र्यांना कसे मिळाले, याबाबतची संपूर्ण हकीकत दिली आहे. त्यात लिहिले होते,

'इब्राहिमखान नावाच्या परकीय व्यक्तीचे चित्र शिवाजी महाराजांचे चित्र म्हणून महाराष्ट्राच्या इतिहासविषयक पुस्तकातून छापले गेले होते. हे चित्र मनूची याच्या संग्रहातील होते. यावरून त्याच आकृतीचे चेहरे रंगवून मुसलमान पेहराव चढविलेली तथाकथित शिवाजी महाराजांची बरीच चित्रे प्रसारात आली होती. संदर्भहीन असे महाराजांचे चित्र समाजात पूजिले जात होते. श्री. बेंद्रे संभाजी महाराजांच्या चरित्राची तयारी करण्यासाठी लंडनला गेले होते. ग्रंथ चाळताना त्यांच्यासमोर मॅकेंझीने संपादित केलेल्या ग्रंथाचे काही भाग होते, त्यात 'व्हॅलेंटीन' या डच गव्हर्नरने लिहिलेले पत्र त्यांच्या हाती पडले. इसवी सन १६६३-६४ मध्ये सुरतच्या डच वखरीत तो गव्हर्नर होता. त्याच्या आणि शिवाजी महाराजांच्या भेटीप्रसंगी काढून घेतलेले चित्र आणि व्हॅलेंटीनचे पत्र श्री बेंद्रे यांना मिळाले. बेंद्रे यांनी मूळ चित्राचे तितक्याच आकाराचे एक छायाचित्र काढून घेतले. शिवाजीराजांचे या चित्रात दाखवलेले कल्ले हे इतर कोणत्याही चित्रात दिसणार नाहीत. पांढऱ्या अंगरख्यावर शिवरायांनी चक्क उपरणे टाकले आहे. अंगावरील दागिने अस्सल मराठी पद्धतीचे आहेत (चित्र क्र.१). इंग्लंडमध्ये या चित्राची त्यांनी खात्री करून घेतली. ह्या चित्राच्या प्राप्तीने श्री. बेंद्रे यांना मराठ्यांच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची देणगीच मिळाली. शिवाजी महाराजांच्या या चित्रामुळे

महाराज पातशाह



*Sewadjee.*

चित्र क्र. १७

इब्राहिमखान क्रमिक पुस्तकातून हटला गेला. बेंद्रे यांनी प्राप्त केलेल्या शिवरायांची स्थापना इतिहासविषयक पुस्तकातून आणि घराघरातून झाली. शिक्षणसंस्थांनाच नव्हे, तर शासकीय यंत्रणेलाही त्यांच्या कार्यालयातील शिवाजी महाराजांच्या चित्रमागील अज्ञात गोष्टी आणि डच गव्हर्नरचे लेखन याबद्दल माहिती नसेल. या चित्राची प्राप्ती ही बेंद्रे यांची एक अतिशय महत्त्वाची कामगिरी मानावी लागेल. पुढे बेंद्रे यांनी या चित्राच्या प्रसारास प्रारंभ केला. चित्राच्या आकाराच्या प्रती काढण्यासाठी त्यांनी 'इंडिया हाऊस'कडून परवानगी मिळवली. सरकारी छापखान्यातून अशा प्रती छापण्याची त्यांनी योजना आखली. इसवी सन १९३३ मधील शिवजयंतीच्या निमित्ताने साहित्याचार्य न. चिं. केळकर ह्यांनी हे चित्र समाजापुढे आणण्यासाठी पुण्यातील शिवाजी मंदिरात कार्यक्रम योजला. तेथे या चित्राचे समारंभपूर्वक प्रकाशन केले. (चित्र क्र. २) व्हॅलेंटीनच्या संबंधातील शिवाजी महाराजांचे चित्र आणि त्यासंबंधीचा लेख प्रसिद्ध करून वा. सी. बेंद्रे यांनी अत्यंत महत्त्वाची कामगिरी करून मराठ्यांच्या इतिहासाला तितकेच मोलाचे योगदान दिले.[३१]

श्री वा. सी. बेंद्रे म्हणजे इतिहासाचे भीष्माचार्य. छत्रपती संभाजी महाराजांच्या कारकिर्दीला न्याय देण्याचे काम या महान संशोधकाकडून झाले, पण शिवाजी महाराजांच्या चित्रामागील त्यांनी सांगितलेली गोष्ट मात्र काहीशी वेगळी आहे. 'Den Heer Seva Gi' अशी अक्षरे कोरलेल्या चित्राचा चित्रकार हा 'व्हॅलेंटीन' होता, श्री. बेंद्रे यांनी असे सांगितले असून त्याचा काळ इसवी सन १६६४ म्हणजे सुरत स्वारीसमयीचा सांगितला आहे. परंतु वस्तुस्थिती काहीशी वेगळी आहे. 'शिवाजीमहाराजांची चित्रे' या मथळ्याखाली प्रा. ग. ह. खरे यांनी शिवरायांच्या काही चित्रांवर संशोधनात्मक लिखाण प्रसिद्ध केले होते.[३२] संक्षिप्तरूपाने हा लेख डॉ. जयसिंगराव पवार संपादित 'छत्रपती शिवाजी महाराज स्मृतिग्रंथ' या महाराष्ट्र शासनकृत प्रकाशित ग्रंथात छापण्यात आला. या लेखात सदर चित्राविषयी (चित्र क्र. १) मत मांडताना प्रा. खरे लिहितात,

'न्यू ईस्ट इंडिया या त्रिखंडात्मक (१७२४ ते २६) मध्ये प्रकाशित झालेल्या डच ग्रंथात अनेक मुघल व विजापुरी सरदारांची चित्रे छापली आहेत. त्यात महाराजांचेही चित्र आहे, जे ऊर्ध्वांगी आहे. महाराज वामावर्ती दाखवले आहेत. नेहमीप्रमाणे झुलपे

---

३१. *छत्रपती शिवाजी महाराज (पूर्वार्ध), प्रस्तावना*

३२. *छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथ, पृ. १३५*

व दाढी-मिशा आहेत. उजव्या कानात बाळी व गळ्यात दुहेरी मोतीमाला आहे. अंगावर पांढऱ्या चिऱ्याचा व त्यावर समांतर रेषेमध्ये पाने-फुले काढलेला अंगरखा असून त्यावर दुपट्टा आहे. दोन्ही हातांचे पंजे कशाच्या तरी आधारावर ठेवलेले दिसतात. चित्राखाली "Den Heer Seva Gi' हा डच वाक्यखंड आहे. हे चित्र नेमके कधी काढले समजत नाही, पण उपर्युक्त ग्रंथातील सर्व चित्रे १७१२ मध्ये डच ईस्ट इंडिया कंपनी मुघल दरबारी गेले असता त्याने जमवली असतील. महाराजांनी १६६४ मध्ये सुरतेची पहिली स्वारी केली, त्या वेळी त्यांना प्रत्यक्ष पाहिल्याने हे चित्र काढले, अशी काहींची कल्पना आहे. पण त्यावेळी सुरतेत हलकल्लोळ उडाला असता कोणा चिताऱ्यास स्वस्थता व सवड मिळून त्याची हे चित्र काढण्याएवढी लय लागली असेल असे वाटत नाही. त्यानंतरच्या दुसऱ्या एखाद्या प्रसंगी ते काढलेले असावे. ऑर्मच्या १७८२ मध्ये प्रसिद्ध झालेल्या फ्रेगमेंट्स या पुस्तकात आलेले महाराजांचे चित्र या चित्राची थोडा फरक केलेली नक्कल असावी असे वाटते. व्हॅलेंटीनचे चित्र श्री वा.सी.बेंद्रे यांनी स्वतंत्ररीत्या प्रसिद्ध केले आहे.[३३]

'फ्रांस्वा व्हॅलेंटीन' याने सन १७२४ साली "Oud en Nieuw Oost Indien' (Old and New East India) नावाचा ग्रंथ प्रकाशित केला. या ग्रंथाच्या पहिल्या खंडात पान क्र. २६४ ते २६७ मध्ये छत्रपती शिवाजी महाराजांविषयी लिखाण करून ठेवले आहे. याच ग्रंथात शिवाजी महाराजांचे एक चित्र व्हॅलेंटीनने छापले. त्या चित्राविषयी बेंद्रे आणि खरे यांनी भिन्न भिन्न मत मांडले आहे. बेंद्रे यांच्या मते, सदरील चित्र सुरत येथे काढण्यात आले, तर खरेंच्या मते सदरील चित्र १७१२ साली डच शिष्टमंडळ मुघल दरबारात गेले असता त्यांनी जमवले. पण सदर चित्र कधी अथवा कुणी काढले याविषयी मात्र खरे कोणतेही ठोस विधान करत नाहीत. व्हॅलेंटीनने हे चित्र मुघल दरबारातून मिळवले असावे, असा अंदाज ते व्यक्त करतात. पण, मागील वीस वर्षांमध्ये या चित्राविषयी अनेक नवीन पुरावे उजेडात आले. आधी या चित्राविषयी थोडक्यात माहिती घेऊ यात.

श्री. बेंद्रे यांना मिळालेले चित्र हे व्हॅलेंटीनच्या ग्रंथातून घेण्यात आलेली नक्कल होती. व्हॅलेंटीनने आपल्या ग्रंथात शिवाजी महाराजांचे चित्र त्या ग्रंथाच्या चौथ्या खंडात (भाग २) पान क्र. २४८वर छापले होते. सदर चित्र तयार करण्यासाठी त्याला

---

३३, *कित्ता*

'मॅथ्यूज बॅलेन' याची मदत झाली.[३४] हे चित्र कॉपर इंग्रेविंग प्रकारातील आहे. म्हणजे तांब्याच्या प्लेटवर अतिशय बारीकपणे कलाकुसर करून चित्र रेखाटले जाई. चित्राचे आरेखन झाल्यावर त्यावर शाई भरली जात असे आणि ओलसर कागदावर ती प्लेट ठेवून त्यावर जाडसर वस्तूने दाब देण्यात येई. कागदावर त्या चित्राचा छापा उमटल्यावर बारीक आणि व्यवस्थितरित्या चित्राला मूर्त स्वरूप देण्यात येई. यामुळे एखाद्या चित्रात दाखवता येऊ शकतात, त्याहीपेक्षा छोट्या छोट्या गोष्टींनी चित्र परिपूर्ण होत असे. एका प्लेटवरून दोन किंवा फार फार तीन वेळेस छाप घेता येई. थोडीशीही चूक झाली तर प्लेट मोडून टाकावी लागे. अतिशय किचकट आणि वेळखाऊ असे हे काम होते. सतराव्या शतकात चित्रांच्या छपाईचे तंत्र एवढ्या मोठ्या प्रमाणात विकसित झाले नसल्यामुळे 'कॉपर इंग्रेविंग'चा वापर होत असे. शिवाजी महाराजांचे मंदस्मित आणि त्यामुळे त्यांच्या डोळ्यांजवळ पडलेल्या सुरकुत्या केवळ याच चित्रात अत्यंत सुंदरपणे रेखाटण्यात आल्या, ते याच तंत्राच्या सहाय्याने. या 'कॉपर इंग्रेविंग' तंत्राचा वापर करून तयार झालेले शिवाजी महाराजांचे हे एकमेव चित्र.

या चित्राच्या इतिहासाचा मागोवा घेत असताना काहीशी आश्चर्यकारक माहिती समोर आली. 'रिक्सम्युजियम'ने सन १९९६ साली प्रकाशित केलेल्या आपल्या बुलेटीनमध्ये भारताच्या सतराव्या शतकातील 'लघुचित्र शैली'वर एक संशोधनपर लेख प्रकाशित केला होता[३५] ज्यामध्ये शिवाजी महाराजांच्या चार ते पाच चित्रांवर संशोधनकर्त्याने सविस्तर चर्चा केली होती. सदरील चित्राविषयी माहिती देत असताना एक वैशिष्ट्यपूर्ण नोंद आढळून आली. हे चित्र सन १६८५ साली नेदरलँड्स येथील Simon Schijnvoet नामक एका संग्राहकाने गोवळकोंडा येथून विकत घेतले. म्हणजेच सदरील चित्र हे इसवी सन १६८५ पूर्वीच्या काळात अस्तित्वात होते. या चित्राचे निर्मितीठिकाण गोवळकोंडा आहे. राज्याभिषेक झाल्यानंतर शिवाजी महाराज स्वारीनिमित्ताने दक्षिणेत उतरले होते. इसवी सन १६७७च्या अखेरपर्यंत दख्खनेत शिवाजी महाराजांच्या फौजेचा मुक्काम होता. शिवाजी महाराजांच्या संपूर्ण आयुष्याच्या इंग्रज, डच, फ्रेंच, पोर्तुगीज, फारशी तसेच मराठी भाषेत केलेल्या सर्वच समकालीन नोंदी आज उपलब्ध आहेत, पण केवळ एक समकालीन प्रसंग वगळता

---

*३४. हा एक डच चित्रकार होता. अनेक पुराणकथा त्याचबरोबर ऐतिहासिक व्यक्तींच्या चित्रांचे चित्रण करण्यासाठी तो प्रसिद्ध होता.*

३५. *Het Witsenalbum.*

इतर कोणत्याही दस्तावेजातून अथवा कोणत्याही पुराव्यामधून शिवाजी महाराजांची भेट घेणाऱ्या शिष्टमंडळात 'चित्रकार' असल्याचा उल्लेख वाचायला मिळत नाही. याला अपवादात्मक प्रसंग मात्र घडला गोवळकोंड्याला. ऑगस्ट महिन्यात डचांचे शिष्टमंडळ शिवाजी महाराजांना भेटायला आले होते. त्यामधील एक प्रमुख नाव 'हर्बर्ट डी यागर' 'डच ईस्ट इंडिया कंपनी, नेदरलँड्स' चा भारतात कार्यरत असणारा राजदूत. गणित, वनस्पतीशास्त्र, खगोलशास्त्र, तमिळ, तेलुगु, संस्कृत एवढ्या विषयांवर प्रभुत्व असणारा. शिवाजी महाराजांच्या चित्राचा चित्रकार. या हर्बर्ट डी यागरच्या मृत्यूनंतर त्याच्या संग्रहात असणाऱ्या बऱ्याच वस्तूंची लूट झाली, पण काही वस्तू मात्र अगदी व्यवस्थितरित्या अनेक संग्राहकांच्या हातात पडल्या. त्याच्या वस्तू घेणाऱ्या संग्राहकांपैकी एक नाव, "Simon Schijnvoet'. शिवाजी महाराजांचे चित्र काढणारा हा हर्बर्ट डी यागर नेमका आहे तरी कोण? शिवाजी महाराजांची भेट त्याने कोणत्या गोष्टीसंदर्भात घेतली, शिवाजी महाराजांचे चित्र जर डी यागरने काढले असेल तर ते नेदरलँड्सला कसे पोहोचले अन् व्हॅलेंटीन याच्या पुस्तकात कसे आले? या प्रश्नांचा शोध घेत असतानाच इतिहासाचे एक नवे दालन खुले झाले. एका चित्रामागे केवढा प्रचंड इतिहास दडलेला आहे, हे समजले. हे ज्याच्यामुळे घडले, तो हर्बर्ट डी यागर नेमका होता तरी कोण?

हर्बर्ट डी यागरविषयी अत्यंत कमी लोकांनी विस्तृतपणे माहिती दिली आहे. त्याचे पहिले कारण म्हणजे, डी यागरसंबंधित भरपूर दस्तावेज अजूनही 'हॉग' येथील पुराभिलेखागारामध्ये असून ते अप्रकाशित आहेत. दुसरे म्हणजे केवळ डच आणि इंग्लिश भाषेमध्ये हर्बर्ट डी यागरविषयी सविस्तर लिखाण केलेले आढळून येते, तेही फक्त दोन ते तीन लेखकांकडून. मराठीमध्ये डी यागरविषयी माहिती देण्याचे काम प्रा. ग. ह. खरे यांनी केले. त्यांचेही संशोधन प्रसिद्ध होऊन आज पन्नास वर्षांपेक्षा जास्त काळ उलटून गेला आहे. शिवाजी महाराज आणि हर्बर्ट डी यागर यांच्यात झालेल्या वाटाघाटी आणि शिवाजी महाराजांनी डचांना दिलेला 'कौलनामा' प्रा. खरे यांनी अनुवादित करून संपूर्णपणे प्रकाशित केला. नाही म्हणायला डी यागरविषयी 'इंडियन हिस्ट्री काँग्रेस'च्या १९६६ साली झालेल्या अधिवेशनामध्ये 'रवींद्र वामन रामदास' यांनी एक संशोधनात्मक निबंध प्रकाशित केला होता. त्या निबंधाची मांडणी खरे यांनी प्रकाशित केलेल्या डी यागर याच्या समकालीन कागदपत्रांवर आधारित होती. पण दुर्दैवाने त्या अधिवेशनाचा जो वार्षिक अहवाल प्रकाशित करण्यात आला, त्यामध्ये हा शोधनिबंध संक्षिप्तरूपाने छापण्यात आला होता. त्यामुळे श्री रामदास

यांनी प्रकाशित केलेल्या संशोधनांपैकी केवळ काहीच मुद्दे या अहवालातून वाचायला मिळाले.

'हर्बर्ट डी यागर' हा एका शेतकऱ्याचा मुलगा. 'लीडेन' येथील विद्यापीठामध्ये सुरुवातीला तो तत्त्वज्ञानाचा विद्यार्थी म्हणून दाखल झाला. परंतु 'जेकबस गोलियस' नावाच्या एका विद्वान गृहस्थामुळे त्याच्या आयुष्याची दिशा बदलली. तत्त्वज्ञानासोबतच यागरने पौर्वात्य विद्या, गणित, वनस्पती तसेच खगोलशास्त्र या विषयांचा अभ्यास केला. डी यागर हा याच काळात उत्तम चित्रकार सुद्धा बनला. सैनिकी अभियांत्रिकीचे शिक्षण घेऊन त्याने आपली योग्यता सिद्ध केली.[३६] त्याला अनेक भाषांचे ज्ञान होते. यामुळेच पर्शिया येथे यागरची दोन वेळेस सैन्याधिकारी म्हणून नेमणूक झाली. भारतात सुद्धा त्याला कोरोमंडलच्या किनाऱ्यावर नोकरीसाठी नियुक्त करण्यात आले होते. या वास्तव्यात त्याने तमिळ, तेलुगू आणि संस्कृत या भाषा शिकून घेतल्या.[३७] त्याला अनेक दुर्मिळ वस्तूंचा संग्रह करणे प्रचंड आवडत असे. मुघलांच्या राज्यातील अनेक महत्त्वाच्या व्यक्तींची चित्रे सुद्धा डी यागर ने काढली होती.[३८] डी यागरच्या याच सवयीमुळे तो 'निकोलस विटसेन'च्या नजरेत भरला.

निकोलस विटसेन (चित्र क्र. ६) हा सतराव्या शतकात एमस्टरडॅम शहराचा 'महापौर' म्हणून काम पाहत होता. तब्बल तेरा वेळेस शहराचा 'मेयर' म्हणून त्याची नेमणूक झाली होती. 'VOC - Vereenlgde Oost-indische Campagnie' चा डायरेक्टर 'प्रिन्स विल्यम तिसरा'चा अत्यंत विश्वासू साथीदार आणि 'पीटर द ग्रेट' चा खास मित्र म्हणून निकोलसचा नावलौकिक होता. VOC म्हणजे 'डच ईस्ट इंडिया कंपनी'. भारतात प्रवेश करणाऱ्या सर्वांत पहिल्या परकीय व्यापारी संघटनापैकी एक. निकोलस काही काळ VOC चा डायरेक्टर होता. यामार्फत निकोलस जगभर आपल्या हाताखालील लोकांना पाठवत असे. त्याला नकाशे तयार करण्याचा छंद होता. जगभरातील देशांचे नकाशे त्याने तयार केले. अनेक व्यापारी मार्गांवर स्वत: प्रवास केला. निकोलसला अनेक दुर्मिळ गोष्टींचा तसेच चित्रांचा संग्रह करण्याची प्रचंड आवड होती. तत्कालीन जगात सर्वात मोठ्या संग्राहकांपैकी एक, असा त्याचा नावलौकिक होता. त्याच्या हाताखाली Cornelis de Bruijn, Herbert De Jager, Michel van Musscher, Dirk Valkenburg आणि Maria Sibylla

---

३६. *लिडेन विद्यापीठाची पौवार्त्य संशोधनाला देणगी*

३७. *Herbert de Jager : A Dutch envoy to Shivaji. Pp. 52*

३८. *Nicolaes Witsen and his circle.*

Merian या सर्वोत्तम व्यक्ती काम करत होत्या. यांच्यामार्फत निकोलसने अत्यंत दुर्मिळ समजल्या जाणाऱ्या वस्तू जमा केल्या. यांपैकी सर्वात जास्त चित्रे डी यागरने मायदेशी पाठवली होती. त्यामध्ये पूर्व भारतातील झाडे आणि फळा-फुलांचे चित्र, शेतीमधील नवीन बदल, काही महत्त्वाच्या आणि स्थानिक व्यक्तीची चित्रे होती. निकोलसच्या हाताखाली काम करणारा उपमहापौर म्हणजेच "Simon Schijnvoet'. त्यालाही वस्तूंचा संग्रह करण्याची प्रचंड आवड. सिमॉनने भरपूर कलात्मक गोष्टी जमवल्या. ज्यात सर्वात जास्त संग्रह हा हर्बर्टकडूनच इसवी सन १६८० ते १६८४ दरम्यान विकत घेतलेला होता.[३९] महापौर निकोलस, उपमहापौर सिमॉन आणि चित्रकार हर्बर्ट डी यागर या तीन व्यक्तींचा शिवाजी महाराजांच्या चित्राशी संबंध आला तरी कसा, त्याचीच ही गोष्ट आहे.

ही गोष्ट सुरू होते गोवळकोंडा राज्यात. इसवी सन १६६०च्या सुरुवातीला VOC ने गोवळकोंडा साम्राज्याच्या राजधानीत, हैद्राबाद येथे factory उभा केली. Johannes Bacherus (१६८९), Daniel Havart (१६५०-१७२४), हर्बर्ट डी यागर (१६३६-१६९४) ही काही महत्त्वाच्या डच राजदूतांची नावे. यापैकी Bacherus याचे काढलेले पेंटिंग हे तत्कालीन काळात कापडावर काढण्यात आलेले एका डच व्यक्तीचे एकमेव चित्र आहे. त्याविषयी आपण पुढे पाहूच. Daniel याने १६७० मध्ये हैद्राबाद येथे भेट झालेल्या काही महत्त्वाच्या राजकीय व्यक्तींचे अनुभव, घेतलेल्या मुलाखती 'op-en Ondergang van Coromandel' (Rise  fall of Coromandal) या पुस्तकातून वर्णन करून ठेवल्या आहेत.[४०]

राज्याभिषेकानंतर शिवाजी महाराजांनी कर्नाटकावर स्वारी केली. या मोहिमेचे स्वरूप अतिशय भव्यदिव्य आणि दिमाखदार होते. शिवाजी महाराज 'अभिषिक्त सम्राट' म्हणून दक्षिणेत उतरले होते. स्वराज्याचा विस्तार अगदी तामिळनाडूच्या किनाऱ्यापर्यंत जाऊन पोहोचला होता. याचबरोबर दक्षिणेतल्या सर्वच छोट्या-मोठ्या सत्तांची एकत्रित मोट बांधून दिल्लीवर आक्रमण करण्याचा शिवाजी महाराजांचा मनसुबा होता. स्वराज्यात परतत असताना शिवाजी महाराजांची भेट घेऊन काही सवलती पदरात पाडून घ्याव्यात, या हिशोबाने डच आणि फ्रेंच शिष्टमंडळ मराठा सैन्याचा माग काढत येत होते. अखेरीस ऑगस्ट १६७७ च्या दरम्यान दोन्ही शिष्टमंडळांना शिवाजी

---

३९. *कित्ता.*

४०. *Pomp before disgrace. Pp. 160-82.*

महाराजांची भेट घेण्याचा योग आला. शिवाजी महाराज आणि हर्बर्ट डी यागरची जेव्हा भेट झाली तेव्हा घडलेल्या अनेक गोष्टी यागरने नोंदवून ठेवल्या आहेत. Data Processing Officer म्हणून हर्बर्ट तेगनापट्टणमला काम करत होता.[४१] त्याचा जास्तीत जास्त मुक्काम हैद्राबाद येथे होता. तिथूनच तो पुलिकत बंदरावर नियंत्रण ठेवत असे. वनस्पतिशास्त्रासोबतच हिंदू धर्माचासुद्धा त्याचा प्रचंड अभ्यास होता.[४२]

त्याच्यासोबत दुसरा साथीदार म्हणून 'निकोलस क्लेमेंट' उपस्थित होता. ऑगस्ट ते सप्टेंबर १६७७ या काळातील एकूण एक दिवसाचा रिपोर्ट डी यागरने बटावियाला पाठवला. शिवाजी महाराज हेच दख्खनचे नवे अधिपती आहेत, हे यागरने पुरेपूर ओळखले, त्यामुळे डचांचे मराठ्यांसोबत असणारे जुने संबंध कायम प्रस्थापित व्हावेत आणि अजून काही मागण्या आपल्या पदरात पाडून घेता याव्यात यासाठी यागरला शिवाजी महाराजांची भेट घ्यायची होती. कुतुबशाहने शिवाजी महाराजांचे केलेले भव्य स्वागत, मराठा-गोवळकोंडा राज्यामध्ये मोट बांधण्यासाठी आकन्ना आणि मादन्ना या पंडित बंधूंचे योगदान, शिवाजी महाराजांची दक्षिण कर्नाटकची मोहीम, त्यांचा परतीचा प्रवास, वाटेत येणाऱ्या एकूण एक धार्मिक स्थळांना श्रद्धापूर्वक दिलेल्या भेटी, अशा कित्येक गोष्टी डी यागरने नोंदवून ठेवल्या होत्या.[४३] कुतुबशाहने तर शिवाजी महाराजांसोबत मैत्री कायम ठेवण्यासाठी जिंजीचा भाग सोडण्याची तयारी दाखवली होती.[४४] शिवाजी महाराज जेव्हा हैद्राबादमध्ये पोहोचले तेव्हा कुतुबशहाने त्यांचे भव्यदिव्य असे स्वागत केले. बादशाहने सारे शहर सजवले होते. शहरातील सर्व गल्ल्या-रस्ते कुंकू आणि केशरच्या सड्याने भरून गेले होते. सर्वत्र स्वागताच्या कमानी आणि उत्सवाच्या काठ्या (गुढ्या) उभारण्यात आल्या होत्या. शिवाजी महाराजांचे दर्शन सर्वसामान्य लोकांना सुद्धा घेता यावे, म्हणून मोठमोठाल्या मचानी उभारण्यात आल्या होत्या. शहरातल्या सर्व स्त्रियांनी मंगलदीपकाने शिवाजी महाराजांना ओवाळले. सोन्या-चांदीच्या फुलांची उधळण महाराजांवर होत होती. सोने, चांदी, रत्नांनी भरलेल्या तबकांचा ओघ कुतुबशहाने सुरूच ठेवला होता. या सर्व गोष्टींची नोंद यागरच्या पत्रांमधून आढळते, ज्यामुळे शिवाजी महाराजांच्या कर्नाटक

---

*४१ कित्ता.*

*४२. In Steen geschreven; Leven en sterven van VOC dienaren op de kust van Coromandel in India*

*४३ Xenophobia in 17th century India*

*४४ NA, letters masulipattanam to Batavia 2.9.1677, VOC 1328:628V, Pulicat* to Batavia

स्वारीचे भव्यदिव्य स्वरूप आपल्यासमोर उभे राहते. शिवाजी महाराजांनी केलेल्या सर्व मागण्यांची पूर्तता करण्याची फार मोठी जबाबदारी कुतुबशाहने 'आकन्ना आणि मादन्ना' पंडित या दोघांवर दिलेली होती. त्यांनी शिवाजी महाराजांचा यथोचित सन्मान केला आणि गोवळकोंडा-मराठा राज्यामध्ये मैत्रिपूर्ण संबंध प्रस्थापित झाले. हर्बर्टने अनेक अपरिचित घडामोडींचा लेखाजोखा मांडून ठेवला होता. शिवाजी महाराजांना डचांतर्फे भेट म्हणून जो नजराणा देण्यात आला त्यामध्ये अनेक मौल्यवान गोष्टींची भर टाकण्यास हर्बर्ट डी यागर कारणीभूत होता.[४५]

६ ऑगस्ट १६७७ या दिवशी शिवाजी महाराज आणि हर्बर्ट डी यागर यांची 'वलीकंडापूरम' (तामिळनाडू)[४६] येथे भेट झाली.[४७] या जोडगोळीने आपल्यासोबत 'साखरे' आणि 'मुल्ला' हे दोन दुभाषी घेतले होते.[४८] सतत कोसळणाऱ्या पावसामुळे वातावरण कोंदट झाले होते. आदल्या रात्रीच छावणीजवळ पोहोचलेल्या फ्रेंच आणि डच शिष्टमंडळाला शिवाजी महाराजांच्या दोन वेगवेगळ्या रूपांचे दर्शन झाले. कर्नाटकच्या संपूर्ण मोहिमेत फ्रेंचाकडील एकही व्यक्ती शिवाजी महाराजांना एकदाही भेटायला आली नाही. शिवरायांनी या गोष्टीची जाणीव फ्रेंचांना करून दिली, तेव्हा फ्रेंचांनी एक शिष्टमंडळ तयार करून महाराजांना भेटण्यास पाठवले, पण शिवाजी महाराजांनी त्यांच्याकडे फारसे लक्ष दिले नाही. संपूर्ण रात्र त्या फ्रेंचांना भर पावसात एका झाडाखाली भिजत काढावी लागली. याउलट परिस्थिती डचांची होती. त्यांना जनार्धन पंडित मार्फत राहण्यासाठी तंबू मिळाला.[४९] दुसऱ्या दिवशी भेटीच्या समयी डी यागर आणि निकोलस क्लेमेंट यांना VOCचा झेंडा थेट भेटीसाठी उभारलेल्या शामियान्यापर्यंत नेण्याची परवानगी मिळाली. यावेळेस डी यागरने त्याच्या हाताखाली असलेल्या डच आणि स्थानिक भारतीय अधिकाऱ्यांसोबत मराठ्यांच्या छावणीची वाद्ये वाजवत परिक्रमा सुद्धा केली.[५०] डी यागर आणि निकोलस क्लेमेंट यांनी अतिशय

---

४५. *भेटवस्तू म्हणून Silver Laken (कपड्याचा एक प्रकार), ४ brocades, २ kasses, ८ broad swords, 33 lbs sandle wood, 2 case of rose-water, 76 ell carmosin, 3 deerskin, bengol armosin, 48 lbs cloves, 48 lbs nutmeg, 1 red salin, 1 yellow damascene, silver beatel box, 3 golden chains.*

४६. *डच मराठा रिलेशन्स अंड पोर्टो नोव्हो अफेअर १६७८-१६८०, त्रैमासिक, भारत इतिहास संशोधन मंडळ, वर्ष १२.*

४७. *Pomp before digrace; Nicolaes Witsen and his circle; _संशोधन मंडळ, वर्ष ४७*

४८ *त्रैमासिक, भारत इतिहास संशोधन मंडळ, वर्ष ४७*

४९ *कित्ता*

५० *Pomp before disgrace*

दिमाखदार पद्धतीने शामियान्यात प्रवेश केला. शिवाजी महाराजांची वाट पाहत हे डच राजदूत शामियान्यात बसले होते. हर्बर्टने त्या शामियान्याचे आणि भेटीचे मोठे मजेशीर वर्णन करून ठेवले आहे. तो लिहितो,

'संपूर्ण शामियान्यासाठी महागडे वस्त्र वापरण्यात आले होते. त्या कपड्यावर कोणत्याही प्रकारची कलाकुसर केली नव्हती, तरीही तो कपडा अतिशय तजेलदार दिसत होता. त्यात एका बाजूला एका चौरस मीटर एवढी गादी मांडलेली होती. त्याच्यावर मखमली कापडाचे आवरण चढवले होते. गादीवर सोन्याची कलाकुसर केलेले तक्के ठेवण्यात आले होते. या श्रीमंत थाटाच्या गादीवर राजा बसत असे. कदाचित हे सर्व भव्यदिव्य स्वरूप आमच्या स्वागतासाठी उभे केले असावे अथवा कदाचित कंपनीचा आदर करण्यासाठी म्हणून सुद्धा! नाहीतर हा त्यांच्या राजासाठी उभा केलेला खास शामियाना असू शकतो, जो प्रत्येक स्वारीच्या वेळी उभारण्यात येई. त्यांच्या नित्य सवयीची (प्रत्येक मोहिमेच्या वेळी) ती बाब असावी.

आम्ही शामियान्यात गेल्याच्या साधारण अर्ध्या तासाने शिवाजी त्याचे मंत्री जनार्धन पंडित आणि रघुनाथ पंडित यांच्यासमवेत आला. त्याचा पाय शामियान्यात पडताच आम्ही उठून उभे राहिलो. रघुनाथ आणि जनार्धन पंडित हे दोघे भाऊ. राजाने त्याची जागा घेतली. रघुनाथ पंडितने आपले दोन्ही पाय मुडपून घेतले आणि तो राजाच्या उजव्या बाजूस बसला. जनार्धनसुद्धा त्याच पद्धतीत राजाच्या डाव्या बाजूस येऊन बसला. आम्ही राजापासून चार-पाच फूटांच्या अंतरावर होतो. राजाने सोन्याचे नक्षीकाम केलेला अंगरखा घातलेला होता. डोक्यावर सोन्याने सजलेला मंदिल (जिरेटोप) होता आणि उजव्या हातामध्ये सोन्याचे पाणी चढवलेल्या, रत्नांनी सजलेल्या मूठीची तलवार होती, ज्याची म्यान हिरव्या रंगाची होती. म्यानेवर सुद्धा सोन्याचे काम प्रचंड प्रमाणात केले होते. त्याच्या पाठीमागील बाजूस सोन्याचे तबक ठेवले होते जे निरोपाचे विडे देण्यासाठी वापरले जाई. मागील दोन्ही बाजूंस त्याचे खास सैन्याधिकारी उपस्थित होते. थोडक्यात काय, तर आम्ही येथे एका वैभवशाली, शानदार राज्याच्या राजाची भेट घेण्यास आलोय, अशी आमची भावना दृढ झाली.'[५१]

जेव्हा यागर शिवाजी महाराजांना भेटला तेव्हा डचांच्या काही मागण्या त्याने

---

५१ *त्रैमासिक, भारत इतिहास संशोधन मंडळ, वर्ष ४७*

शिवाजी महाराजांसमोर मांडल्या. डच आणि शिवाजी महाराजांमध्ये जे काही बोलणे झाले ते अत्यंत महत्त्वाचे होते. सर्वांत विशेष बाब म्हणजे, हर्बर्ट डी यागरला अभय देताना शिवाजी महाराजांनी जो 'कौलनामा' तयार केला, तो द्विभाषीय होता. म्हणजेच डच आणि मराठी भाषेत हा कौल तयार करण्यात आला. बहुतेक इतिहासात घडून गेलेले या प्रकारचे हे एकमेव उदाहरण असावे. याचे भाषांतर करण्याचे काम सर्वांत पहिल्यांदा प्रा. ग. ह. खरे यांनी केले. अलीकडच्या काळात श्री. निखील बेल्लाळीकर यांनीसुद्धा अनेक शोधनिबंध प्रकाशित करून या कौलनाम्यावर वेगळ्या पद्धतीने प्रकाश टाकला आहे. या कौलनाम्यावर पहिल्यांदा संशोधनात्मक प्रकाश टाकण्याचे काम केले डॉ. नीळकंठ शास्त्री यांनी. 'इंडियन हिस्ट्री कॉंग्रेस'च्या तिसऱ्या अधिवेशनात शिवाजी महाराजांच्या काही अप्रकाशित आणि महत्त्वाच्या कौलांवर संक्षिप्तरूपाने निबंध प्रकाशित केला, ज्यामध्ये सदर कौलाचा समावेश होता. पुढे १९६९मध्ये भारत इतिहास संशोधन मंडळाच्या त्रैमासिकात दिल्ली येथील इतिहासकार तपन रायचौधरी यांनी हा कौल स्वतंत्रपणे प्रकाशित केला. २००९मध्ये Gijs Kruijtzer यांनी त्यांच्या सुप्रसिद्ध पुस्तकात "xenophobia' मध्ये हा कौल सविस्तरपणे चर्चिला आणि अखेरीस त्याचे संपूर्ण भाषांतर २०१६मध्ये निखील बेल्लाळीकर यांनी प्रसिद्ध केले.[५२]

या कौलामध्ये डचांनी अनेक मागण्या केल्या आणि शिवाजी महाराजांनी त्यांस मान्यतासुद्धा दिली, पण एका अटीवर. त्या कौलामध्ये केलेली एक मागणी होती गुलामांच्या खरेदीविक्रीची. याला अतिशय कडक शब्दांत शिवाजी महाराजांनी उत्तर दिले होते. यागरने ते जसेच्या तसे नोंदवून ठेवले आहे. शिवाजी महाराज म्हणाले,

'यावनी सत्ता असताना स्त्री आणि पुरुष गुलामांची खरेदी-विक्री करण्यास तुम्हाला सबंध कर्नाटकात कुणीही अडवत नसे. त्यासाठी सर्व सोयी तुम्हाला उपलब्ध होत्या. पण आता मी या कर्नाटक भागाचा स्वामी असल्याकारणाने तुम्हाला गुलामांची खरेदी-विक्री करता येणार नाही. किंबहुना आम्ही ते होऊ देणार नाही. तरीही तुम्ही तुमच्या देशात गुलामांची विक्री करण्याचा प्रयत्न केलाच, तर आमची माणसे तुम्हाला अडवतील आणि या कृत्याचा कडाडून विरोध करतील. या सूचनेचा गंभीरपणे विचार करून त्याचे पालन तुम्हाला करावेच लागेल.'[५३]

या भेटीमध्ये एक फार मजेशीर प्रसंग घडला. हर्बर्ट लिहितो,

---

५२ *Dutch Maratha relations under Shivaji 1660-80.*

५३ *Contemporary Dutch translation of qaul Shivaji to VOC 26.6 accounting year 1078 (i.e. 1088 -.H.)/26.8.1677, VOC 1339: 1010.*, या कौलाची एक भाषांतरित प्रत (दोन छोट्या चुकांसह)

'आमची बोलणी सुरू असताना अनेक लोक मध्येच राजाला भेटायला येत. राजा त्यांच्याकडून गोष्टी ऐकून घेत असे. प्रत्येकजण येताना कोणतातरी कागद किंवा पत्र घेऊन येत असे. सर्वांना काही ना काही सूचना राजाकडून मिळत होत्या. आमची बोलणी संपल्यावर आम्ही तिथल्या एका व्यक्तीला या लोकांविषयी विचारले. त्याने सांगितले, की ते सर्व हेर होते. संपूर्ण हेरांची संख्या जवळपास एक हजाराच्या जवळपास असावी. त्यांच्यामुळे आमच्या संवादात अनेकदा व्यत्यय आला.'[५४]

या भेटीदरम्यान हर्बर्ट डी यागरने शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्वाविषयी सुद्धा अनेक निरीक्षणे नोंदवून ठेवली आहेत. यागर म्हणतो, 'मी कोणत्याही प्रकारे शिवाजीच्या हालचालींविषयी खात्रीशीर माहिती देऊ शकत नाही. कारण हा राजा प्रचंड सावध आहे. फार कमी लोकांना विश्वासात घेऊन आपल्या पुढील योजना तो मांडतो. त्याचा शब्द कुणीच टाळत नाही. उलट, त्याच्या शब्दाला प्रचंड मान आहे.'[५५] एवढेच नव्हे, तर जोवर शिवाजी महाराजांना कुतुबशाहकडून आर्थिक मदतीचा ओघ सुरु होता तोवर गोवळकोंड्याच्या राज्यात कोणत्याही सैनिकाने कसल्याही प्रकारचा उपद्रव द्यायचा नाही, अशी सक्त तंबी शिवाजीराजांनी देऊन ठेवल्याचे हर्बर्ट लिहितो. ऑगस्ट १६७७मध्ये शिवाजी महाराजांसोबत तहाच्या वाटाघाटी यशस्वीरित्या पूर्ण झाल्यावर हर्बर्ट डी यागर आणि त्याचा साथीदार निकोलस क्लिमेंट यांनी परतीचा प्रवास सुरू केला.

हर्बर्ट आणि शिवाजी महाराजांच्या भेटीची ही काहीशी विलक्षण वाटणारी हकीकत. यागर सुंदर चित्रकार होताच. त्याच्या कागदपत्रांमधून शिवाजी महाराजांचे चित्र यागरने काढल्याची नोंद आढळते. ही चित्रे काढताना त्याच्या धूर्त स्वभावाची जाणीव आपल्याला होते. केवळ शिवाजी महाराजच नव्हेत तर महाराजांच्या दरबारातील कित्येक महत्त्वाच्या व्यक्तींची सुद्धा चित्रे यागरने काढली होती.[५६] अर्थात, ही प्रचंड मोठी गोष्ट आहे. शिवाजी महाराजांची काही समकालीन चित्रे आज अस्तित्वात

---

*Heeres, Corpus, ३: ६१-५ यामध्ये छापण्यात आली. काहीशी वेगळ्या स्वरुपात भाषांतर केलेली अजून एक प्रत न्यूझीलंडच्या एका ग्रंथात छापलेली आढळून आली. या दोन्ही भाषांतरित प्रतींमध्ये बऱ्याच प्रमाणात विसंगती आढळून येण्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे, हा कौल दोन भाषांमध्ये तयार करण्यात आला होता. तत्कालीन कागदपत्रांचा अभ्यास करता, ही दुर्मिळ आणि सहसा इतरत्र न आढळून येणारी गोष्ट आहे.*

५४ *Mughal warfare : Indian frontiers and high roads to empire 1500-1700*

५५ *Herbert de Jager : A Dutch envoy to Shivaji*

आहेत, परंतु महाराजांच्या काळातील स्वराज्यातील इतर कोणत्याही व्यक्तीचे अस्सल चित्र आजवर उजेडात आले नाही. त्यामुळे यागरने काढलेली चित्रे उजेडात आली, तर नक्कीच हे मराठ्यांच्या इतिहासातील फार मोठे कार्य ठरेल. यागर अजून बऱ्याच गोष्टींवर प्रकाश टाकतो, ज्याविषयी इतर साधनांमधून एवढी ठोस माहिती मिळत नाही. जसे की, हैद्राबाद येथे मुक्कामी असताना शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाने अनेक चित्रकार-कलाकारांना आकर्षित करून घेतले होते. शिवाजी राजांनीही काही चित्रकारांना आपल्या पदरी ठेऊन घेतल्याची नोंद यागर करून ठेवतो.[५७] शिवाजी महाराजांनी भेटीसाठी उभारलेल्या शामियान्याचे यागरने केलेले वर्णन शिवाजी महाराजांच्या जिरेटोपापासून मोजडीपर्यंत सोन्याचे नक्षीकाम केल्याचे यागर लिहितो. आजवर कित्येक ऐतिहासिक पार्श्वभूमीवर तयार करण्यात आलेल्या चित्रपटांमध्ये, नाटकांमध्ये अथवा कादंबऱ्यांमध्ये शिवाजी महाराजांना अतिशय विरक्त वृत्ती, साधी राहणी वगैरे विशिष्ट प्रतिमेत दाखवले आहे, पण शिवाजी महाराज एका स्वतंत्र राज्याचे छत्रपती होते, अभिषिक्त सम्राट होते हेच त्यांच्या राहणीमानातून झळकते. शिवाजी महाराजांच्या मनसदीवर तसेच आलेल्या पाहुण्यांना बैठक संपल्यानंतर देण्यात येणारा विड्याचा डबादेखील सोन्याचा होता, हे यागर विशेषत्वाने नोंदवतो. त्याच्या वर्णनात वाचायला मिळणारी अजून एक महत्त्वाची नोंद म्हणजे शिवाजी महाराजांच्या 'म्यान' चे वर्णन. शिवरायांच्या जगदंबा तलवारीविषयी भरपूर तपशील आज उपलब्ध आहे. तसेच, तलवारीच्या एकूण एक कागदोपत्री पुराव्यांविषयी इतिहासकारांनी सविस्तर चर्चा केलेली आहे. इतिहास संशोधक इंद्रजीत सावंत सरांनी तर भवानी तलवार, जगदंबा तलवार तसेच शिवाजी महाराजांच्या इतर शस्त्रांवर अतिशय सुंदर पुस्तक प्रकाशित केले आहे,[५८] पण शिवरायांच्या तलवारीची म्यान कशी होती, कशा प्रकारची होती याविषयी कोणतेही कागद स्पष्टीकरण देत नाहीत. यागरच्या नोंदीमुळे मात्र म्यान आणि त्यावरील कलाकुसर अगदी त्रोटक स्वरूपात का होईना, आपल्याला समजते. पुराव्याअभावी शिवकाळातील अनेक गोष्टी आपण ठामपणे सांगू शकत नाहीत त्यापैकीच एक गोष्ट म्हणजे शिवाजी महाराजांचे हेर खाते. या खात्याविषयी एवढी गुप्तता पाळण्यात आली होती, की बहिर्जी नाईक यांच्याविषयी अगदी दोन-तीन प्रसंग सोडले तर साधा उल्लेखसुद्धा पाहायला मिळत नाही. जो आहे

---

५६ *कित्ता*

५७ *Pomp before disgrace*

५८. *शोध भवानी तलवारीचा.*

तो उल्लेख सुद्धा अगदीच एखाद्या ओळीपुरता सीमित आहे. इतर हेरांविषयी आणि हेरखात्याच्या प्रणालीविषयी तर काही बोलायलाच नको. शिवाजी महाराजांच्या स्वराज्यात नेमके किती हेर कार्यरत होते, हे सांगणारी एकमेव व्यक्ती म्हणून हर्बर्ट डी यागर उठून दिसतो. अर्थात, त्याने अंदाजे जवळपास एक हजार हेरांचे जाळे दक्षिणेत पसरवल्याचे सांगतो, पण नेमका आकडा तोही देऊ शकला नाही. कर्नाटकच काय, दक्षिण भारतात कोणत्याही कोपऱ्यात काहीजरी झाले, तरी त्याची खबरबात शिवाजी महाराजांना असे. एकाच वेळेस शिवाजी महाराजांनी हजारो डोळ्यांनी आणि हजारो उघड्या कानांनी कर्नाटकाच्या मोहिमेचे सारथ्य केले आणि विजयश्री संपादन केली, हेच खरे. शिवाजी महाराजांनी सतराव्या शतकात गुलामांची खरेदी-विक्री करण्यावर बंदी आणली होती. आपल्या या हुकमाचा अवमान झाल्यास कडक शासन करण्याची तंबीसुद्धा डचांना मिळाली होती. हुकुम देत असताना शिवाजी महाराज स्वत:ला 'दख्खन देशाचा स्वामी' म्हणवून घेतात, ही साधी गोष्ट नाही. संपूर्ण कर्नाटक आणि तमिळनाडूच्या काही भागावर वर्चस्व प्रस्थापित करून शिवाजी महाराजांचे साम्राज्य 'अहद रायरी, तहद जिंजी' पसरले होते. एवढ्या प्रचंड भागावर अधिपत्य गाजवणारे 'शिवबाराजे' संपूर्ण भारतात 'सम्राट' म्हणूनच संबोधले जाऊ लागले. आदिलशाही, कुतूबशाही यांसारख्या बलाढ्य राजसत्तांना आपल्या अंकित ठेवून इतर लहान-मोठ्या राज्यांना एकत्र करून औरंगजेबाच्या गादीला जोरदार धक्का देण्याची तयारी शिवरायांनी केली होती. पुढच्या काळात दिल्लीवर स्वारी झाली असती तर त्या मोहिमेचे नेतृत्व कोणत्याही संभ्रमाशिवाय शिवाजी महाराजांकडेच आले असते, याची जाणीव प्रत्येकालाच होती. शिवराय केवळ महाराष्ट्रापुरतेच नव्हे तर सबंध दख्खनेसाठीच आशेचा किरण होते आणि म्हणूनच शिवरायांना सर्व जनतेने आपला 'स्वामी' मानले.

इतिहासात घडून गेलेल्या एका महत्त्वपूर्ण घटनेचे वर्णन असलेले डच लेख प्रा. ग. ह. खरे यांना मिळाले कसे, ही गोष्ट फार विलक्षण आहे. 'arts letters या नियतकालिकाच्या १९४९मधील २३व्या खंडाच्या दुसऱ्या अंकात प्रो. फोगेल यांचा 'Leiden' विद्यापीठाची पौवार्त्य संशोधनाला देणगी' हा लेख प्रकाशित झाला होता. त्यात ५१ क्रमांकाच्या पानावर हर्बर्ट डी यागर या बहुभाषिक डचाचा उल्लेख आला होता. त्यात लिहिले होते, 'हा शेतकऱ्याचा मुलगा लिडेनमध्ये तत्त्वज्ञानाचा विद्यार्थी म्हणून दाखल झाला, परंतु जेकबस गोलियस नावाच्या इसमामुळे त्याने पौर्वात्य विद्या, गणित, वनस्पती तसेच खगोलशास्त्राचा अभ्यास केला. तो उत्तम चित्रकार

होता. त्याला फारसी, तमीळ, तेलुगू आणि संस्कृत एवढ्या भाषा येत होत्या. त्याने सैनिकी अभियांत्रिकीमध्ये सुद्धा शिक्षण घेतले होते. त्याच्या बहुभाषिकतेमुळे त्याला गोवळकोंडा, त्याचबरोबर शिवाजीकडे वकिलीसाठी पाठवण्यात आले होते', ह्यापलीकडे जास्त उल्लेख या लेखात नव्हता. सन १९५४ मध्ये हैद्राबाद येथे Indian Historical Records Commision चे अधिवेशन भरले होते. यात ग. ह. खरे यांची भेट मादाम मेरी ज्युरीआन्स यांच्यासोबत झाली. त्या हेग येथील पुराभिलेखागार मध्ये अभिलेखागार होत्या. त्यावेळी खरे आणि मादाम मेरी यांच्यात 'हर्बर्ट डी यागर' संबंधी चर्चा झाली. मादाम मेरी जेव्हा हेगला परतल्या, तेव्हा त्यांनी आवर्जून या गोष्टीचा शोध घेतला आणि काही महिन्यांनी त्यांनी एक पत्र प्रा.खरे यांना पाठवले ज्यामध्ये यागरशी संबंधित सर्व दस्तावेज हेगमध्ये सुरक्षित असल्याचे समजले. डच कागदपत्रांशी संबंधित 'दाग रजिस्टर' मध्ये या दस्तावेजचा समावेश झालेला नव्हता. तो अजूनही अप्रकाशित आहे, हे समजल्यावर खरेंना इतिहासाचे एक अपरिचित पान उलगडले गेल्याची जाणीव झाली. त्यांनी त्या कागदांच्या काही मायक्रोफिल्म्स मागवून घेतल्या. या कामासाठी त्यांना त्याकाळी १४ रुपये खर्च आला. दिल्ली येथे असणाऱ्या राष्ट्रीय अभिलेखागारात काम करणारे तपन रायचौधरी या विद्वान डच भाषातज्ज्ञाने संपूर्ण दस्तावेज भाषांतरित करून दिला.

इसवी सन १६८४-८५ दरम्यान औरंगजेबाचे गोवळकोंड्यावर आक्रमण झाले. दख्खनेत प्रचंड मोठी राजकीय उलथापालथ झाली. यावेळेस भरपूर प्रमाणात मौल्यवान वस्तू डचांनी आपल्या मायदेशी पाठवण्याचा निर्णय घेतला. हर्बर्टने आपल्याकडे असलेल्या काही पेट्या नेदरलँड्सला पाठवल्या तर दोन पेट्या घेऊन तो स्वत: बटावियाला गेला. सन १६९४मध्ये त्याचा बटाविया येथे मृत्यू झाला. त्याच्याकडे असलेल्या दोन भल्यामोठ्या पेट्या नेदरलँड्स येथे पाठवण्यात आल्या. त्यामध्ये हर्बर्टने लिहिलेली कागदपत्रे, हस्तलिखिते, छापील पुस्तके, चित्रे यांचा समावेश होता. काही इतिहासकारांच्या मते जेव्हा हे पेटारे ॲमस्टरडॅम येथे हलवण्यात येत होते तेव्हा ते काही खासगी संग्राहकांकडून लुटण्यात आले.[५९] अशा रीतीने शिवाजी महाराजांची दक्षिणेत काढलेली चित्रे भारताबाहेर जाण्यास औरंगजेब कारणीभूत ठरला. नेदरलँड्स येथे असणाऱ्या सर्वच चित्रांविषयी एकत्रित माहिती घेण्याची गरज आहे.

नेदरलँड्सच्या ॲमस्टरडॅम शहरामध्ये एक जगप्रसिद्ध संग्रहालय आहे, 'रिक्सम्युजियम'.

५९. *n Steen geschreven; Leven en sterven van VOC dienaren op de kust van Coromandel in India; NA, Aanwinsten 1934, IX, no. 1649*

या संग्रहालयात जगभरातल्या नानाविध वस्तूंचा भरणा केल्याचे आपल्याला दिसून येते. याच म्युजियममध्ये असणारा एक महत्त्वाचा ठेवा म्हणजे 'विटसेन अल्बम'. निकोलस विटसेन याचा संग्रह. इसवी सन १६८६पर्यंत काढलेल्या ४८ चित्रांनी हा अल्बम सजला आहे. सतराव्या शतकात होऊन गेलेल्या अनेक महत्त्वाच्या राजकीय व्यक्तींची चित्रे आपल्याला या अल्बममध्ये दिसून येतात. काही मुघल तर काही कुतुबशहा राजे, मंत्री, सरदार यांची चित्रे आहेत. याचबरोबर छत्रपती शिवाजी महाराजांच्या चित्रामुळे हा अल्बम इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरतो. जगभरात शिवाजी महाराजांची जेवढी चित्रे प्रकाशात आली आहेत, त्यातील बहुतांश सर्वांवरच डच भाषेतील मजकूर कोरला आहे. म्हणजेच, शिवाजी महाराजांच्या समकालीन अस्सल चित्रांपैकी अर्ध्याहून जास्त चित्रांचे निर्माते डच लोक होते, हे यावरून समजून येते. सध्या नेदरलँड्स येथे असणाऱ्या चित्रांविषयी सर्वप्रथम चर्चा करू.

ॲमस्टरडॅम येथील रिक्सम्युजियममध्ये शिवाजी महाराजांची दोन चित्रे आपल्याला पाहता येतात. दोन्ही चित्रे अत्यंत श्रीमंत पद्धतीने रेखाटली आहेत. यातील पहिले चित्र (चित्र क्र. ३) हे अतिशय सुंदर आहे. शिवाजी महाराजांच्या या चित्राचा कॅटलॉगमधील उल्लेख "Portret van Maratha vorst Shivaji met uitvoerig Hollands onderschrift op de versierde omlijsting"[६०] असा असून त्याचा प्राप्तीकाळ सन १९७२ सांगितला आहे. चित्रावर डच भाषेत कोरलेला मजकूर वाचता येत नसला तरीही त्यावरील 'Siesvage' हा शब्द ठळकपणे नजरेत भरतो. या चित्राचा आकार २३.८×१८.७ सेमी. एवढा आहे. चित्राचे निर्मितिस्थळ 'गोवळकोंडा' सांगितले असून चित्राचा निर्मितिकाळ इसवी सन १६८० (अंदाजे) नमूद करण्यात आला आहे. सदर चित्राचे रेखाटन ब्रशने करण्यात आले असून चित्रकार मात्र अज्ञात असल्याचे नोंदवले आहे. या चित्रात शिवाजी महाराज उभे असल्याचे दाखवले असून त्यांच्या उजव्या हातात धोप, तर डाव्या हातात पट्ट्याची खोबणी घातल्याचे दिसून येते. महाराजांच्या जिरेटोपावर मागच्या बाजूने मोत्यांचा गोंडा लोंबकाळताना दाखवला असून समोरील बाजूस तुरा खोवलेला आहे. कानात साधी कर्णभूषणे आणि गळ्यात केवळ मोत्यांची माळ दाखवली आहे. या चित्रात महाराजांच्या अंगावर दागिने जरी नसले तरी चित्र रेखाटताना मात्र सोन्याचा प्रचंड वापर केलेला आहे. शिवाजी महाराजांचे लांब कल्ले,

---

६०. *इंग्रजी अनुवाद – Portrait of Maratha Prince 'Shivaji' with extensive Dutch caption on the decorated frame.*

टोकदार दाढी, बारीक आणि टोकाला बाकदार झालेल्या मिशा, लांबसडक नाक आणि भव्य कपाळ याही चित्रात स्पष्टपणे दिसून येते. चित्राच्या मागील भागामध्ये फिकट पोपटी रंग भरला आहे. अंगात पांढऱ्या रंगाचा अंगरखा आणि त्यावर लाल-निळ्या-हिरव्या रंगांत फुलांचे नक्षीकाम चित्रित केले आहे. अंगावर सोनेरी-लाल रंगाचा काठ असलेला दुपट्टा घेतलेला असून कमरेस सोनेरी पदराचा आणि लाल-पांढऱ्या रंगाची नक्षी असलेला शेला गुंडाळला आहे. हातातील पट्ट्याची खोबणी आणि तलवारीची मूठ सोनेरी आहे. पण तलवारीचे म्यान आणि मूठीच्या आतील गादी मात्र 'गुलाबी' रंगाची आहे. तलवारीच्या मूठीमध्ये असणाऱ्या गादीचा रंग सर्रासपणे लाल असल्याचे आजवर निदर्शनास आले आहे. कदाचित मूठीच्या आतील गादी तसेच म्यान सुद्धा लाल रंगाची असावी. चित्राच्या बाजूने अंडाकृती आकारात नक्षीकाम करण्यात आले असून त्यामध्ये सोन्याचा मुक्तहस्ते वापर केलेला आहे. तसेच, चित्राच्या बाजूने सोन्याच्या पानाफुलांची नक्षी कोरलेली आहे. अत्यंत सुंदर अशा या चित्रात शिवाजी महाराजांचा निर्विकार चेहरा रेखाटला आहे.

याच संग्रहालयात असणारे दुसरे चित्र सुद्धा फार आकर्षक आहे. (चित्र क्र. ४) शिवाजी महाराजांच्या या चित्राचा कॅटलॉगमधील उल्लेख "Portrait of Shivaji' असा केला आहे. हे चित्र म्युजियमकडे सन १८१६मध्ये हस्तांतरित करण्यात आले. यावर कोरलेला डच भाषेतील मजकूर अतिशय वैशिष्ट्यपूर्ण असून तो वाचता येण्याजोगा आहे. त्या चित्रावर लिहिले आहे, "Siwagii, Vorst in Decam, met wiens zoon Senbagii den Sultan -bulhasan, koning van Kolkonda, over het Rijk geoorlogt heeft'.

थोडक्यात अर्थ, 'शिवाजी, दक्खनचा राजा, ज्याचा मुलगा संभाजी आहे, त्याने गोवळकोंड्याचा राजा सुलतान अबुलहसन याच्या साम्राज्यावर चढाई केली.'

या चित्राचा चित्रकार अज्ञात आहे. चित्राचे निर्मितीस्थळ 'गोवळकोंडा' सांगितले असून निर्मिती काळ इसवी सन १६७५ ते इसवी सन १६८५ एवढा नमूद करण्यात आला आहे. पण, त्यावर कोरलेल्या डच मजकुराचा विचार केल्यास, त्यातील 'गोवळकोंडा सुलतान अबुलहसनच्या साम्राज्यावर चढाई केली' यावर लक्ष केंद्रित केल्यास सदर चित्र महाराजांच्या हयातीतच काढले असण्याची शक्यता बळकट होते. चित्राच्या वरील बाजूस पर्शियन मजकुरात शिवाजी महाराजांचे नाव लिहिले असून, 'सुरत-ए-सिवाजी अस्त' (हे शिवाजीचे चित्र आहे) असे नमूद केले आहे. चित्राच्या खालील बाजूस महाराजांचे नाव "Siuagi' असे पोर्तुगीज भाषेत कोरलेले

आहे. एकाच चित्रावर पर्शियन, डच आणि पोर्तुगीज अशा तीन भाषांमध्ये शिवाजी महाराजांचे नाव लिहिलेले हे एकमेव चित्र अस्तित्वात आहे. त्याचप्रमाणे या एकाच चित्रावर शिवाजी महाराजांच्या नावासोबत संभाजी महाराजांचेही नाव आढळते. हे चित्र ब्रशने रेखाटले असून त्याचा आकार २०.३×१४ सेमी एवढा आहे. या चित्रात शिवाजी महाराज उभे व सव्यावर्ती दाखवले आहेत. महाराजांच्या डोक्यावर तुरा खोवलेले लाल, हिरव्या आणि सोनेरी रंगाचे एक पागोटे असून ते अतिशय साध्या पद्धतीने गुंडाळलेले आहे. कानातील एका मोत्याची बाळी सोडल्यास अंगावर इतर कोणत्याही प्रकारचा दागिना दिसत नाही. कानातील आभूषण अत्यंत साध्या पद्धतीचे आहे. शिवाजी महाराजांचे लांब कल्ले, निमूळती टोकदार दाढी, विरळ मिशा, वक्राकार भुवया आणि मोठे व भेदक डोळे, बाकदार नाक ही वैशिष्ट्ये ठळकपणे नजरेस पडतात. या चित्रात महाराजांच्या डोळ्याजवळ सुरकुत्या अतिशय सुंदर पद्धतीने चित्रकाराने रेखाटलेल्या आहेत. यावरून, नक्कीच हे चित्र महाराजांच्या अखेरच्या काळात प्रत्यक्षदर्शीने काढल्याचा अंदाज आपण बांधू शकतो. अंगावर पांढऱ्या रंगाचा अंगरखा असून त्यावर लाल व फिकट तांबड्या रंगाचे पट्टे ओढले आहेत. त्यांमध्ये समांतर रेषेत हिरव्या व जांभळ्या पानाफुलांची नक्षी चितारण्यात आली आहे. महाराजांनी अंगाभोवती घेतलेल्या सोनेरी रंगाच्या दुपट्ट्यावर सुद्धा पानाफुलांची नक्षी चितारली आहे. तसेच, कमरेस अतिशय श्रीमंत पद्धतीचा, वेगवेगळे मौल्यवान हिरे, मोती, माणकं चिकटवलेला शेला गुंडाळलेला आपल्याला दिसून येतो. शेल्यात कट्यार खोवलेली असून तिची मूठ सोन्याची आहे. उजव्या हातात धोप तर डाव्या हातात पट्टा शिवाजी महाराजांनी धारण केला आहे. तलवारीची मूठ तसेच पट्ट्याची खोबणी पूर्ण सोन्याची आहे. तलवारीच्या आणि कट्यारीच्या म्यानाचा रंग जांभळा आहे तर पट्ट्याच्या आवरणावर फिकट गुलाबी रंग आढळतो. चित्राच्या मागील बाजूस फिकट पोपटी रंग दिलेला असून वरील बाजूस काळपट ढगांचे चित्रण केले आहे. शिवाजी महाराज झरोक्यात थांबले आहेत हे दाखवण्यासाठी चित्रकाराने मोठ्या खुबीने पायाजवळ जाळीदार नक्षीकामाचा लहान सज्जा रेखाटला आहे. चित्राच्या बाजूने पाना-फुलांची नक्षी चितारली आहे. या चित्रावर सोन्याचे काम प्रचंड प्रमाणात केल्याचे आपल्याला दिसून येते. सदर चित्र तांत्रिक गोष्टींच्या सहाय्याने 'स्कॅन' केल्यामुळे या चित्राचा अस्सल रंग मात्र येऊ शकला नाही. मध्यंतरी 'द न्यू इंडियन एक्सप्रेस' या वृत्तपत्रात या संग्रहालयाशी निगडित एक बातमी छापून आली होती.[६१]

६१. *The New Indian Express, 12th October 2020*

त्या बातमीच्या अनुषंगाने शिवाजी महाराजांचे सदरील चित्र छापण्यात आले. (चित्र क्र. ५) या बातमीत छापून आलेला फोटो आणि संग्रहालयाकडून प्राप्त झालेल्या फोटोमध्ये प्रचंड फरक आहे. जसे की, शिवाजी महाराजांच्या डोक्यावरील पागोट्याचा जिथे हिरवा रंग दिसतो, त्याजागी मूळ चित्रात सोन्याचे काम केले आहे. अंगावर घेतलेला दुपट्टा पूर्ण सोन्याचा आहे. तलवारीची मूठ आणि पट्ट्याची खोबणी पूर्ण सोन्याची, तसेच कमरेचा शेलासुद्धा पूर्णपणे सोन्याच्या कामाने सजला आहे. या चित्राच्या बॉर्डरमध्ये सुद्धा सोन्याचे नक्षीकाम केलेले आहे. पण, स्कॅन प्रतीमध्ये मात्र जिथे जिथे सोन्याचा वापर झाला आहे त्याजागी काळपट तांबडा किंवा हिरवा रंग आला आहे. त्यामुळे, हे चित्र अतिशय श्रीमंत पद्धतीने तयार झालेले असूनही केवळ रंगसंगतीच्या घोळामुळे चित्राच्या सुवर्ण कारागिरीची जाणीव मात्र सहजासहजी होत नाही.

या चित्रावर याआधी अनेक अभ्यासकांच्या संशोधनातून प्रकाश टाकण्यात आला आहे. 'फ्रेडरिक जोहान्नस लग्ट' (Frits Lugt) यांच्या १९२१ साली प्रकाशित झालेल्या महत्त्वाच्या पुस्तकात त्यांनी या चित्रावर प्रकाश टाकला आहे.[६२] 'फिलीप क्लार्क' आणि 'ल्यान रिचर्ड्स' यांनी संपादित-अनुवादित केलेले 'एशियन आर्ट' हे संशोधनात्मक मासिक 'रिक्सम्युजियम'च्या वतीने २०१४ साली प्रकाशित करण्यात आले होते. याच संशोधनपुस्तिकेत Pauline Lunsingh Scheurleer यांनी सदरील चित्रावर केलेले लिखाण प्रकाशित झाले आहे.[६३] सन १९९६ या वर्षी 'रिक्सम्युजियम'ने प्रकाशित केलेल्या त्यांच्या वार्षिक अहवालात Pauline Lunsingh Scheurleer यांनी केवळ 'विटसेन अल्बम'वर संशोधनपर लेख प्रकाशित केला. या लेखात शिवाजी महाराजांच्या पाच चित्रांविषयी तपशिलवार लिखाण त्यांनी केले. त्या पाच चित्रांमध्ये 'रिक्सम्युजियम' येथे असलेल्या दोन्ही चित्रांचा समावेश आहे.[६४] याच संग्रहालयातर्फे २००८ साली प्रकाशित झालेल्या '50×India' या पुस्तकात संपादक 'मालिनी रॉय' यांनी वरील चित्रावर संशोधनात्मक लिखाण केल्याचे दिसून येते.[६५] शिवाजी महाराजांचे हे चित्र 'विटसेन अल्बम'च्या पान क्र. ४६ वर आढळून येते. 'निकोलस विटसेन'

---

६२. *या Frits Lugt यांच्या पुस्तकाची, "Collectors Marks on Prints and drawings सुधारित आवृत्ती २०१० साली प्रकाशित झाली. Lugt हे डच चित्रांचे संग्राहक तसेच अभ्यासक होते.*

६३. *Asian Art*

६४. *Het Witsenalbum. Pp. 167-254.*

६५ *50*India : the 50 most beautiful miniatures from the Rijksmuseum*

(चित्र क्र. ६) याच्या संग्रहातील हे चित्र असून शिवाजी महाराजांसोबतच अनेक महत्त्वाच्या राजकीय व्यक्तींचेही चित्रण आपल्याला पाहवयास मिळते. या अल्बममध्ये तैमुरलंग, बाबर, हुमायून, अकबर, जहांगीर, शाहजहान, औरंगजेब (चित्र क्र. ७), दारा शुकोह, मुरादबक्ष या मुघल राजपरिवारातील महत्त्वाच्या व्यक्तींची चित्रं आहेत. याचबरोबर राजा कर्ण (चित्र क्र. ८)[६६] दिलेर खान, शफशिकनखान यांसारख्या मुघल दरबारातील काही बड्या असामींची चित्रेसुद्धा आपल्याला आढळतात. याचबरोबर कुतूबशाहीमधील सुलतान अबुल हसन, नेक्नाम खान, मुसा खान, अब्दुल जब्बार, मादन्ना व आकन्ना पंडित बंधू (चित्र क्र.९) तसेच विजापूरच्या बहलोल खान, मखदूम सर्जा खान यांसारख्या कित्येक ऐतिहासिक व्यक्तींची चित्रे दिसून येतात. या चित्रांच्या मजकुरावरून आपण सहजपणे चित्राचा काळ निश्चित करू शकतो. चित्रांवर कोरलेला मजकूरसुद्धा अतिशय रोचक आणि महत्त्वाचा आहे. त्यावर एकवार नजर टाकल्यास आपल्याला बऱ्याच गोष्टींचा अंदाज येतो. जसे की, गोवळकोंड्याचा सेनापती म्हणून महंमद इब्राहीम मुघलांच्या विरोधात लढत होता. बहलोल खान विजापूरचा वजीर होता आणि त्याच्या हयातीतच चित्र पूर्ण झाले. सय्यद मखदूम सर्जा खान यास पुन्हा एकदा विजापूरचा मंत्री म्हणून नुकतेच नियुक्त केल्याचा उल्लेख सुद्धा यात नोंदवून ठेवला आहे.[६७] अक्षरांच्या ठेवणीवरून, वळणावरून त्याचा काळ ठरवणे सहज शक्य आहे.

'विटसेन' संग्रहात असलेल्या सर्वच चित्रांवर डच आणि पर्शियन भाषेत मजकूर कोरलेला आहे. त्या दोन्हींचा अभ्यास करून 'Pauline Lunsingh' यांनी सर्वच चित्रांचा काळ 'इसवी सन १६८०च्या मध्यात कधीतरी' ठरवला आहे.[६८] पण तत्कालीन परिस्थितीचा आणि राजकीय बदलांचा अभ्यास करता काही चित्रांचा काळ हा सन १६८०च्या अगोदरचा सुद्धा असण्याची शक्यता आहे. Kruijtzer यांच्या मते, चित्रांचा काळ इसवी सन १६७७च्या आसपास असावा आणि हे सप्रमाण वाटते.[६९] या सर्वच शक्यतांचा अंदाज घेतल्यास, हैद्राबाद येथील स्थानिक चित्रकार

---

६६. *राजा कर्णसोबत शिवाजी महाराजांनी नवीन राजकारण खेळण्याचा प्रयत्न केला होता. परंतु तो प्रयत्न अयशस्वी झाला. औरंगाबाद शहरात असणारा 'कर्णपुरा' आणि तिथे भरणाऱ्या यात्रेचा थेट संबंध राजा कर्णशी आहे. शिवाजी महाराजांनी पत्राद्वारे कर्णास संपर्क साधला, तेव्हा तो औरंगाबादेत ठाणेबद्ध होता.*

६७. *या सर्व घटनांचा काळ इ.स. १६७७ ते १६८० दरम्यानचा आहे.*

६८ *Het Witsenalbum*

६९. *Camping with Mughal emperor; Pomp before disgrace*

आणि डच दूतावासाचे संबंध जवळ जवळ एक दशकभर (म्हणजेच, सन १६७७ ते सन १६८६ पर्यंत) होते, हे आपल्याला समजून येते.

एकूणच 'व्हॅलेंटीन' याच्या पुस्तकात प्रकाशित झालेले चित्र सन १७२६ साली 'मॅथ्यूज बॅलन' याच्यामार्फत 'कॉपर इंग्रेव' या तंत्रज्ञानाच्या सहाय्याने तयार करून घेतले होते. (चित्र क्र. १) पण, ते चित्र ज्या अस्सल प्रतीवरून तयार करण्यात आले, ते मूळ चित्र मात्र हर्बर्ट डी यागर याने रेखाटले होते आणि 'Simon' ला सन १६८४ मध्येच त्या चित्राची प्राप्ती झाली होती. Pauline Lunsigh यांनी त्यांच्या संशोधनात हे सप्रमाण सिद्ध केले आहे. 'रिक्सम्युजियम' च्या १९९६ साली प्रकाशित झालेल्या अहवालात त्यांनी या चित्राचा चित्रकार हा हर्बर्ट डी यागर असल्याची नोंद केली आहे,[७०] पण आज मात्र ते मूळ चित्र त्याच्या अस्तित्वाचे कोणतेही पुरावे देत नाही. व्हॅलेंटीनच्या पुस्तकाची पहिली आवृत्ती इसवी सन १७२६मध्ये प्रकाशित झाली. या पहिल्या आवृत्तीच्या केवळ २५० प्रती छापण्यात आल्या होत्या. कॉपर इंग्रेव तंत्र वापरून या चित्राच्या २५० प्रती पुस्तकासाठी वापरण्यात आल्या, यामुळेच सन १७२६ साली छापण्यात आलेल्या चित्रांचे ऐतिहासिक मोल प्रचंड आहे. तसेच, 'रिक्सम्युजियम' येथे असणाऱ्या एका चित्राचा काळ (चित्र क्र. ४) हा सन १६७७ पर्यंत मागे जातो, असा दावा Kruijtzer ने आपल्या संशोधनाद्वारे केला आहे.[७१] डचांनी शिवाजी महाराजांना प्रत्यक्ष पाहिले होते. त्यात, हर्बर्ट डी यागर हा उत्कृष्ट चित्रकार होता. त्याने स्वतः शिवाजी महाराज आणि त्यांच्या दरबारातील काही महत्त्वाच्या व्यक्तींची चित्रे काढल्याचे लिहून ठेवले आहे. तसेच, Pauline Lunsingh, Kruitzer यांनी डच भाषेच्या वळणावरून, ठेवणीवरून चित्रांची काळनिश्चिती इसवी सन १६७७ ते १६८० च्या दरम्यान सांगितली आहे. नवे पुरावे उजेडात आल्यास अजून संशोधन झाल्यास नवीन माहिती समोर येण्याची शक्यता आहेच. पण, सध्याच्या प्रकाशित संशोधनावरून सदरील चित्राची निर्मिती शिवाजी महाराज हयात असताना गोवळकोंडा येथे त्यांना प्रत्यक्ष पाहून झाली असल्याची खात्री पटते. त्यामुळे, या दोन चित्रांचे, चित्र क्र. १ आणि चित्र क्र. ४ यांचे ऐतिहासिक महत्त्व अधोरेखित होते. तिसऱ्या क्रमांकाचे चित्र हे क्र. ४ या चित्रावरून प्रेरित होऊन रेखाटलेली प्रतिकृती असावी, असे वाटते. निकोलस कॉर्ने

---

७०. *Pomp before disgrace*

७१. *Pomp before disgrace*

लिस विटसेन याचा मृत्यू इसवी सन १७१७ मध्ये झाला. सन १७२८ मध्ये त्याच्या संग्रहात असणाऱ्या आठ लॉट्सचा फार मोठा लिलाव आयोजित केला होता. त्या आठ लॉट्समध्ये असणाऱ्या लघुचित्रांची संख्या जवळपास ४५०च्या आसपास होती. लिलावाच्या वेळी विटसेनच्या संग्रहातील चित्रांचा एक कॅटलॉग तयार करण्यात आला होता ज्याची एक प्रत आज लंडन येथील 'विक्टोरिया अल्बर्ट म्युझियम'मध्ये आपल्याला पाहायला मिळते. Pauline Lunsingh यांच्या मते, सन १७२८ मध्ये विटसेनच्या चित्रांचा लिलाव झाल्यामुळे भारतातील लघुचित्रे जगभरात पसरली. यामुळेच आजही युरोपातल्या प्रमुख चित्रसंग्राहकांकडे अथवा म्युझियममध्ये भारतीय लघुचित्रे मोठ्या प्रमाणात आढळून येतात. शिवाजी महाराजांच्या सर्वच समकालीन चित्रांमध्ये 'रिक्सम्युजियम' येथील चित्रे अतिशय श्रीमंत धाटणीतील असून ती सुंदर कारागिरीचे उदाहरण आहे हे नक्की.

शिवाजी महाराजांच्या या तीन चित्रांवर सविस्तर माहिती आपण पाहिलीच. याचबरोबर इतर संग्रहालयात असणाऱ्या काही अस्सल आणि समकालीन चित्रांवरसुद्धा चर्चा होणे अपेक्षित आहे. यातीलच एक महत्त्वाचे चित्र म्हणजे, 'ब्रिटीश म्युजियम' लंडन येथे असणारे शिवाजी महाराजांचे प्रसिद्ध चित्र (चित्र क्र. १०). या चित्राविषयी सुद्धा बऱ्याच अभ्यासकांनी लिखाण करून ठेवले आहे. यामध्ये प्रामुख्याने नाव घेता येईल प्रा. ग. ह. खरे यांचे. चित्राचे वर्णन करताना प्रा. खरे काय म्हणतात ते पाहणे उचित ठरेल,

'हे चित्र सुद्धा वामावर्ती ऊर्ध्वांगी आहे. डोक्यास दोन तुऱ्यांची पिवळी पगडी असून तिखाली नेहमीप्रमाणे झुलपे व दाढी-मिशा आहेत. कानात मोत्याची बाळी आहे. अंगात सोनेरी समांतर रेषांत पांढऱ्या रंगावर हिरव्या व जांभळ्या पाना-फुलांची नक्षी काढलेला अंगरखा आहे. त्यावर जांभळा दुपट्टा असून कमरेस त्याच रंगाचा शेला गुंडाळलेला आहे. शेल्यामध्ये डाव्या अंगास कट्यार खोचलेली असून डाव्या हातात मेण घातलेला व उभ्या धरलेल्या तलवारीची मूठ आहे. उजव्या हातात पट्ट्याचा खोबळा आहे. अंगकांती गहूवर्ण, तीक्ष्ण नजर असून चेहरा छाप पाडणारा आहे. 'माजी मराठा राजा शिवाजी' असा चित्रावर डच भाषेतील मजकूर आहे. हे चित्र ज्या बस्त्यात आहे त्याच बस्त्यात औरंगजेबाचे चित्र असून त्यावर 'हयात असलेला मोठा मुघल' असा मजकूर आहे. चित्राचा काळ समजत नसला तरीही यावरून चित्र नक्कीच १७०७ पूर्वी केलेले असण्याची शक्यता आहे. व्हॅलेंटीनच्या चित्राशी बरेचसे मिळतेजुळते असल्याने हे चित्र महाराजांच्या हयातीतच काढण्यात आले असावे,

पण महाराजांच्या मृत्यूनंतर डच मनुष्याच्या हाती लागले असल्यामुळे त्याने स्वतः च्या आठवणीसाठी तो मजकूर लिहून ठेवला असावा. १९७४ मध्ये महाराष्ट्राच्या शासकीय मुद्रणालयाने प्रकाशित केलेल्या रोजनिशी व दिनदर्शिका यांत रंगीत पण लहान-मोठ्या आकारात हे चित्र आले आहे.'[७२]

कलायोगी जी. कांबळे यांनी २ मार्च १९७० रोजी शिवरायांचे एक रंगीत चित्र पूर्ण केले.[७३] पुढे हेच चित्र महाराष्ट्र शासनाने अधिकृतरित्या स्वीकारले. तत्पूर्वी ब्रिटिश म्युझियममधील असणाऱ्या चित्राचा सर्रास वापर शासनदरबारी होत असल्याचे प्रा. खरे सांगतात. या चित्रात शिवाजी महाराजांच्या डोक्यावर पागोटे दाखवले असून त्यामध्ये मोत्यांचा लोंबता तुरा खोवलेला दिसून येतो. याही चित्रात शिवाजी महाराजांच्या डोळ्यांच्या बाजूला सुरकुत्या दाखवल्या आहेत. मागील तीनही चित्रांप्रमाणे शिवाजी महाराजांच्या दाढीचे केस विरळ दाखवले आहेत. या चित्रात दाखवलेला अंगरखा अगदी 'रिक्सम्युझियम'मधील चित्रासारखा (चित्र क्र. ४) आहे. त्यावरील पानाफुलांची नक्षी सुद्धा अगदी मिळतीजुळती आहे. या चित्रामध्ये महाराजांच्या गळ्यात केवळ मोत्यांची माळ दाखवली आहे. महाराजांच्या उजव्या हातात पट्ट्याची खोबणी आणि डाव्या हातात तलवारीची मूठ दिसून येते. तलवारीच्या मुठीमध्ये मात्र हिरव्या रंगाची गादी दाखवली आहे. दोन्ही शस्त्रांच्या म्यानाचा रंग नारंगी दाखवला आहे. चित्राच्या डाव्या कोपऱ्यात वरील बाजूस डच भाषेतील मजकूर कोरला असून त्यावर "Sieuwagie gewezen Maratise Vorst' असे लिहिले आहे. चित्राचा आकार १७.३ × ८.२ सेमी एवढा आहे. चित्राचा काळ इसवी सन १६८० ते १६८७ दरम्यानचा सांगण्यात आला असून निर्मितीस्थळ 'गोवळकोंडा' असल्याचे समजते. हे चित्र 'ब्रिटिश म्युझियम'च्या Portraits of Indian Princes या दस्त्यामध्ये आहे. हा दस्ता सन १९७४मध्ये ब्रिटिश लायब्ररीकडून संग्रहालयाने विकत घेतला. हा संपूर्ण सेट सर्वांत पहिल्यांदा 'फ्रान्सिन रॉबिन्सन' यांनी त्यांच्या पुस्तकात एकत्रितरित्या

---

*७२. छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथ. पृ. १३५-१३९.*

*७३. हे चित्र व्हॅलेंटीनच्या पुस्तकात प्रकाशित झालेल्या चित्राची नक्कल आहे.पुढे कलायोगी कांबळे यांच्या चित्राची प्रतिकृती कोल्हापूरचे चित्रकार गोविंद बेंद्रे यांनी तयार केली. मुंबई येथील चित्राच्या केवळ दोनच प्रतिकृती सध्या महाराष्ट्रात अस्तित्वात आहेत. यातील एक रत्नागिरी येथील जिल्हा परिषदेत तर दुसरी उस्मानाबाद शहराच्या 'जनता सहकारी बँक' मध्ये पाहवयास मिळते. हा ठेवा फार दुर्मिळ आणि महत्वाचा आहे*

*७४ . The Mughal Emperors and the Islamic Dynasties of India, Iran and Central Asia.*

प्रकाशित केला.[७४] या सेटमध्ये एकूण २६ लघुचित्रे आहेत, जी 'Hans Sloane' या खासगी संग्राहकाने जमा केली होती.[७५] त्यामध्ये अकबर, जहांगीर, मीर जुमला, शाह शुजा, मुराद बक्ष, विजापूरचा मुहम्मद आदिलशाह, दुसरा अली आदिलशाह यांसारख्या महत्त्वाच्या राजकीय व्यक्तींची चित्रे पाहवयास मिळतात. मादन्ना पंडितचे चित्र (चित्र क्र. ११) आणि 'रिक्सम्युझियम'मधील चित्र (क्र. ९) तंतोतंत मिळते-जुळते आहे. कपड्यांचा रंग तसेच अंगावर परिधान केलेल्या इतर गोष्टी वेगळ्या असल्या तरीही त्याच्या चेहऱ्याची ठेवण अगदीच समान आहे. त्याचबरोबर, या सेटमध्ये असणारे औरंगजेबाचे चित्रसुद्धा महत्त्वाचे असून त्यावर डाव्या कोपऱ्यात डच भाषेत 'औरंगझेब-शाहजहानचा चौथा मुलगा आणि हयात असलेला मोठा मुघल बादशाह' अशी अक्षरे कोरलेली आपल्याला दिसून येतात (चित्र क्र. १२). त्यावरून, हे चित्र शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर जरी काढण्यात आले असले, तरीही चित्राचा निर्मितीकाळ हा औरंगजेबाच्या मृत्यूच्या आधीचा, म्हणजेच इसवी सन १७०७ च्या आधीचा आहे, हे नक्की. त्याचबरोबर, अक्षरांच्या वळणाचा अभ्यास केल्यास सदरील चित्र इसवी सन १६८५-८६च्या आसपास काढले असावे, असा अभ्यासकांचा कयास आहे. अतिशय सुंदर, प्रमाणबद्ध असलेले हे शिवरायांचे चित्र फार प्रसिद्ध आहे.

भारतात शिवाजी महाराज घोड्यावर स्वार असलेल्या पुतळ्यांची संख्या प्रचंड आहे. अश्वारूढ शिवरायांची प्रतिमा आपल्या मनामध्ये एवढ्या भक्कमपणे घर करून बसली आहे, की घोड्याशिवाय शिवाजी महाराजांच्या रूपाची कल्पना करणे आपल्याला सहजासहजी शक्य नाही. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे शिवाजी महाराजांच्या अस्सल समजल्या जाणाऱ्या समकालीन चित्रांपैकी केवळ एकाच चित्रात शिवाजीराजे घोड्यावर बसलेले दाखवले आहेत. बालभारतीने इयत्ता चौथीच्या पुस्तकात सदरील चित्र छापल्यामुळे आज महाराष्ट्रातल्या प्रत्येक घरात शिवाजी महाराजांची ही रुबाबदार प्रतिमा पोहोचली आहे. हे चित्र तयार करून घेणारी व्यक्ती म्हणजे 'निकोलाओ मनूची' होय. मुघल दरबारातील चित्रकार 'मीर महंमद' याच्यामार्फत मनूचीने हे चित्र

---

*७५. डॉ. अजित पटवर्धन यांनी भा. इ. सं. मंडळाच्या पोतदार सभागृहात दि. १४-०२-२०१४ (शुक्रवार) रोजी सादर केलेल्या 'दृक-श्राव्य' व्याख्यानात "Sir Hans Sloane' यांच्याकडे ही चित्रे असल्याचे सांगितले. Hans Sloane या नावाचा युरोपात अठराव्या शतकात एक फार मोठा संग्राहक होऊन गेला. इसवी सन १७५३ साली या संग्राहकाचा मृत्यू झाला, तेव्हा त्याच्या वैयक्तिक संग्रहात असणाऱ्या वस्तूंची संख्या जवळपास 'एकाहत्तर हजार' एवढी होती.*

करून घेतले हे आज सर्वमान्य आहे, पण मागील दहा–बारा वर्षांत काही पुराव्यांची नव्याने पडताळणी करून पाहिल्यामुळे या चित्राचा चित्रकार 'मीर महंमद' नाही, हे काही संशोधकांनी सप्रमाण सिद्ध केले आहे. हे चित्र व्हेनिसला आणि तिथून पुढे फ्रांसला कसे गेले, यामागील कथासुद्धा फार रंजक आहे. त्यामुळे या चित्राच्या निर्मिती इतिहासाची पुनर्मांडणी करणे आवश्यक आहे. आधी या चित्राविषयी (चित्र क्र. १३) प्रा. ग. ह. खरे काय सांगतात ते पाहू,

'शिवाजी महाराज स्वारीवर असताना पांढऱ्याशुभ्र पण रक्तपाद घोड्यावर बसले आहेत. डोक्यावर केशरी रंगाचा आणि मोत्यांचा व केसांचा तुरा असलेले पागोटे आहे. अंगावर पांढऱ्या सोनेरी समांतर रेषा व त्यामध्ये हिरव्या–तांबड्या पत्रफुलांची नक्षी असलेला चिरांचा अंगरखा घातला आहे. अधोभागी सोनेरी उभ्या रेषा असलेली तांबड्या खुतनीची विजार असून पायांत बिनटाचेचा टोकदार जोडा आहे. घोड्याला निरनिराळ्या प्रकारचे दागिने घातले आहेत. महाराजांच्या पाठीशी ढाल अडकवलेली असून कमरेस गुंडाळलेल्या सोनेरी शेल्यात कट्यार खोचलेली आहे. डाव्या हाताने घोड्याचा लगाम खेचलेला असून पाठीमागे रुमाल उडवणारे दोन जण दिसून येतात. पुढे–मागे व उजव्या बाजूस विविध पोशाख केलेले २० सशस्त्र शिपाई आहेत. बहुतेकांच्या हातात मेण घातलेल्या व उभ्या आडव्या धरलेल्या तलवारी असून फक्त एकाच्याच हातात खूप लांब भाला आहे. त्यातील आठ जणांना दाढी असून पाच जणांच्या कानात एक मोत्याची बाळी आहे. अनेकांच्या कपाळास गंधांचा वाटोळा टिळा असून काहींच्या कपाळावर उभे–आडवा गंध असल्याचा भास होतो. यामुळे बहुतेक शिपाई हिंदू पण थोडेसे मुसलमानसुद्धा आहेत, असे वाटते. महाराजांच्या उजव्या अंगास बऱ्याच अंतरावर आणखी सात शिपाई आहेत. या चित्राच्या माथ्यावरच्या मोकळ्या जागेत SEVAGI असे चित्रातील व्यक्तीचे नाव दिले आहे. एकंदत हे चित्र अतिशय मनोहर आहे. इटालियन प्रवासी मनूची याने १७०६ मध्ये व्हेनिसच्या सिनेटला ५६ चित्रांचा जो बस्ता भेट म्हणून दिला होता त्यात हे चित्र आहे. ही सर्व चित्रे औरंगजेबाचा मुलगा शाह आलम याच्या हाताखाली काम करणारा कलावंत मीर महंमद याने मनूचीसाठी १६८६पूर्वी काढली आहेत. तेव्हा, हे चित्र पूर्णपणे समकालीन असल्याचा दाट संभव आहे. हे चित्र सर्वात पहिल्यांदा 'स्टोरिया दो मोगोर' या पुस्तकात विस्तृत माहितीसह प्रकाशित झाले. महाराष्ट्र शासनमुद्रित 'शिवरायांसी आठवावे' आणि 'De Gancinge  Raimands Inde' या ग्रंथात

७६. *छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथ.*

प्रकाशित झालेले चित्र या चित्राची नक्कल आहे.'[७६]

निकोलाओ मनूची (चित्र क्र. १४). भारतात येऊन गेलेल्या काही महत्त्वाच्या परकीय प्रवाशांपैकी एक. मूळचा 'व्हेनिस' येथील रहिवाशी असलेला मनूची अनेक वर्षे औरंगजेबाच्या दरबारात वैद्य म्हणून कार्यरत होता. आपल्या आयुष्यात त्याने जे जे काही पाहिले ते सर्व लिहून ठेवले आहे. त्याचे लिखाण आज अनेक भाषांमध्ये अनुवादित होऊन प्रकाशित झाले आहे. या मनूचीच्या लिखाणातून सतराव्या शतकातील भारत विशेषतः मुघलांच्या साम्राज्यातील कितीतरी अपरिचित माहिती वाचायला मिळते. 'स्टोरिया दी मोगोर' हा त्याचा जगप्रसिद्ध ग्रंथ. मनूची केवळ शिवाजी महाराजांनाच नव्हे तर संभाजी महाराजांनासुद्धा भेटला होता. गव्हर्नर 'कार्डो दी अल्वारो' याने संभाजी महाराजांकडे मनूचीला पोर्तुगीजांचा वकील म्हणून दोन वेळेस धाडले होते. फ्रेंच सेनापती 'मार्टिन' हा त्याचा खास मित्र. मार्टिन 'हर्बर्ट डी यागर' चा सुद्धा अतिशय चांगला मित्र होता. मार्टिनच्या लिखाणातून डी यागरच्या दूतावासाचे सविस्तर वर्णन वाचायला मिळते.[७७] 'स्टोरिया दी मोगोर' ग्रंथाच्या प्रस्तावनेत मनूची त्याच्या लिखाणाचा कसा गैरवापर केला याची हकीकत सांगतो.

या ग्रंथाचे सर्वात पहिले भाषांतर 'इर्विन' याने केले. अनुवाद करत असताना इर्विनने मनूचीच्या ग्रंथाचा इतिहास थोडक्यात दिला आहे. इर्विन म्हणतो,

'मनूचीने त्याचे स्टोरिया दि मोगोर हे पुस्तक दोन भाषांमध्ये लिहिले. त्यातील काही भाग इटालियन तर काही पोर्तुगीज भाषेत आहे. त्याच्या हयातीतच एका जेस्युईट संपादकाने ते हस्तगत केले. 'पेअर फ्रान्सिओ कात्रू' याने ग्रंथाचे संपादन केले. मनूचीच्या परस्पर हा ग्रंथ 'मोगल साम्राज्याचा त्याच्या स्थापनेपासून सामान्य इतिहास, 'व्हेनिसचा रहिवासी मनूची याच्या आठवणींवर आधारीत' या नावाने प्रकाशित झाला. हा ग्रंथ फ्रान्सचा राजा १४वा लुई याच्या नातवाला अर्पण करण्यात आला. या पुस्तकावरून सतराव्या शतकाच्या सुरुवातीस भरपूर राजकारण झाले. कात्रूने सदरील ग्रंथ इसवी सन १७०५ मध्ये पहिल्यांदा प्रकाशित केला. त्याची एक कॉपी भेट म्हणून मनूचीला पाठवली. आपल्या परस्पर हा ग्रंथ दुसऱ्या कुणीतरी प्रकाशित केला, या गोष्टीचा मनूचीला राग आला. इसवी सन १६८६-८७ मध्ये फ्रेंच

---

७७ *Herbert de Jager : A dutch envoy to Shivaji*

*७८. फ्रांसिस मार्टिन. फ्रेंच गव्हर्नर. मनूची आणि मार्टिन यांची आपापसांत फार चांगली मैत्री होती. मनूची जेव्हा मुघलांचा डेरा सोडून पळाला, तेव्हा दक्षिणेत उतरण्यासाठी मार्टिननेच त्याला मदत केली. सुरत, दीव-दमण, गोवा, हैद्राबाद आणि मद्रास असा प्रवास करत शेवटी मनूची मद्रासला स्थायिक झाला. तिथेच*

गव्हर्नर मार्टिनच्या[७८] सहाय्याने मनूचीने आपल्या हस्तलिखिताचा काही भाग त्याच्या मूळ गावी, व्हेनिसला रवाना करण्याची व्यवस्था केली. भारतात, विशेषतः दख्खनेत माजलेल्या अनागोंदीमुळे आणि सततच्या युद्धजन्य परिस्थितीमुळे आपल्या जवळ असणाऱ्या अमूल्य गोष्टींची नासधूस होऊ नये, म्हणून मनूचीने हा निर्णय घेतला, परंतु वीसएक वर्षानंतर त्याच्या हातामध्ये त्यानेच लिहिलेल्या हस्तलिखितांचा वापर करून संपादित केलेला ग्रंथ पडला. या गोष्टीची मनूचीला प्रचंड चीड आली. त्याने कात्रूला जेव्हा याचा जाब विचारला तेव्हा, 'मला हे हस्तलिखित पॉन्डिचेरीच्या 'देलांदे' नावाच्या अधिकाऱ्याकडून प्राप्त झाले. हे हस्तलिखित १७०१ मध्येच युरोपात पोहोचले होते.' असे उत्तर मिळाले. विशेष म्हणजे, हीच कथा इसवी सन १७०५ साली छापलेल्या प्रथम आवृत्तीत त्याने नमूद केली होती.[७९] आपल्या हस्तलिखिताचा गैरवापर झाल्याचे मनूचीच्या लक्षात आले. त्याने तत्काळ आपल्या ग्रंथाचा भाग १, भाग २, भाग ३ आणि चौथ्या भागाची काही पाने युरोपात पाठवण्याचे ठरवले आणि सन १७०६ साली त्याची हस्तलिखिते युरोपात जाऊन पोहोचली. सोबतच, व्हेनिसच्या राज्यसभेत (सिनेट) लॅटिन भाषेत पत्र लिहून आपल्यावर कशाप्रकारे अन्याय झाला आहे, याची माहिती दिली. आपल्याजवळ असणारे हस्तलिखित 'एफ. युसेबिअस' नावाच्या एका फादरकडे सोपवले. त्या फादरने सगळ्या गोष्टी पॅरिसमध्ये असणाऱ्या व्हेनिसच्या राजदूताकडे, म्हणजेच टीएपोलोकडे पाठवले. अशाप्रकारे मनूचीचे हस्तलिखित फ्रान्समध्ये जाऊन पोहोचले. परंतु कात्रूने लिहिलेल्या ग्रंथाची प्रसिद्धी आणि वितरण एवढ्या मोठ्या प्रमाणात झाले होते, की अभ्यासक आणि संशोधकांनी कात्रूलिखित ग्रंथाचाच आधार घेतला.'[८०]

मनूचीचे एक हस्तलिखित सन १७६४ साली लिलावात निघाले होते. Mirmat नावाच्या डच संग्राहकाने ते विकत घेतले. तेच हस्तलिखित पुढे सन १८२४ मध्ये सर 'थॉमस फिलीप' या इंग्रज अधिकाऱ्याने विकत घेतले. फिलिपच्या वारसाकडून सन १८८७ मध्ये बर्लिनच्या ग्रंथालयाने ते खरेदी केले आणि बर्लिन येथे असणाऱ्या याच प्रतीचा वापर करून इर्विनने सन १९०९ साली त्याचे इंग्लिशमध्ये भाषांतर केले. या

---

*एका विधवेशी, मिसेस क्लार्कशी लग्न करण्याचा सल्ला सुद्धा त्याला मार्टिननेच दिला होता. मार्टिनच्या इच्छेखातर मनूचीने आपला ग्रंथ पूर्ण करून प्रकाशित करण्याचा निर्णय घेतला होता.*

*७९. परंतु पुढे दहा वर्षांनी, सन १७१५ साली छापलेल्या या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृतीत मात्र कात्रू लिहितो, की त्याला हे हस्तलिखित मनूचीकडूनच मिळाले होते. अर्थात, दोन्ही आवृत्तींत त्याने सांगितलेल्या गोष्टी ह्या पूर्णपणे विसंगत आणि खोट्या आहेत हे निश्चित.*

*८०. रॉबर्ट ऑर्मने सुद्धा historical fragments हे पुस्तक लिहिताना कात्रूच्याच ग्रंथाचा आधार घेतला.*

कामी व्हेनिस येथे असणाऱ्या प्रतीचाही वापर करायला इर्विन विसरला नाही. यातूनच समोर आला तो वैभवशाली खजिना. मनूचीच्या हस्तलिखिताचा वापर करून कात्रूने ग्रंथसंपादन केले होते, त्या बंचमध्ये एकाही चित्राचा समावेश नव्हता. सर्व चित्रे मनूचीच्या ताब्यात असावीत अथवा त्याने इसवी सन १६८६ साली चित्रे पाठवली नसावीत. पुढे, सन १७०६ साली आपल्या ग्रंथाचे चार भाग पाठवताना मनूचीने चित्रांचा दस्तासुद्धा व्हेनिसला पाठवला, त्यामुळे भलेही मनूचीच्या ग्रंथाच्या आणि हस्तलिखितांच्या प्रती सन १७०५ पासून बाजारात फिरत असल्या, तरीही मनूचीने काढून घेतलेली/तयार केलेली जगप्रसिद्ध चित्रे प्रकाशित होण्यासाठी जवळजवळ दोनशे वर्षांचा कालावधी लागला. इर्विन जेव्हा दोन्ही प्रतींचा तौलनिकदृष्ट्या अभ्यास करत होता, तेव्हा मनूचीने काढलेला चित्रांचा दस्ता त्याच्या हातास लागला. त्यापैकी काही मोजकी चित्रे त्याने आपल्या ग्रंथाच्या अखेरच्या पानावर कृष्णधवल रंगात छापली.[८१] मनूचीच्या संग्रहात असलेले शिवाजी महाराजांचे चित्र सर्वप्रथम प्रकाशित झाले, ते याच ग्रंथात. ही चित्रे सर्वार्थाने वेगळी आहेत. अतिशय श्रीमंत आणि कलात्मक. मनूचीने प्रकाशित केलेल्या प्रतीमध्ये त्याची सर्व चित्र भारताबाहेर कशी गेली, याविषयी भाष्य केले आहे. मनूचीने नेमके काय लिहिले आहे, हे त्याच्याच शब्दांत पाहू या.

'मोगलांचे साम्राज्य सोडण्यापूर्वी (इसवी सन १६८८ पूर्वी) कुतूहल म्हणून मी पुढील माणसांची चित्रे काढवून घेतली. तैमूरलंग ते औरंगजेबपर्यंत होऊन गेलेले मुगल बादशाह, औरंगजेबाचे पुत्र आणि नातू, विजापूर-गोवळकोंडा येथील राजे, काही प्रमुख हिंदू राजे व इतर प्रसिद्ध सेनापतींचा यात समावेश होतो. चित्रकार मीर महंमद हा शाह आलमच्या पदरी काम करत होता. तो माझा मित्र होता. राजवाड्यात असलेल्या मूळ चित्रावरून मी ही चित्रे काढवून घेतली. माझ्या माहितीप्रमाणे, आजवर कुणीही अशी चित्रे काढून जाहीर केलेली नाहीत. कुणी असे केले असेलच, तर त्याच्या चित्रांची माझ्या चित्रसंग्रहाशी तुलना होऊच शकत नाही. माझ्याजवळची चित्रे विश्वासार्ह आहेत. इतरांजवळची चित्रे तशी असू शकणार नाहीत. ही चित्रे काढून घेण्यासाठी मी लागेल तितका खर्च करण्यात आणि महागड्या भेटी देण्यात कोणतीही कसूर केलेली नाही. हे सर्व काम मला प्रचंड अडचणींमधून करावे लागले. कारण, या प्रतिकृती तयार करताना अत्यंत गुप्तता पाळावी लागत असे. राण्यांची चित्रे मात्र

८१. *Storia do Mogor or Mogul India*

मी दिलेली नाहीत. कारण त्या नेहमीच पडद्यात असल्याने त्यांना पाहणे अशक्य होते. अशी चित्रे जर कुणी काढली असतील तर ती विश्वासार्ह समजू नयेत. ती दासी व नर्तकींची असू शकतात. ज्या चित्रावर वलय आणि छत्र आहे, ती राजघराण्याची आहेत असे समजावे.'[८२]

यावरून आपल्याला मनूचीच्या चित्रांचे ऐतिहासिक महत्त्व सहज स्पष्ट होते. मनूचीला आपल्या चित्रसंग्रहाचा विशेष अभिमान वाटत असे. त्याने काढलेल्या चित्रांव्यतिरिक्त काही बनावट चित्रांचाही बाजारात सुळसुळाट झालेला होता, याची मनूची आपल्याला पुसटशी कल्पना देऊन जातो. सतराव्या शतकात सुद्धा दुसऱ्याचे लिखाण चोरून, त्याला कोणतेही श्रेय न देता ते लिखाण परस्पर स्वतःच्या नावाने खपवण्याचे प्रकार सर्रास होत असल्याचे यावरून समजते.

'स्टोरिया दी मोगोर' अनेकार्थांनी महत्त्वाचा आहे. या ग्रंथातून जी माहिती मिळते, ती खरेतर दुर्मिळ समजली पाहिजे. निकोलाओ मनूचीने छत्रपती शिवाजी महाराजांची प्रत्यक्षात भेट घेतली आणि त्याची सविस्तर हकीकत या ग्रंथात दिली. त्याचा एकवार आढावा घेणे इथे आवश्यक वाटते. मनूची लिहितो,

'जयसिंगसोबतच्या प्रवासात मी (मनूची) इकडील लोकांसारखा पोशाख करीत असे. मुसलमान लोक आपल्या झग्याचे बंद उजवीकडे बांधतात तर हिंदू डावीकडे बांधतात. मुसलमान दाढी ठेवतात. रजपूत दाढी ठेवत नाहीत. मी रजपुतांच्या पद्धतीने फक्त मिशा ठेवत असे. रजपूत कानात मोती घालतात, तसे मी करत नसे. माझा धड ना राजपूती, ना मुसलमानी वेष पाहून राजपूत अधिकाऱ्यांना आश्चर्य वाटे. माझा धर्म कोणता, असे ते मला विचारीत. मी ख्रिस्ती आहे, असे म्हटल्यावर मग मुसलमान ख्रिस्ती, की हिंदू ख्रिस्ती? असे ते विचारीत. हिंदू आणि मुसलमान धर्मांशिवाय इतर धर्मांना ते मानीत नाहीत.'[८३]

मिर्झाराजे जयसिंग ही मुघल दरबारातील एक बडी असामी. छत्रपती शिवरायांच्या स्वराज्याचे अस्तित्वच नष्ट करण्यासाठी मिर्झाराजेला औरंगजेबाने दक्षिणेत पाठवले होते. दिलेरखानास हाताशी धरून, प्रचंड मोठी फौज घेऊन मिर्झा राजा महाराष्ट्रावर चालून आला. या संपूर्ण घटनाक्रमाचा इतिहास 'पुरंदरचा तह-मिर्झाराजांचे स्वराज्यावरील आक्रमण' या नावाने ओळखतो. या मोहिमेत निकोलाओ मनूची मिर्झाराजेसोबत

---

८२. असे होते मोगल, प्रस्तावना

८३. *कित्ता, पृ. १७४*

दख्खनेत उतरला. त्याच्या एकूणच राहणीमानाचे सर्वसामान्य भारतीयांना आकर्षण होते. त्यालाही भारतातील हिंदू आणि मुसलमान लोकांच्या चालीरीती समजून घेण्याची प्रचंड उत्सुकता होती. यातूनच मनूची सांगतो, 'भारतातील हिंदू सैनिक आपल्या झग्याचे बंद डावीकडे बांधत असत तर मुसलमान लोक उजवीकडे.' हे विस्मयजनक निरीक्षण करणाऱ्या मनूचीची नजर किती बारीक आणि बेरकी असेल, याचा आपण अंदाज बांधू शकतो. पुरंदर किल्ल्याच्या पायथ्याशी शिवाजी महाराज आणि मिर्झा राजेंमध्ये सुप्रसिद्ध 'पुरंदरचा तह' झाला. याच मुक्कामात मनूची शिवाजी महाराजांना प्रत्यक्ष भेटला. त्यांच्या भेटीचे वर्णन करताना मनूचीने लिहिले आहे,

'माझ्यावर सोपवलेल्या कामगिरीवरून मी (मनूची) परतलो. नंतर थोड्याच दिवसांनी शिवाजी शरण येऊन आमच्या छावणीत दाखल झाला. जयसिंगच्या इच्छेप्रमाणे मी त्याच्याशी रात्री गप्पा मारण्याकरिता आणि गंजिफा खेळण्याकरिता जात असे. एके रात्री मी, जयसिंग आणि त्याचा ब्राम्हण कारभारी खेळत असताना शिवाजी तंबूत आला, त्याबरोबर आम्ही सर्वजण उठून उभे राहिलो. एक अपरिचित आणि कधीही न पाहिलेला असा सुदृढ बांध्याचा तरूण, अशा दृष्टीने मजकडे पाहिल्यावर 'मी कोणत्या देशाचा राजा आहे', अशी जयसिंगकडे पृच्छा केली. मी एक फिरंगी राजा आहे, असे जयसिंगने उत्तर दिले. हे ऐकून त्याला फार नवल वाटले. शिवाजी म्हणाला, 'अनेक फिरंगी माझ्या नोकरीत आहेत, परंतु त्यांचा असा रुबाब नसतो.' शिवाजीला मी युरोपियन राजांविषयी माहिती करून दिली. शिवाजीची समजूत अशी, की युरोपमध्ये पोर्तुगालच्या राजाच्या बरोबरचा मोठा राजा कुणी नसावा. मी आमच्या धर्माविषयीही त्याला बोललो.'[८४]

शिवाजी महाराजांचा मनूचीसोबत झालेला हा संवाद विलक्षण प्रभावी आहे. शिवाजी महाराजांची नवीन गोष्टींची माहिती मिळवण्याची प्रखर इच्छाशक्ती आपल्याला जाणवते. एवढेच नव्हे, तर मनूचीसोबत बोलताना शिवाजी महाराजांनी त्याच्या देशाविषयी, त्याच्या धर्माविषयी संपूर्ण माहिती घेतली. युरोपातल्या इतर राजांची माहिती मनूचीमार्फत शिवाजी महाराजांना मिळाली. जगात काय चालले आहे, हे जाणून घेण्यासाठी शिवाजी महाराज सदैव उत्साही असत. 'फिरंग्यांच्या सर्वच राजांमध्ये पोर्तुगीज राजा श्रेष्ठ आहे', या वाक्यावरूनच शिवरायांना तत्कालीन काळात घडणाऱ्या सर्व चालू घडामोडींचे ज्ञान होते हे स्पष्ट होते. मनूचीमुळे शिवाजी

---

८४. कित्ता, पृ. १८१

महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाची अपरिचित बाजू उजेडात आली, हे नक्की.

आता मनूचीच्या संग्रहात असलेल्या चित्राकडे वळूयात. या चित्रात (चित्र क्र. १३) शिवाजी महाराजांची स्वारी निघालेली असून, शिवाजी महाराज घोड्यावर आरूढ आहेत. घोड्याचा रंग पांढरा असून तो 'रक्तपाद' आहे. घोड्याला भरपूर सजवले आहे. या चित्रामध्येसुद्धा सोन्याचा मुक्तहस्ते वापर केलेला आहे. शिवाजी महाराजांच्या डोक्यावरील जिरेटोप इतर चित्रांमध्ये दाखवतात अगदी तसाच आहे. त्यावर मोत्यांचा एक लोंबता तुरा उठून दिसतो. य चित्रात शिवाजी महाराजांच्या गळ्यामध्ये मोत्यांची एकपदरी माळ असून एक हिरेमाणकांनी जडवलेले वैशिष्ट्यपूर्ण पदक सुद्धा दिसून येते. शिवाजी महाराजांच्या अंगातील अंगरखा आपण पूर्णपणे पाहू शकतो. हा अंगरखा ब्रिटिश म्युझियम आणि 'रिक्सम्युझियम'मधील चित्रांमध्ये (चित्र क्र. ४ आणि चित्र क्र. १०) दाखवलेल्या अंगरख्याशी अगदीच मिळताजुळता आहे. शिवाजी महाराजांनी आपल्या पाठीवर ढाल अडकवलेली असून उजव्या हातात सोन्याचे पाणी लावलेला रत्नजडित मूठीचा दांडपट्टा आहे. दांडपट्ट्याची संपूर्ण म्यान आणि त्यावरील नक्षी ठळकपणे आढळून येणारे हे एकमेव चित्र. शिवाजी महाराजांनी डाव्या हाताने घोड्याचा लगाम धरला आहे. याही चित्रामध्ये शिवाजी महाराजांची दाढी विरळ असल्याचे दिसून येते. शिवाजी महाराजांचे खोगीरसुद्धा रत्नजडित आहे. पिवळ्या रंगाच्या विजारीवर लाल रंगाच्या पट्ट्यांची नक्षी आहे. पायातील लाल रंगाच्या मोजडीवर मात्र सोन्याचे काम केलेले आहे. शिवाजी महाराजांच्या आजूबाजूला जवळपास ३० सैनिक दाखवले असून, काहींच्या हातामध्ये फार महत्त्वाच्या वस्तू दिसून येतात. जसे की, शिवाजी महाराजांच्या घोड्याच्या समोर चालणाऱ्या, पांढरा पोशाख घातलेल्या एका व्यक्तीच्या हातात महाराजांची वैयक्तिक वापरातील तलवार दिसून येते. ही तलवार अतिशय सुंदर, नक्षीदार कापडाने झाकलेली असून सेवकाने ती अदबीने हातात धरली आहे.[८५] तलवारीच्या मुठीवर संपूर्णपणे महागड्या रत्नांचे काम केलेले आहे. या सेवकाच्या बाजूस असणाऱ्या दुसऱ्या सेवकाने हातात Betel box म्हणजेच पानसुपारीचे तबक धरले आहे. हर्बर्ट डी यागर जेव्हा शिवाजी महाराजांना भेटला होता, तेव्हा त्याने अगदी अशाच प्रकारचे पात्र पाहिले होते. याविषयी डी यागरच्या कागदपत्रांत आलेले सविस्तर वर्णन आपण वर पाहिलेच आहे. हे पात्र पूर्णपणे सोन्याचे असून त्यावर अतिशय महागडी रत्ने लावली आहेत. शिवाजी

---

*८५. सदर तलवारीविषयी इतिहास संशोधक इंद्रजीत सावंत सर यांनी त्यांच्या 'शोध भवानी तलवारीचा' या पुस्तकात सविस्तर चर्चा केलेली आहे.*

महाराजांच्या बाजूने असलेल्या मराठा सैनिकांनी हातात तलवार, दांडपट्टा, भाला यांसारखी हत्यारे धारण केलेली आहेत. डाव्या हातात ढाल पकडली आहे. ढालीच्या आतील बाजूस असणारी गादी व ढाल पकडण्यासाठी केलेली व्यवस्था स्पष्टपणे आपल्याला पाहावयास मिळते. अत्यंत श्रीमंत पद्धतीने निघालेली शिवाजी महाराजांची स्वारी आपल्याला विस्मयचकित करते, हे मात्र नक्की.

शिवाजी महाराजांचे हे चित्र आज फ्रांस येथील Bibliotheque Nationale de France म्हणजेच फ्रान्सच्या राष्ट्रीय ग्रंथालयात 'मनूची कलेक्शन'मध्ये आहे. या चित्राचा आकार ३६.४×१६.१ सेमी एवढा मोठा आहे. हे चित्र 'Histoire de l'Inde depuis Tamerlank jusqua Orangzeb' या ग्रंथात प्रकाशित झालेले असून शिवाजी महाराजांच्या चित्रासोबत मुघल दरबारातील अनेक महत्त्वाच्या व्यक्तींची एकूण ५६ चित्रे आपल्याला पाहायला मिळतात. यामध्ये औरंगजेबाने दारा शुकोहचा वध केल्यानंतर त्याच्या मृत्यूची खात्री पटवण्यासाठी सेवकामार्फत मुंडके छाटून मागवले होते. मध्ययुगीन कालखंडात घडून गेलेल्या काही महत्त्वाच्या ऐतिहासिक घटनांपैकी शाहजहानच्या मुलांमध्ये झालेले 'वारसायुद्ध' इतिहासाला कलाटणी देणारे ठरले. समूगढच्या लढाईत दारा शुकोहचा दारुण पराभव झाला आणि सगळेच फासे पालटले. आपल्या सर्व भावांचा निकाल लावून औरंगजेब मुघल राजसत्तेचा सत्ताधीश बनला. दाराला बोलनखिंडीजवळ अटक करण्यात आली. २९ ऑगस्ट १६५९ रोजी त्याला दिल्लीत आणण्यात आले. एका चिखलाने माखलेल्या घाणेरड्या हत्तिणीच्या पाठीवर अत्यंत साध्या हौद्यात दाराला बसवले. त्याचे पाय साखळदंडांनी बांधलेले होते आणि त्याच्या पाठीमागेच नंगी तलवार घेऊन गुलाम नजर बेग बसला होता. मळक्या कपड्यांत, डोक्यावर केवळ एक फडके गुंडाळलेल्या दाराची साऱ्या दिल्लीतून धिंड काढण्यात आली. आपले मरण त्याला निश्चित दिसत होते. एवढ्या बिकट काळातसुद्धा दाराने आपल्या लहान भावाला, औरंगजेबाला एक बोलके पत्र लिहिले. पत्रात दारा म्हणतो,

'मला राज्यप्राप्तीची अपेक्षा राहिली नाही. तू मला मारून माझ्यावर अन्यायच करतो आहेस. मला राहायला एक छोटसं घर दे, सेवेला एक दासी दे, बस. अजून काही नको. आयुष्यभर तुझ्या चांगल्यासाठी मी प्रार्थना करीन.'

पण औरंगजेबाने दाराला मारण्याचा हुकूम दिला. ३० ऑगस्टच्या रात्री गुलाम नजर बेग आणि काही मारेकरी दाराच्या कोठडीत शिरले. त्याच्या मुलाला, सिपाहार शुकोहला दारापासून लांब नेण्यात आले. दाराचे मुंडके धडावेगळे झाले. औरंगजेबाने

एका भाल्याच्या टोकावर ते मुंडके लावून साऱ्या शहरभर फिरवण्याची आज्ञा दिली. ज्याला मारले तो खरंच आपला भाऊ होता, की कुणी तिर्हाईत व्यक्ती, याची खात्री करून घेण्यासाठी औरंगजेबाने दाराचे मुंडके एका तबकात घालून दरबारात आणण्याचे आदेश दिले. या भावंडांनी कित्येक वर्षे एकमेकांना पाहिले नव्हते. ज्याला मारले तो दाराच आहे, याची खात्री करून घेण्यासाठी औरंगजेबाने दाराचा 'किमांश' मागवून घेतला. समूगढच्या लढाईत तो किमांश औरंगजेबाला मिळाला होता. यातून औरंगजेबाचा प्रचंड धूर्त, सावध आणि संशयी स्वभाव आपल्याला दिसून येतो. औरंगजेबाच्या आज्ञेवरून, कोणत्याही अंतिम विधींची पूर्तता न करता दाराचे 'मुंडके नसलेले शरीर' हुमायूनच्या कबरीजवळ दफन करण्यात आले.

दाराला पकडून देणाऱ्या जमीनदाराचे नाव होते जीवन मलिक. बोलनखिंडीजवळच्या 'दादार' गावचा तो जमीनदार. शाहजहानच्या काळात या जीवन मलिकने प्रचंड मोठा अपराध केला होता. त्यामुळे शाहजहानने त्यास हत्तीच्या पायाखाली चिरडून मारण्याची शिक्षा सुनावली होती, पण दाराच्या मध्यस्तीमुळे जीवन मलिकचे प्राण वाचले. पुढे चालून हा मलिक संपत्तीच्या मोहापाई आपल्यासोबत दगा करेल, याची दाराला सुतराम कल्पना नव्हती. या विश्वासघाताचे बक्षीस म्हणून औरंगजेबाने जीवन मलिकला 'बख्तियारखान' ही पदवी बहाल केली. दाराला या मलिकने पकडून दिल्यामुळे दिल्लीच्या नागरिकांमध्ये प्रचंड राग धुमसत होता. एके दिवशी आपल्या काही सैनिकांसह मलिक दरबारात निघाला असता अचानक दंगल उसळली. दिल्लीतल्या जनतेने मलिकसोबत असलेल्या सर्व सैनिकांना मारून टाकले. जीवन मलिक कसाबसा बचावला, पण आपल्या कृत्याचे कोणतेही पुरावे अस्तित्वात ठेवायचे नाहीत याची पुरेपूर काळजी औरंगजेबाने घेतली. एके दिवशी नजरबेग दरबारात आला असता बक्षिसीचे कारण सांगून त्याने जीवन मलिकसोबत भांडण काढले. ते भांडण एवढे टोकाला गेले, की नजर बेगने मलिकवर तलवारीचा वार करून त्याला संपवले. या गुन्ह्याची शिक्षा म्हणून सैनिकांनी नजर बेगची जागेवरच खांडोळी केली. अशा रीतीने औरंगजेबाने आपल्याविरुद्ध उलटू पाहणाऱ्या सर्व पुराव्यांची परस्परच विल्हेवाट लावली.

दारा शुकोहच्या या विदारक, दुर्दैवी प्रसंगाचे केलेले चित्रण आपल्याला पाहता येते (चित्र क्र. १५). या अल्बमच्या सुरुवातीला मनूचीची दोन चित्रं दिलेली आहेत. यातील एका चित्रामध्ये मनूची समोर उभ्या असलेल्या माणसाची नाडी तपासत आहे, असे चित्रण केले आहे. मनूची वैद्य होता. त्याचे भारतीय पोषाखातील असे चित्र




चित्र क्र. २८ अ

विशेष मानावे लागेल. इसवी सन १७९७ मध्ये फ्रेंचांनी इटलीवर स्वारी केली. तेव्हा अतिशय मौल्यवान गोष्टींची फ्रेंच सैनिकांकडून लूट करण्यात आली. व्हेनिस शहरात असलेला मनूचीचा संपूर्ण चित्रसंग्रह फ्रेंचांनी लुटला. हा महत्त्वाचा ऐवज ते फ्रान्सला घेऊन गेले. त्यामुळे मनूचीचा हा संपूर्ण चित्रसंग्रह पॅरिस येथील संग्रहालयात तसेच फ्रान्सच्या राष्ट्रीय ग्रंथालयात आपल्याला पाहावयास मिळतो.

या चित्राशी निगडित सर्वांत महत्त्वाची गोष्ट, हे चित्र कुणी काढले आणि कधी काढले? आजवर सर्वच अभ्यासकांनी शिवाजी महाराजांच्या चित्राचा चित्रकार 'मीर महंमद' असल्याचे सांगितले आहे. एवढेच कशाला, खुद्द मनूचीही आपल्या पुस्तकात लिहिलेल्या प्रस्तावनेत सर्व चित्रे मीर महंमद या चित्रकाराकडून काढवून घेतली, असे सांगतो, तरीही अशी शंका घेण्याचे कारण काय? यासाठी आपल्याला परत एकदा जावे लागते डच वखारीत. पण यावेळेस तिथे वखारप्रमुख म्हणून 'हर्बर्ट डी यागर' नाही, तर एक अशी व्यक्ती आहे, जी अत्यंत दुर्मिळ माहितीचा खजिना आपल्यासमोर रिता करते. तिचे नाव 'जोहान्स बचेरुस'. या बचेरूसची हकीकत आपण पाहूया. त्याचा आणि मनूचीच्या चित्राचा संबंध कसा काय आला, यामागील कथा फार मनोरंजक आहे.

'ट्रोपेन' संग्रहालय येथे एक भारतीय शैलीत काढलेले भलेमोठे चित्र आहे. २४०×१३०सेमी एवढ्या आकाराच्या कापडावर तीन-चार चित्रांचा समूह रेखाटण्यात आला आहे. त्यातील एक चित्र जरासे लहान असून ते अबुल हसन कुतूबशाहचे आहे. कुतूबशाह घोड्यावर स्वार असून त्याने धनुष्यबाण धारण केलेले आहे. त्याचे काही सेवक आजूबाजूला दिसतात. यावर अजून दोन मोठी चित्रे आहेत. विशेष म्हणजे ही दोन्ही चित्रे एकाच व्यक्तीची आहेत आणि ती म्हणजे डच राजदूत 'Johannes Bacherus.' इसवी सन १६८८-९० या काळात हा राजदूत औरंगजेबाच्या दरबारात गेला होता. याच काळात मनूचीसाठी ५९ चित्रांचा सेट तयार करण्यात आला.[८६] १६८५ मध्ये मनूचीने राजपुत्र शाहआलम याच्या मर्जीविरोधात मुघलांचा तळ सोडण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर मनूचीला मीर महंमदच्या कडक नजरकैदेत ठेवण्यात आले. मीर महंमद हा शाहआलमचा एक सरदार होता. त्याचवर्षी मनूची कसाबसा हैद्राबादला पळून जाण्यास यशस्वी झाला. तिकडे गेल्यावर मनूचीने कुतूबशाहच्या पुतण्याचा योग्य सांभाळ केला. जवळजवळ दीड वर्ष तो गोवळकोंडा येथे राहिला.

८६. *Decani paintings; Deccani painting styles*

इसवी सन १६८६ मध्ये मद्रासला जाण्याआधी त्याची VOCचा राजदूत Laurens Pit सोबत भेट झाली.[८७] त्याची मदत घेऊन मनूचीने काही चित्रे तयार करवून घेतली. ती चित्रे मनूचीने 'History of Mughal reign From Taimurlang to Aurangzeb' या पुस्तकात छापली. मोगल बादशाह, त्यांचे नातेवाईक, काही महत्त्वाच्या व्यक्ती, सरदार आणि मराठा राजा शिवाजी या सर्वांच्या चित्रांचा यामध्ये समावेश आहे. ही चित्रे अतिशय सुंदर, नाजुक आणि जिवंतपणे रेखाटलेली आहेत. ही चित्र बनवण्याची एक विशिष्ट पद्धत होती. चित्रातील मुख्य व्यक्तिरेखा चित्राच्या मध्यभागी असे. इतर व्यक्तीरेखांपेक्षा त्याला मोठे दाखवण्यात येई. मुख्य व्यक्ती अनेक सैनिक, सेवक आणि अंगरक्षकांनी वेढलेली दाखवण्यात येई. ह्याच पठडीतील चित्रे सर्रास आढळून येतात. ती व्यक्ती सिंहासन, पालखी, घोडा किंवा हत्तीवर दाखवण्यात येई. जेव्हा व्यक्ती घोड्यावर स्वार असेल तेव्हा त्या व्यक्तीने तलवार, भाला, धनुष्यबाण इत्यादी आयुधे घेतलेली आढळून येत. मनूचीने लिहून ठेवले आहे, की 'फार मोठ्या कष्टाने. लाच देऊन आणि जीवावर उदार होऊन ही लघुचित्रे तयार करून घेण्यात आली.' या कामी त्याला मीर महंमदची फार मदत झाली. यासाठी त्याला ही गोष्ट गुप्त ठेवण्यासाठी शपथसुद्धा घ्यावी लागली. मनूचीने काढलेली सर्व चित्रे आग्र्यातील जहांगीर महालात असलेल्या मूळ चित्राच्या प्रतिकृती आहेत. त्या काढून घेण्यात आल्यापासून जवळजवळ दोनशे वर्षं अंधारात होत्या. जनमानसांत प्रकाशित होण्यास या चित्रांनी फार काळ वाट पाहिली. इसवी सन १९०७ मध्ये इर्विनने सर्वप्रथम मनूचीच्या ग्रंथाचे चार भागात इंग्लिशमध्ये भाषांतर केले. या ग्रंथात काही मोजकी चित्रे कृष्णधवल रंगात छापण्यात आली. हे करत असताना इर्विनकडून एक छोटीशी गडबड झाली. मीर महंमदकडून चित्रे काढून घेण्यासाठी मनूचीने लाच दिली होती, परंतु इर्विनने भाषांतर करत असताना मीर महंमदला चित्रकार समजले. मीर महंमदची मदत घेऊन मनूचीने ही चित्रे काढली, म्हणजे मीर महंमद हाच या चित्रांचा चित्रकार होय, असा कयास इर्विनने लावला. मागील शंभर वर्षांपेक्षा जास्त काळ हाच गैरसमज लोकांमध्ये रुजला होता.[८८] मध्ययुगीन काळात काढण्यात आलेल्या भारतीय लघुचित्रांवर अभ्यास करणाऱ्या Pauline Lunsingh Scheurleer यांनी मनूचीचे मूळ हस्तलिखित परत एकदा तपासले. त्यातील मजकूर आणि इर्विनने प्रकाशित/भाषांतरित केलेला मजकूर पडताळून पाहिला. मूळ वाक्य आणि अनुवादित केलेल्या घटनेमध्ये झालेली गडबड

---

*८७. Storia do Mogor or Mogul India, intro & 2:295-6.*

*८८. Camping with the Mughal emperor. Pp. 48-60.*

त्यांच्या लक्षात आली. सन १९९६ मध्ये रिक्स संग्रहालयाच्या वार्षिक मासिकात त्यांनी एक लेख लिहून ही गोष्ट सविस्तरपणे मांडली. मात्र, त्या शोधनिबंधाकडे कुणाचेही लक्ष गेले नाही.[८९]

निकोलस विटसेन, मनूचीसारखे जगभरात अनेक लोक अशा प्रकारचा चित्रांचा संग्रह करत असत. आजही सर्वांत जास्त लघुचित्रे डच संग्रहात आढळून येतात. यासाठी निकोलस विटसेन कारणीभूत असल्याचे आपण पाहिलेच आहे ॲमस्टरडॅम हे शहर त्याकाळी दुर्मिळ गोष्टींसाठीचे सर्वात मोठे मार्केट होते. हैदराबादमध्ये डच वखारीचे मुख्यालय होते. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात दख्खनेत प्रचंड प्रमाणात राजकीय उलाढाल सुरु होती. निकोलसने नेमलेले काही संग्राहक हैदराबाद भागात होतेच. मनूचीसुद्धा याच धामधुमीत दख्खनेत पोहचला. त्यामुळेच सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात काढण्यात आलेल्या जास्तीत जास्त चित्रांवर डच मजकूर कोरलेला आढळून येतो. ही सर्व चित्रे फार श्रीमंत पद्धतीने रेखाटण्यात आलेली होती. कित्येक चित्रांवर सोन्याचाही वापर करण्यात आला. युरोपात राजेरजवाड्यांची जशी चित्रे काढण्यात आली, अगदी त्याच तोडीची चित्रे भारतीय राज्यकर्त्यांची काढलेली आढळतात. अतिशय आकर्षित आणि श्रीमंतीने नटलेली ही चित्रे सहजपणे कुणाचेही लक्ष वेधून घेतील एवढी नक्षीदारपणे तयार करण्यात आलेली होती. सर्वात विशेष बाब म्हणजे, या चित्रांमध्ये दख्खन आणि पाश्चात्त्य शैलीचा संगम दिसून येतो. काही परकीय कलाकारांना भारतीय चित्रकारांनी मदत केल्याने हा अपूर्व संगम या चित्रात झालेला आढळून येतो.[९०]

अजून एक महत्त्वाची आणि विशेष नोंद घेण्यासारखी गोष्ट म्हणजे मनूची आणि या डच राजदूताच्या चित्रामध्ये प्रचंड प्रमाणात समानता आहे. उदाहरण घ्यायचे झाल्यास, डच राजदूत बागेमध्ये बसलेला असताना किंवा पालखीतून जात असतानाचे चित्र उपलब्ध आहे. या दोन्ही प्रसंगात आढळणाऱ्या बऱ्याच गोष्टी मनूचीच्या चित्रामध्ये सुद्धा तंतोतंत दिसून येतात. शाहिस्तेखानाचे बागेत बसलेले चित्र असेल (चित्र क्र.

---

*८९. Het Witsenalbum, pp. 201 & 209-10*

*९०. विटसेन संग्रहातील चित्रांच्या तारखेची निश्चिती करण्याचा प्रयत्न तीन अभ्यासकांनी केला. सन १९३४मध्ये Hermenn Goetz यांनी सर्वप्रथम हा संग्रह प्रकाशित केला. त्यांनी या चित्रांचा काळ इसवी सन १६८६ ठरवला. पुढे, सन १९९६ मध्ये Lunsingh यांनी संग्रहावर परत एकदा काम केले. चित्रांखाली असणाऱ्या डच वाक्यांवरून आणि त्यांच्या लेखनपद्धतीवरून चित्रांचा काळ इसवी सन १६८५च्या मध्यात ठरवण्यात आला. पुढे, Kruijtzer ने डच मजकुराचा अभ्यास करून काही चित्रांचा काळ हा डिसेंबर १६७७ ठरवला.*

१६) नाहीतर कामबक्ष पालखीतून जात असतानाचे, दोन्ही चित्रे त्या राजदूताच्या चित्राशी अगदी तंतोतंत जुळतात. त्याचबरोबर, विटसेन संग्रहातील चित्रांत दाखवलेली फुलांची कलाकुसर आणि मनूचीच्या चित्रांत बॉर्डरवर केलेली फुलांची कलाकुसर सारखी आहे. या सर्व चित्रांमध्ये सैनिकांची जामा घालण्याची पद्धतसुद्धा बऱ्यापैकी सारखी आहे. जामा हे तत्कालीन काळात लोकप्रिय वस्त्र होते. हिंदू सैनिक जामा डावीकडे तर मुस्लीम सैनिक उजवीकडे बांधत असत.[११] इथे एक मजेशीर बाब अशी, की डच राजदूताच्या आणि मनूचीच्या चित्रांमध्ये जवळ जवळ २७ वर्षांचे अंतर आहे. मनूचीचा चित्रसंग्रह इसवी सन १६८६च्या आसपास पूर्ण झाला, तर जोहान्स बचेरुस याचे प्रसिद्ध चित्र इसवी सन १७१२ मध्ये रेखाटण्यात आले. मग इथे अशी शंका उपस्थित राहते, की जर या चित्रांमध्ये एवढ्या वर्षांचे अंतर असेल, तर मनूची आणि बचेरूस यांच्या संग्रही असणाऱ्या चित्रांमध्ये एवढी समानता कशी? म्हणजेच, मनूचीसाठी काढण्यात आलेल्या चित्रांचा चित्रकार मीर महंमद नसून, गोवळकोंड्यातील स्थानिक कलाकार होते, ज्यांनी पुढे बचेरूसचे चित्र रेखाटले, हे यावरून स्पष्ट होते. इर्विनच्या एका छोट्याशा चुकीमुळे आजवर आपण एका चुकीच्या इतिहासाला सर्वमान्यता दिली. पण, जसे नवीन पुरावे उजेडात येत जातील तसा जुना इतिहास बदलला जातो, हेच त्रिकालाबाधित सत्य आहे.

आतापर्यंत आपण ज्या चित्राविषयी चर्चा केली त्या जोहान्स बचेरूस याचे चित्र नेमके आहे तरी कसे? त्यामागची गोष्ट काय, हे थोडक्यात पाहूया.

गोवळकोंड्याच्या पाडावानंतर डचांनी मुघलांसोबत हातमिळवणी करण्याचा निर्णय घेतला. डिसेंबर १६८८ मध्ये मसुलीपट्टणवरून बचेरूस हा औरंगजेबास भेटण्यास निघाला. मे १६८९मध्ये तो औरंगजेबाच्या छावणीजवळ जाऊन पोहोचला. त्याने लिहून ठेवले आहे, 'मुघल बादशाह भीमा नदीच्या वरच्या खोऱ्यात, दख्खनेच्या उत्तरभागात तळ ठोकून होता. VOC च्या कागदपत्रांत बादशाह 'Pimplej' या खेडेगावाजवळ मुक्कामास असल्याची नोंद आहे. Pimplej म्हणजे पुण्यापासून २७ किमी वर असणारे आजचे पिंपळगाव.[१२]. पण, साकी मुस्तैदखानाच्या नोंदीनुसार, बादशाह कोरेगाव (कोरेगाव-भीमा) जवळ मुक्कामास होता. गोवळकोंड्याच्या बादशाहने दिलेल्या सवलती आणि सुविधा आहेत तशा औरंगजेबाने सुरळीत

---

११ *The Anglo-Indian dictionary*

१२. *VOC 1510 : 469-74*

चालू ठेवाव्यात, या मागणीसाठी बचेरुस मुघल बादशाहला भेटायला गेला होता. औरंगजेबाने त्याच्या मागण्या मान्य करून त्यास 'गुलझार खान' ही पदवी देऊन सन्मानित केले. विशेष म्हणजे औरंगजेबाने फार कमी लोकांना ही पदवी बहाल केली होती.[१३] सोपवलेली जबाबदारी सुरळीत पार पाडल्यावर बचेरूस १६९०च्या सुरुवातीस मासोळीपट्टणमला पोहोचला.[१४] पण, एक विशेष गोष्ट म्हणजे, कुतूबशहाकडे असणारे चित्रकार, कलाकार नंतर कुणाच्या आश्रयास गेले, याविषयी कोणतीही नोंद मिळत नाही. गोवळकोंड्याच्या पाडावानंतर त्यांनी इतरत्र राजाश्रय घेतलेला असावा किंवा मुघल दरबारातील काही बड्या सरदारांनी त्यांना जबरदस्तीने आपल्याकडे ठेवून घेतलेले असावे. एवढ्या धामधुमीच्या काळातसुद्धा मुघलांच्या गोटात चित्रकला बहरत होती. याचे उदाहरण म्हणजे मौसम खान नावाच्या सरदाराने बचेरूसला भेट दिलेले त्याचे चित्र. बचेरूस औरंगजेबास भेटायला आला, तेव्हा या मौसमखानच्या हाताखाली काम करणाऱ्या चित्रकारांनी आज्ञेवरून चित्र काढले. मौसमखानने भविष्यातील फायदा ध्यानात घेत बचेरूसला त्याचे चित्र पाठवून दिले. बचेरूस स्वतः च्याच चित्राच्या प्रेमात एवढा पडला, की चित्राला रोज तासनतास न्याहळत बसणे त्याला फार आवडत असे. तशी नोंदही त्याने करून ठेवली आहे.[१५] या चित्रांमध्ये फार महत्त्वाच्या गोष्टीसुद्धा अनावधानाने रेखाटल्या गेल्या आहेत, उदा. VOC चा अधिकृत झेंडा, मुघल छावणीची व्यवस्था, तंबूंचा आकार, वेगवेगळ्या गोष्टींसाठी उभारण्यात येणारे काही महत्त्वाचे तंबू, व्यक्ती इत्यादी. यांमध्ये दोन व्यक्तींची ओळख करून देणे महत्त्वाचे वाटते, ते म्हणजे दोन दुभाषी या चित्रात दाखवले आहेत. त्यातील एकाचे नाव हनुमंतू आणि दुसरा पेमराज. VOCच्या अधिकृत कागदपत्रांमध्ये सुद्धा यांची नावे आढळून येतात. सतराव्या शतकातील दुभाषी असणाऱ्या भारतीय व्यक्तींची चित्रे समोर येण्याचा हा पहिलाच प्रकार. या दोघांनाही अनुक्रमे सोळा आणि वीस रुपये पगार देण्यात येईल जो इतर राजपूत, हिंदू आणि मुस्लीम सैन्यापेक्षा जास्त असल्याची नोंद आहे. सतराव्या शतकामध्ये भारतीय चित्रकारांनी कोण्या युरोपिअन

---

१३. *मुघल बादशाहकडून जी मनसब देण्यात येत असे, ती एका चामड्याच्या तुकड्यात गुंडाळून मिळत असे. अठराव्या शतकात मनसब मिळालेल्या केवळ तीनच मनसबीची आवरणे उपलब्ध आहेत, पण ती फार साध्या धाटणीची आहेत. यापैकी एक सुप्रसिद्ध म्हणजे ढहेरी कशशी याची. (सध्या रिक्सम्युजियम येथे.)*

१४. *Dit Vuijle Nest Gesuijvert; Generale missieven van Gouverneurs; Dutch sources on South -sia; Manucci 1907, 2:383-88*

१५. *VOC 1510 : 621-2V , 628V-9V ., HR 41 : no. 2*

लोकांचे अशा पद्धतीने काढलेले चित्र दुर्मिळ आहे. ज्या व्यक्तीचे चित्र काढण्यात आले, त्याच व्यक्तीने चित्राविषयी समीक्षा करावी, नोंद करून ठेवावी ही सुद्धा दुर्मिळ गोष्ट आहे. मुघल, तसेच डचांच्या संपूर्ण छावणीचे एकाच ठिकाणी केलेले चित्रण ही अतिदुर्मिळ बाब आहे. पण या चित्रासाठी मात्र सर्वच दुर्मिळ योग जुळून आले होते.[१६] बचेरूसने स्वतःचे चित्र काढलेल्या चित्रकारांना आपल्या पदरी नियुक्त करून स्वतः ची अजून काही चित्रे काढून घेतली. अशी कृती करणारी भारतातील ही पहिलीच डच व्यक्ती.

अशीच कहाणी शिवाजी महाराजांच्या अश्वारूढ चित्राची, निकोलाओ मनूची आणि जोहान्स बचेरूस यांच्या पदरी काम करणाऱ्या चित्रकारांची आणि मीर महंमदच्या 'चित्रकलेमागील' गुपिताची.

या मनूचीने शिवाजी महाराजांच्या अश्वारूढ चित्राच्या अनेक प्रती तयार करून घेतल्या होत्या. त्यापैकीच एक म्हणजे 'The Inde' या इसवी सन १८४५ साली[१७] प्रकाशित झालेल्या ग्रंथात छापलेले चित्र (चित्र क्र. १७). या चित्रामध्ये शिवाजी महाराज घोड्यावर स्वार आहेत. मनूचीने काढलेल्या शिवाजी महाराजांच्या अश्वारूढ चित्रामधील सर्वच भाग वगळून केवळ शिवाजी महाराज आणि घोडा या नक्कलप्रतीमध्ये रेखाटला आहे. घोडा संपूर्ण पांढरा असून पायांचा रंग काहीसा राखाडी आहे. शिवाजी महाराजांचा चेहरा मात्र उतारवयीन दाखवला आहे. महाराजांच्या अंगात निळ्या रंगाचा अंगरखा असून पायांत काळ्या रंगाच्या मोजडी आहेत. या चित्राची रंगसंगती अतिशय वेगळी आहे. डोक्यावरील जिरेटोपाचा रंग पिवळसर दाखवला आहे. चेहऱ्यावर सुरकुत्या दाखवल्या असून गाल आत गेल्यामुळे चेहऱ्यावरील हाडं स्पष्ट दिसत आहेत. बाकी घोड्याच्या अंगावर केलेली सजावट हुबेहूब चित्र क्र. १३मधील घोड्याप्रमाणे आहे. शिवाजी महाराजांच्या हातात दांडपट्टा आणि डाव्या हातात लगाम दाखवला आहे. मात्र, पाठीवर ढाल रेखाटली नाही. प्रा. ग. ह. खरे यांनी सुद्धा त्यांच्या एका लेखामध्ये या चित्राविषयी ओझरता उल्लेख केला आहे.[१८] अतिशय साध्या पद्धतीने काढलेले हे चित्र अठराव्या शतकात तयार करण्यात आलेल्या फ्रान्सच्या Encyclopedia ग्रंथात समाविष्ट करण्यात आले होते.

---

१६. *Dutch-Asiatic shipping in 17th 18th centuries. pp.1114*

१७. *Dolphe Philibers Dubois de Jancigny, Xavier Raymonds या दोन लेखकांनी लिहिलेला ग्रंथ सन १८४५ साली प्रकाशित झाला. या पुस्तकाच्या एकूण सतरापेक्षा जास्त आवृत्त्या प्रकाशित झाल्या आहेत. या ग्रंथाच्या पान नं. ७१४७ वर हे चित्र छापून आले.*

१८. *छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथ.*

या ग्रंथात जगातील मोठमोठ्या राजांचा समावेश करण्यात आला होता. आशिया खंडातील १५ ते २० राजांची माहिती त्या ग्रंथात समाविष्ट करण्यात आली होती. त्यामध्ये 'आशिया खंडातील एक सर्वश्रेष्ठ राजा' म्हणून शिवाजी महाराजांचा समावेश करण्यात आला होता. सदर चित्रसुद्धा या ग्रंथात छापण्यात आले होते.[९९]

शिवाजी महाराजांचे एक ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचे चित्र मुंबईच्या छत्रपती शिवाजी महाराज वस्तूसंग्रहालयामध्ये पाहायला मिळते (चित्र क्र. १८). हे चित्र अनेकांगांनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रा. ग. ह. खरे या चित्राविषयी वर्णन करताना लिहितात,

'या चित्रात महाराज उभे व सव्यावर्ती दाखवले आहेत. पगडी पिवळ्या रंगाची आणि दोन तुऱ्यांची आहे. अंगात पांढऱ्या रंगावर हिरवी-तांबडी फुले काढलेला चिटाचा अंगरखा आहे. त्यावर जांभळ्या रंगाचा जरीकाठी दुपट्टा दाखवला आहे. कमरेस सोनेरी पदराचा शेला आहे. सोनेरी उभ्या रेषा असलेली, खुतनीची तांबडी विजार. पायात सोनेरी कलाबतूचे जोडे. डाव्या हातात जांभळे मेण असलेल्या व जमिनीस टेकवून उभी केलेल्या धुपेची सोनेरी मूठ आहे. चित्रात महाराजांचा रंग पुष्कळच काळा दाखवला आहे. पण युरोपियन लोकांच्या वर्णनानुसार महाराजांचा रंग सामान्य मराठ्यांपेक्षा जास्त उजळ होता. अंगरख्याची किनार पुष्कळच गोलाकार दाखवली आहे. यावरून हे चित्र काढणाऱ्या कलाकाराने महाराजांना पाहिले नसावे, हे नक्की. बहुदा १८व्या शतकाच्या मध्यावर हे चित्र नक्कलरूपाने राजस्थानात कुठेतरी तयार झाले असावे. हे चित्र पहिल्यांदा डॉ.बाळकृष्ण यांच्या 'Shivaji album' या पुस्तकात आणि भा.इ.सं.मं.पुरस्कृत 'शिवभारत' ग्रंथात छापले आहे.'[१००]

या चित्राचे वैशिष्ट्य म्हणजे यात शिवाजी महाराजांना काळ्या रंगात दाखवले आहे. शिवरायांचा रंग उजळ होता, हे मागील प्रकरणात आपण पाहिलेच आहे. हे चित्र इसवी सन १७५०च्या आसपास रेखाटण्यात आले असल्याचा अभ्यासकांचा अंदाज आहे. इतिहास अभ्यासक द. बा. पारसनीस यांचे सहकारी 'पुरुषोत्तम विश्राम मावजी' यांच्या वैयक्तिक संग्रहात हे चित्र होते. पुढे त्यांनी ते तत्कालीन 'प्रिन्स ऑफ वेल्स' संग्रहालयाकडे सोपवले. या चित्रात शिवाजी महाराजांची शरीररचना, डोक्यावरील जिरेटोप, तलवार,

---

*९९ पुण्यातील इतिहाससंशोधक मालोजीराव जगदाळे यांनी सदर चित्राची मूळ प्रत क्रोएशिया वरून २०१५ साली मिळवली. या चित्राची मूळ प्रत भारतात परत आणून प्रकाशित करणारे ते पहिलेच इतिहास संशोधक.*

*१००. छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथ*

दांडपट्टा, अंगावरील अंगरखा आणि त्यावर रेखाटलेली पानाफुलांची नक्षी, कमरेस गुंडाळलेला रत्नजडित शेला आणि गळ्यातील मोत्यांची माळ हे सर्व शिवरायांच्या इतर समकालीन चित्रांशी तंतोतंत मिळतेजुळते आहे. त्यामुळे, चित्राचा निर्मितीकाळ जरी शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीनंतरचा असला तरीही एखाद्या अस्सल चित्रास पाहून या चित्राची निर्मिती झाली असावी, असे वाटते. तसेच, सदर चित्र महाराष्ट्रात तयार करण्यात आले होते. त्यामुळे या चित्राची येथे नोंद घेणे आवश्यक आहे.

पॅरिसच्या 'गीमे म्युजियम' (Musee Guimet) मध्ये शिवाजी महाराजांचे एक वैशिष्ट्यपूर्ण चित्र पाहायला मिळते (चित्र क्र. १९). डाव्या हातात फूल घेतलेले शिवाजी महाराजांचे हे चित्र गोवळकोंड्यास काढले असावे, असा अभ्यासकांचा अंदाज आहे. हे चित्र २७.६×१८.७ सेमी. एवढ्या आकाराचे आहे. या चित्रात चित्रकाराने शिवाजी महाराजांचा चेहरा समोरून रेखाटलेला असल्यामुळे या चित्राचे महत्त्व वाढते. शिवाजी महाराजांची जेवढी चित्रे उपलब्ध आहेत, त्यामध्ये महाराजांचा चेहरा एकाच बाजूने दाखवला आहे. पण, केवळ याच चित्रात शिवाजी महाराजांचा संपूर्ण चेहरा आपण पाहू शकतो. शिवाजी महाराजांच्या अंगात पांढरा अंगरखा असून त्यावर पाना-फुलांचे नक्षीकाम केलेले आहे. उजव्या हातात दांडपट्टा परिधान केला असून डाव्या हातात पिवळे फूल धरलेले दिसून येते. गळ्यात मोत्यांच्या माळीसोबतच भलेमोठे रत्नजडीत पदक दिसते. असे म्हणतात, शिवाजी महाराजांना कुतूबशाहने कोहिनूरपेक्षा मौल्यवान हिरा भेट म्हणून दिला होता, जो शिवाजी महाराजांनी आपल्या गळ्यामध्ये धारण केला होता. अर्थात, ही एक दंतकथाच. या चित्रात शिवाजी महाराजांची दाढी विरळ असून मिशा टोकदार दाखवल्या आहेत. या चित्राखाली "Siewvagie den overledenen Maratise vorst' हे वाक्यखंड दिसून येते. हे चित्र सर्वप्रथम Gijs Kruijtzer यांनी आपल्या पुस्तकात कृष्णधवल रंगात प्रकाशित केले. अतिशय वैशिष्ट्यपूर्ण असे हे चित्र आहे.[१०१]

अगदी याच प्रकारचे चित्र आपल्याला हैद्राबाद येथील 'सालार जंग' संग्रहालयात दिसून येते (चित्र क्र. २०). या चित्रात शिवाजी महाराजांचा चेहरा समोरील बाजूने रेखाटण्यात आला आहे. त्यामुळे, शिवाजी महाराजांच्या चेहऱ्याच्या दोन्ही बाजू स्पष्टपणे आपण पाहू शकतो. या चित्रात शिवाजी महाराजांच्या उजव्या हातात पट्टा तर डाव्या हातत तलवार धरल्याचे दिसून येत आहे. शिवाजी महाराजांच्या अंगावर

---

१०१ *Xenophobia in 17th century india, pp. 163*

असलेला अंगरखा पिवळसर रंगाचा असून त्यावर पाना-फुलांची नक्षी केलेली आहे. पण ही नक्षी इतर चित्रांमध्ये आढळून येणाऱ्या नक्षीपेक्षा वेगळी आहे. गळ्यात मोत्यांच्या माळा आहेत, पण कानांत कोणत्याही प्रकारचे आभूषण नाही. या चित्रातील शिवाजी महाराजांची दाढीसुद्धा विरळ आहे. चित्राचे सर्वात मोठे वैशिष्ट्य म्हणजे शिवाजी महाराजांच्या डोक्यावर असलेली पगडी. प्रथमदर्शी हा फेटा वाटतो, पण कापड वेगळ्या पद्धतीने डोक्याला गुंडाळून त्यास पगडीसारखा आकार दिल्याचे दिसून येते. अशा प्रकारची पगडी अथवा फेटा इतर कोणत्याही समकालीन अथवा उत्तरकालीन चित्रात आढळून येत नाही, या चित्रातील पट्टा अगदी इतर समकालीन चित्रात चित्रित केल्याप्रमाणे असला तरीही तलवार काहीशी वेगळी आहे. तलवारीची मूठ इतर चित्रांमध्ये दाखवतात तशी नाही. सदर चित्र सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात किंवा अठराव्या शतकाच्या सुरुवातीस काढले असावे, असे वाटते.

शिवाजी महाराजांच्या चार विलक्षण चित्रांविषयी आता माहिती घेऊ या. यातील दोन चित्रे आज पॅरिस येथील 'राष्ट्रीय ग्रंथगारात' असून उर्वरित दोन चित्रे रशिया आणि जर्मनीत आपल्याला पाहायला मिळतात. 'BnF' (राष्ट्रीय ग्रंथागार, फ्रान्स) मधील पहिले चित्र (चित्र क्र. २१) Smith-Lesouef कलेक्शनमध्ये आपल्याला पाहायला मिळते. जगातील अतिदुर्मिळ गोष्टींचा संग्रह असणाऱ्या ग्रंथालयात या Smith-Lesouef कलेक्शनचा समावेश होतो. याच कलेक्शनमध्ये असणाऱ्या एका manuscript मध्ये शिवाजी महाराजांचे चित्र आहे. "Recueil de Portraits de sultans et grands personnages de l'inde' असे नाव असलेल्या कॅटलॉगमध्ये शिवाजी महाराजांचे एक उतारवयीन चित्र आपल्याला आढळते. यात शिवाजी महाराजांच्या चेहऱ्यावर वयोमानामुळे पडलेल्या सुरकुत्या दिसून येतात. शिवाजी महाराजांचा जिरेटोप हा साधा असून त्यावर मागील बाजूने मोत्यांचा लोंबता तुरा दिसून येतो. गळ्यात मोत्यांची दुहेरी माळ दिसते. तसेच, डाव्या हातातील पट्ट्याच्या मूठीवर सोन्याचे काम असून प्राण्याच्या सुळ्यांची रचना स्पष्ट दिसून येते. पट्टा मात्र फारच आखूड दाखवला आहे. या चित्रात महाराजांची देहयष्टीसुद्धा अतिशय किरकोळ दाखवली आहे. या चित्राचा आकार ५७×३६.१२सेमीएवढा असून फ्रान्सच्या राष्ट्रीय ग्रंथालयाला सन १९१३ साली 'भेट' म्हणून देण्यात आले.

याच लायब्ररीत असणारे शिवाजी महाराजांचे दुसरे चित्र (चित्र क्र. २२) अगदी क्र. २१ प्रमाणे हुबेहूब रेखाटले आहे. या दोन्ही चित्रांमध्ये कोणत्याही प्रकारचा फरक नाही. चित्रांची रचना, अंगावर दाखवलेले कपडे, हातातील शस्त्रे, त्यावर भरलेले

रंग सगळे काही अगदी सारखे. सन १८८३ मध्ये तयार करण्यात आलेल्या "prisse avenners' या कॅटलॉगमध्ये चित्राचा समावेश केलेला असून त्याचा आकार १३.४×९.५ भसेमी एवढा आहे. दोन्ही चित्रांचे निर्मितीस्थळ गोवळकोंडा असून निर्मितीकाळ इसवी सन १६८५ सांगण्यात येतो. दोन्ही चित्रे समोरासमोर ठेवल्यास त्यांच्यातला फरक सहजासहजी समजत नाही. फक्त चित्र क्र.२१मध्ये शिवाजी महाराज पूर्ण दाखवले असून चित्र क्र. २२ मध्ये अर्धेच शरीर रेखाटले आहे.

पॅरिस येथे असणाऱ्या Smith-lessouef (232 series) कलेक्शनमधील चित्रांच्या खाली लिहिलेल्या मजकुरावरून ही चित्रे सन १६७५ ते १६८० या काळात पूर्ण झाल्याचे समजते. आवर्जून सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे डच मजकूर असलेल्या अजून दोन सिरीज दोन वेगवेगळ्या संग्रहालयांत आहेत. त्यातील एक 'ब्रिटिश संग्रहालय' आणि दुसरे, 'गीमे संग्रहालय'. या सिरीजमध्ये असलेल्या चित्रांचा काळ हा थोडासा वेगळा आहे. ब्रिटिश म्युझियममध्ये असणारी सर्व चित्रे मे १६८२ ते ऑक्टोबर १६८५ या काळात पूर्ण झाली, तर गीमे म्युझियममध्ये असणारी चित्रे एप्रिल १६८३ ते ऑक्टोबर १६८५ या काळात काढण्यात आली.

हिटलरच्या जर्मन सैन्याने दुसऱ्या महायुद्धात जगभर धुमाकूळ घातला होता. याच धामधुमीत पंधरा भारतीय लघुचित्रांचा संग्रह या जर्मन सैनिकांच्या हाती लागला, जो आज बर्लिनच्या राष्ट्रीय ग्रंथालयात ठेवला आहे. यातील एक चित्र शिवाजी महाराजांचे आहे (चित्र क्र. २३). गळ्यातील मोत्यांची माळ आणि कमरेचा रत्नजडित शेला सोडला, तर इतर कोणत्याही प्रकारचे दागिने शिवाजी महाराजांच्या अंगावर दिसून येत नाहीत. शिवाजी महाराजांचा चेहरा उतारवयीन दाखवला आहे. हातात तलवारीची आणि पट्ट्याची केवळ मूठ दिसून येते. तसेच, चित्राच्या बाजूने अंडाकृती वर्तुळ रेखाटले आहे. महाराजांच्या चित्राच्या मागील बाजूस फिकट पोपटी रंग दिलेला आहे. चित्राच्या बाजूने सोन्याच्या पानाफुलांची नक्षी केलेली आहे.

रशियाच्या 'लेनिनग्राड' येथील राष्ट्रीय ग्रंथालयात असणारे शिवाजी महाराजांचे चित्र (चित्र क्र.२४) हे अगदी बर्लिनच्या ग्रंथालयात (चित्र क्र.२३) असलेल्या शिवाजी महाराजांच्या चित्राप्रमाणेच हुबेहूब आहे. या दोन चित्रांमध्ये एकच फरक आहे, तो म्हणजे बर्लिन येथील चित्रात शिवाजी महाराजांच्या मागील बाजूस फिकट पोपटी रंग आहे तर लेनिनग्राड येथील चित्रात आकाशी रंग दाखवला आहे. एवढा एक फरक सोडला तर ही दोन्ही चित्रे अगदी सारखी आहेत. बर्लिन येथील चित्राच्या मागे (चित्र क्र.२३) Sivaji, The Mahratta raja असे लिहिले आहे. या

चित्राचा आकार १२.४×९.५ सेमी एवढा आहे. तर, रशिया येथील (क्र.२४) चित्राचा आकार १६.२×११.४ सेमी एवढा आहे. सर जॉर्ज एडवर्ड प्लूस यांनी सदरील चित्र इसवी सन १७८० साली लेनिनग्राड येथील ग्रंथालयास भेट दिले. Golconda kings and dignitaries या ग्रंथाच्या ६८व्या क्रमांकावर हे चित्र असून चित्राच्या डाव्या कोपऱ्यात "Sieuwagie gewerzere maratise vorst' असा मजकूर कोरलेला आहे. रशियात असणारे शिवाजी महाराजांचे हे एकमेव चित्र आहे. मध्ययुगात या देशांचा व्यापाराच्या अथवा इतर कोणत्याही उद्देशाने भारताशी अथवा शिवाजी महाराजांशी संबंध आलेला नसतानाही ही चित्रे या देशांमध्ये असणे ही विशेष महत्त्वाची बाब आहे.

शिवाजी महाराजांची सर्वच चित्रे बारकाईने पाहिली असता त्यात अनेक वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी आपल्या नजरेस पडतात. जसे की, सर्वच चित्रांत शिवाजी महाराजांच्या अंगावरील अंगरखा एकसारखा आहे. पांढरा अंगरखा, त्यावर सोनेरी पट्ट्यांचे काम आणि नारंगी-हिरव्या रंगत केलेली पानाफुलांची नक्षी असे चित्रण सर्वच चित्रांत केलेले आढळते. शिवाजी महाराजांच्या गळ्यात केवळ मोत्यांची माळ दाखवली आहे. डोक्यावर मोत्यांचा लोंबता तुरा सर्वच चित्रांमध्ये दिसतो. याचबरोबर आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट म्हणजे शिवाजी महाराजांच्या हातात दाखवलेला पट्टा. या पट्ट्याची मूठ विशेष आहे. ब्रिटिश म्युझियममध्ये असणारे चित्र, गीमे संग्रहालयात असणारे चित्र, रिक्स म्युजियममधील चित्र, बर्लिनच्या राष्ट्रीय लायब्ररीत आणि मुंबईच्या छत्रपती शिवाजी महाराज वास्तूसंग्रहालयात असणाऱ्या चित्रामध्ये या पट्ट्यावर एक प्राण्याचे अंकन केल्याचे स्पष्टपणे दिसते.[१०२] या पट्ट्याच्या मूठीला 'वराह' या प्राण्याचे रूप दिले आहे. मध्ययुगाचा विचार करता आपल्या शस्त्रांना विविध नावे देणे, त्यांची तुलना शक्तिशाली प्राण्यांसोबत करणे हे सर्रासपणे पाहायला मिळते. एखाद्या प्राण्याचे अंकन आपल्या शस्त्रावर केल्यास त्या प्राण्याची सर्व क्षमता शस्त्रात येते, हा एक समज त्याकाळी रूढ होता. औरंगजेबाच्या दिल्ली येथील राष्ट्रीय संग्रहालयात असणाऱ्या प्रसिद्ध तलवारीवर एक वाघ हरणाची शिकार करत असल्याचा प्रसंग दाखवला आहे. हे अंकन पूर्णपणे सोन्यात केले आहे. (क्र. २५) एवढेच कशाला, अहमदनगरच्या सुलतानसाठी तयार करण्यात आलेल्या बंदुकीवर 'रुमी' असे नाव कोरलेले दिसते. या बंदुकीचा दस्ता सिंहाच्या आकाराचा तयार केलेला आहे.[१०३] यामुळे, शिवरायांच्या

---

१०२ कित्ता

१०३ *Bijapur and its architectural remains. Pp. 29-31*

शस्त्रावर एखाद्या प्राण्याचे अंकन येणे ही तशी त्याकाळात सामान्य बाब होती. शिवाजी महाराजांची आणि शहाजी महाराजांची तुलना कवींद्र परमानंदाने सिंहासोबत केलेली असून शत्रूस हत्ती असे संबोधले आहे.[१०४] मुघल सम्राट औरंगजेबाने आपल्या मुलाला दख्खनेतून आपल्या घरी, दिल्लीला येण्यासंबंधी पत्र लिहिले होते. त्यात एके ठिकाणी औरंगजेब म्हणतो, 'जो माणूस त्याच्या घरापासून लांब लांब जातो तो असहाय्य, गरजू आणि परिस्थितीसमोर गुडघे टेकलेला बनून जातो. पाण्यात पडलेला सिंह ज्या प्रकारे माशांची शिकार बनतो, किंवा सुकलेल्या जमिनीवर (वाळवंटात) मगर-मुंग्याचे खाद्य बनतो, अगदी त्याप्रकारे माझी परिस्थिती झाली आहे.'[१०५] गोवळकोंड्याचा बादशाह अबुल हसनविषयी भीमसेन सक्सेना म्हणतो, 'एखाद्या वाघाला जेव्हा सिंहाच्या पंजाची झापड लागते, त्यानंतर तो वाघ कधीही सिंहाच्या विरोधात उभा राहत नाही.'[१०६] औरंगजेबाने कुतूबशाही नष्ट केली, त्यानंतर या घटनेचे सविस्तर वर्णन करताना भीमसेन याने वाघ आणि सिंहाच्या उदाहरणातून मुघल-कुतूबशाहीच्या सामर्थ्याची तुलना केली आहे. शिवाजी महाराज, आदिलशाह यांची चित्रे रेखाटताना सिंह, वाघ, हत्ती, वराह यांसारख्या प्राण्यांचे चित्रण शस्त्रांवर काढल्याचे आपल्याला दिसून येते. माझ्या एका मित्राच्या वैयक्तिक संग्रहामध्ये तीनशे वर्षे जुना असलेला पट्टा पाहण्यात आला. या पट्ट्याच्या संपूर्ण मुठीवर 'शरभ' हा प्राणी कोरलेला होता. शिवाजी महाराजांच्या सर्वच चित्रांमध्ये हातात धारण केलेल्या पट्ट्याची मूठ वराहमुखी दाखवली आहे. महाराजांच्या पट्ट्याची मूठ प्रत्यक्ष पाहून त्याचे वर्णन 'हर्बर्ट डी यागर'ने आपल्या नोंदवहीत करून ठेवले आहे.[१०७] वराह या प्राण्यात प्रचंड ताकद आहे. पुराणकथांमध्ये पाताळात बुडालेल्या पृथ्वीला वर आणण्यासाठी विष्णूने वराहाचे रूप घेतले होते, याला कारण वराह या प्राण्याच्या अंगात असणारी प्रचंड ताकद. त्यामुळे, शिवाजी महाराजांचा हा वैशिष्ट्यपूर्ण पट्टा सर्व चित्रांमध्ये उठून दिसतो, लक्षवेधी ठरतो.

शिवाजी महाराजांच्या जगभरात पसरलेल्या काही महत्त्वाच्या आणि समकालीन म्हणून ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाच्या चित्रांची ही चरितकहाणी. यांसोबतच भारतातही

---

*१०४ संस्कृत अध्याय आणि श्लोक : ४.६३, ९.७४, १३.४६, १३.५०, १३.७४, १३.१२१-१२२, १४.२-३, २१.३७-३९*

*१०५ Anecdotes of Aurangzeb. pp. 42*

*१०६ तारीख-इ-दिल्कशा, पृ. १४८*

*१०७ Two dutch east india company employees in national archives, the Hague, at Velikondawaram to Pulikat 10.8.1677, VOC 1328 : folio 620 V*

काही चित्रांचा उल्लेख अनेक अभ्यासकांनी केला आहे. त्यांच्या समकालीनतेविषयीचे कोणतेही ठोस प्रमाण आज उपलब्ध नसले, तरीही त्यांची चर्चा होणे गरजेचे आहे.

मुंबईच्या छत्रपती शिवाजी महाराज वास्तू संग्रहालयात शिवाजी महाराजांचे आणखी एक चित्र दिसून येते. हे अफझलखान वधानंतर शिवाजी महाराज आणि रुस्तुमेजमा यांच्यात झालेल्या लढाईचे रंगीत चित्र आहे. मध्यभागी गोल करून उभारलेले सैन्य रुस्तुमेजमाचे आहे. त्याला महाराजांच्या सैन्याने वेढा घातलेला आहे. यातील एका व्यक्तीच्या खाली लाल रंगाने 'रुस्तुमेजमा' असे लिहिले असून दुसऱ्या व्यक्तीच्या खाली तांबड्या रंगात 'सिवा'असे लिहिले आहे. उजव्या हातात भला मोठा लांब व दुफळी भाला असून डाव्या हातात फूल आणि घोड्यावर बसलेला वामावर्ती पुरुष वेढ्याची पाहणी करतोय, असे चित्र रेखाटले आहे. यात महाराजांना दाढी जरी नसली तरी उन्हाचा त्रास होऊ नये म्हणून एका सेवकाने डोक्यावर सूर्यपान (अब्दागिर) धरलेले आहे. कपडेही इतरांपेक्षा मौल्यवान दिसून येतात. हे चित्र पहिल्यांदा डॉ. बाळकृष्ण यांच्या 'shivaji album' या पुस्तकात प्रसिद्ध झाले.

ग. ह. खरे यांनी महाराष्ट्राबाहेर असणारी दोन चित्रे प्रकाशित केली होती. ही दोन्ही चित्रे आज सामान्य लोकांना पाहण्यासाठी उपलब्ध नाहीत. यातील एक चित्र जयपूर पोथीखान्यात होते. पुण्यात झालेल्या पहिल्या IHRC च्या पहिल्याच अधिवेशनात प्रा. खऱ्यांनी हे चित्र प्रकाशित केले. शिवाजी महाराजांच्या उजव्या हातात खंजीर, डाव्या हातात फूल, कमरेस कट्यार आणि तलवार खोचलेली दिसून येते. हे चित्र सुद्धा डॉ. बाळकृष्ण यांच्या पुस्तिकेत छापण्यात आले. प्रा. खरे यांनी ग्वाल्हेर येथील शिवाजी महाराजांचे असेच अपरिचित चित्र उजेडात आणले. त्या चित्राविषयी खरे यांनी त्यांच्या अहवालात लिहिले आहे,

'१९३५मध्ये पुण्यात मॉडर्न हिस्टरी काँग्रेसचे अधिवेशन झाले होते, त्यात ग्वाल्हेरवरून आणलेले चित्र प्रकाशित करण्यात आले. या चित्रात महाराज वामावर्ती व उभे दाखवले आहेत. डोक्यास इतर चित्रांप्रमाणे दक्षिणी पद्धतीची पण एकाच तुऱ्याची पगडी दाखवली आहे. त्याखाली झुलपे, मिश्या व फुले चितारलेला पायघोळ अंगरखा आहे. गळ्यात मोत्यांची दुपदरी माला आहे. दक्षिणी पद्धतीने पांघरलेला दुपट्टा असून कमरेस नक्षीदार कमरपट्टा आहे. दुपट्ट्याचा पदर त्याखालून उजव्या बाजूस घेतला आहे. उजव्या हातात नक्षीदार मेणाची तलवार, तर डाव्या हातात फूल आहे. पायात साधी पण सफेद विजार. त्याखाली नक्षीकाम केलेले चढाव आहेत.

महाराज बांधेसूद दाखवले असून शरीर कमावलेले असावे, असे वाटते. या चित्रावर कोणताही लेख नाही.'[१०८]

बिकानेर येथील प्रसिद्ध पुराणवस्तूसंग्राहक व विक्रेते श्री मोतीलाल खजांची यांच्या संग्रहात शिवाजी महाराज व संभाजी महाराज यांचे एकत्रित काढलेले चित्र आहे. प्रा. खरे यांनीच हे चित्र स्वतः पाहून त्यावर टिपण काढले होते. त्यांच्या मते, बिकानेर येथील चित्र इतर प्रसिद्ध चित्रांपैकी कोणत्याही कलाकृतीशी जमणारे नाही. अगदीच सुमार कलावंताने ते काढले असावे. बिकानेर शासकीय पुराभिलेख संग्रहात एक जुन्या चित्राची सूची असून त्यात सदर चित्र शिवाजी व संभाजी यांचे असल्याची नोंद आढळते. जयपूर, ग्वाल्हेर आणि बिकानेर येथील तिन्ही चित्रे राजपूत शैलीत काढली आहेत. त्यामुळे त्या चित्रांचा निर्मितीकाळ अठराव्या शतकातील उत्तरार्ध असावा असे वाटते.

"Historical Fragments of Mogul Empire' या जगप्रसिद्ध पुस्तकाचा लेखक 'रॉबर्ट ऑर्म' याने त्याच्या पुस्तकात शिवाजी महाराजांचे एक चित्र छापले आहे. हे चित्र फ्रांस्वा व्हॅलेंटीन याच्या पुस्तकात प्रकाशित झालेल्या चित्राची हुबेहूब नक्कल आहे. या चित्राचे महत्त्व सांगायचे झाल्यास ऑर्मने हे चित्र आपल्या पुस्तकाच्या सात क्रमांकाच्या पानावर छापले आहे. भारताच्या इतिहासावर लिखाण केलेल्या ग्रंथात शिवाजी महाराजांचे चित्र पुस्तकाच्या अगदी सुरुवातीस असावे, हे निश्चित अभिमानास्पद आहे (चित्र क्र.२६). हे पुस्तक ऑर्मने इसवी सन १७८२ साली प्रकाशित केले.

अशी गोष्ट आहे छत्रपती शिवाजी महाराजांच्या चित्रमय चरित्राची. यामध्ये अनेक अपरिचित गोष्टी उलगडल्या गेल्या. शिवाजी महाराजांच्या पदरी चित्रकार असल्याची नोंद अथवा त्यांच्या राहणीमानाचे डी यागरने केलेले सविस्तर वर्णन, शिवाजी महाराजांच्या जगभर पसरलेल्या चित्रांमागे कारणीभूत असलेला निकोलस विटसेन, तर दुसरीकडे व्हॅलेंटीन आणि मीर महंमद हे शिवाजी महाराजांच्या चित्राचे चित्रकार नाहीत; यासंबंधी उजेडात आलेले पुरावे, एकसारख्या दिसणाऱ्या पण वेगवेगळ्या देशांमध्ये असलेल्या चित्राचा इतिहास, गोवळकोंड्यात काढलेल्या चित्रांना भारताबाहेर पोहोचवण्यामागे कारणीभूत असलेला औरंगजेब, हर्बर्ट डी यागरसाठी ज्या चित्रकारांनी शिवाजी महाराजंचे चित्र काढले त्यांनीच मनूचीसाठी सुद्धा चित्र काढल्याच्या

ऐतिहासिक नोंदी आहेत. शिवाजी महाराजांच्या सर्वच चित्रांमध्ये त्यांच्या अंगावर दिसणारा एकसारख्या नक्षीचा अंगरखा, पट्ट्याची वैशिष्ट्यपूर्ण मूठ, अशा कितीतरी अपरिचित गोष्टी या सर्व अवलोकनावरून स्पष्ट झाल्या.

हा काहीसा दुर्लक्षित राहिलेला विषय. दख्खनच्या स्वामीचा सर्वात पहिल्या श्रीमंत 'मऱ्हाटा पातशाह'चा विलक्षण, अपरिचित आणि वैभवशाली इतिहास. आपले महाराज, आपला राजा, आपला छत्रपती नेमका कसा दिसत असेल, याची पूर्ण कल्पना या समकालीन चित्रांवरून येते. शिवाजी महाराजांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाजवळ जाण्यासाठी ही चित्रे आपल्याला भरपूर मदत करतात. शिवाजी महाराजांना प्रत्यक्ष पाहणे जरी आपल्या नशिबात नसले तरीही या चित्रांवरून आपण शिवरायांना सहजपणे कल्पनेच्या विश्वात चितारू शकतो. अर्थात, आपल्यावर हे उपकार आहेत हर्बर्ट डी यागर, निकोलाओ मनूची व निकोलस विटसेनचे. तसेच प्रा. ग. ह. खरे, इतिहासमहर्षी वा. सी. बेंद्रे यांचेही. त्यांच्या या ऋणातून महाराष्ट्र कधीही उतराई होऊ शकत नाही.



# ३

शिवाजी महाराजांच्या चरित्राचा आजवर अनेकांगांनी अभ्यास करण्यात आलेला आहे. अनेक अभ्यासकांनी शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाचा धांडोळा घेताना विविध बाजूंवर प्रकाश टाकला आहे. पण, शिवाजी महाराजांचे लिहिणे, बोलणे नेमके कसे असावे, याविषयी मात्र अभ्यासकांनी फारसे लिखाण केलेले आढळत नाही. अपवाद फक्त सेतूमाधवराव पगडी यांचा.

मुघलांच्या समकालीन फारसी लिखाणातून मराठ्यांच्या इतिहासाचे उल्लेख मराठीत भाषांतर करून प्रकाशित करण्याचे फार मोठे काम सेतूमाधवराव पगडी यांनी केले. शिवाजी महाराजांच्या आयुष्यात घडून गेलेल्या काही प्रसंगांवर चिकित्सक भाष्य करणारे 'श्री छत्रपती नि त्यांची प्रभावळ' या पुस्तकाचे लेखन त्यांनी केले. त्यामध्ये शिवाजी महाराजांच्या आग्राभेटीचा संपूर्ण प्रसंग, राजा कर्णसोबत शिवाजी महाराजांनी संबंध प्रस्थापित करण्यासाठी केलेले प्रयत्न, 'मोगल घराण्याचा अश्वत्थामा' या नावाखाली औरंगजेबाच्या कारकिर्दीचे चिकित्सक वर्णन, शिवाजी महाराज आणि औरंगजेबाच्या कारकिर्दीचे तुलनात्मक मतप्रदर्शन अशा विविध विषयांवरील लिखाणाने पुस्तकाची पाने सजली आहेत. शिवाजी महाराजांच्या चरित्रावर वेगळ्या बाजूने प्रकाश टाकण्याचे काम सेतूमाधवरावांच्या या कलाकृतीने केले आहे. याच पुस्तकात शिवाजी महाराजांचे बोलणे नेमके कशा स्वरूपाचे असावे, याविषयी सेतूमाधवराव भाष्य करतात. खरेतर, शिवाजी महाराजांच्या बोलण्यावर कोणत्याही ठोस स्वरूपाचे पुरावे सद्यस्थितीत अस्तित्वात नसले तरीही सेतूमाधवरावांनी ज्याप्रकारे समकालीन साधनांचा आधार घेत या विषयाला न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे, तो निश्चितच आदर्शवत आहे. पण, त्यांच्या या प्रयत्नानंतरसुद्धा कोणत्याही इतिहास अभ्यासकाने या विषयाकडे लक्ष दिले नाही, हे दुर्दैवच म्हणावे लागेल. छत्रपती शिवाजी महाराजांच्या

व्यक्तिमत्त्वाचा वेध घेत असताना त्यांच्या लिखाणाकडे आणि बोलण्याच्या पद्धतीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. एखाद्याचे व्यक्तिमत्त्व त्याच्या बोलण्यामुळे पूर्णत्वास जाते, त्यामुळेच इथे या विषयावर सविस्तर चर्चा करणे अपरिहार्य आहे. अर्थात शिवाजी महाराजांनी उद्गारलेल्या वाक्याचे स्वरूप अगदी जशास तसे नसले तरीसुद्धा निदान आशय तरी आपण वाचू शकतो. दुधाची तहान ताकावर भागवण्याचा हा प्रकार असला तरी तहान काही प्रमाणात भागेल हाच प्रामाणिक हेतू आहे.

शिवाजी महाराजांच्या बोलण्याविषयी नेमक्या कोणत्या साधनांचा आधार घ्यावा, ही प्राथमिक बाब आहे. यातील सर्वांत अस्सल साधन म्हणजे शिवाजी महाराजांनी लिहीलेली पत्रे आणि त्यांच्या आज्ञेवरून रचण्यात आलेले परमानंदकृत 'शिवभारत' होय. सभासदबखरीची रचना जरी शिवाजी महाराजांच्या महानिर्वाणानंतर झालेली असली तरीही सभासदास शिवाजी महाराजांचा सहवास लाभला होता, त्यामुळे सभासदबखरीचाही विचार व्हायला हवा, असे मत सेतूमाधवरावांनी व्यक्त केले आहे. कवींद्र परमानंद याने तर आपल्या ग्रंथाची निर्मितीच शिवाजी महाराजांच्या हुकमावरून केली होती, असे म्हटले आहे. 'आज्ञापत्र' म्हणजे शिवछत्रपतींचे हृद्गतच, असे रा. चिं. ढेरे म्हणतात. त्यामुळे, त्या ग्रंथामध्ये शिवाजी महाराजांच्या तोंडी घालण्यात आलेले वाक्य हे त्यांनीच उद्गारले असण्याची शक्यता अधिक आहे. लिखाणातून शब्दांची रचना आणि मांडणी जरी बदलत असली तरीही त्याचा आशय आणि एकूणच लकबीचा अंदाज आपण लावू शकतो. अर्थात, ज्या ज्या ठिकाणी परमानंदाने शिवाजी महाराजांचा मनाशी केलेला संवाद दिलेला आहे, तो कल्पनाविलास आणि कवित्वाची त्याजागी असणारी गरज ओळखून आपण दुर्लक्षित करू शकतो. डच, इंग्रज, मुघल, पोर्तुगीज यांना लिहिलेल्या पत्रातून शिवाजी महाराजांचे अनेक उद्गार आपल्याला स्पष्टपणे आढळून येतात. इंग्रज, पोर्तुगीज आणि डच राजदूतांना शिवाजी महाराजांची प्रत्यक्ष भेट घेण्याचे भाग्य लाभले. त्यांच्या रिपोर्टमधून शिवाजी महाराजांच्या बोलण्याचा नेमका आशय काय होता, हे खात्रीशीररीत्या समजते. याचबरोबर, काही स्वकीय सरदारांना तसेच इतर जहागीरदारांना लिहिलेल्या पत्रांमधूनसुद्धा शिवाजी महाराजांच्या तोंडच्या वाक्यांचे अस्तित्व आपल्याला जाणवते. अर्थात, आपण कोणते निकष लावतो, त्यावर हा डोलारा उभा आहे.

स्वराज्यनिर्मितीच्या सुरुवातीच्या काळात शिवाजी महाराज आपल्या सहकाऱ्यांना सतत प्रेरणा देत असत. 'हे राज्य व्हावे, हें श्रींचे मनात फार आहे. तो सर्व मनोरथ हे स्वराज्य करून पुरविणार आहे.' अशी जाणीव शिवछत्रपती आपल्या सहकाऱ्यांना

करून देत.[१०९] आज्ञापत्रात अनेक ठिकाणी आपल्याला या प्रकारचे संदर्भ आढळतात. संपूर्ण आज्ञापत्र हे शिवरायांच्या मुखातून उद्गारलेले एकूण एक रयतकल्याणकारी कलम असावेत, असा भास होत राहतो. यातील काही महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख इथे करावा लागेल. दुर्गव्यवस्थेवर प्रकाश टाकताना रामचंद्रपंत अमात्य लिहितात,

'संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग. दुर्ग नसता मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय प्रजा भग्न होऊन देश उद्वस होतो. देश उद्वस जाल्यावरी राज्य यैसे कोण्हास म्हणावे?'

किंवा आरमारावर आज्ञापत्रात आढळणारा उल्लेख,

'आरमार म्हणजे येक स्वतंत्र राज्यांगच आहे. ज्यास अश्वबल त्याची पृथ्वी प्रजा आहे, तद्वतच ज्याजवल आरमार त्याचा समुद्र. याकरिता आरमार अवस्यमेव करावे.'

सदर दोन्ही वाक्ये आज्ञापत्रातून घेतलेली असून या ग्रंथाची निर्मिती छत्रपती शिवाजी महाराजांच्या महानिर्वाणानंतर करण्यात आली. तरीसुद्धा आरमार आणि दुर्गाचे महत्त्व ओळखणाऱ्या शिवाजी महाराजांच्या मुखातीलच हे उद्गार असावेत. रामचंद्रपंतांनी शिवाजी महाराजांना आदर्श मानून सदर ग्रंथ पूर्ण केला आहे. त्यामुळेच, महाराजांच्या विचारांचा प्रभाव त्यांच्या लेखणीवर पडला नसेल तरच नवल. परमानंदांनी रचलेले 'शिवभारत' हे असेच एक महत्त्वाचे ऐतिहासिक काव्यात्मक साधन. पहिल्याच अध्यायात छत्रपती शिवाजी महाराजांनी केलेल्या आज्ञेवरून ग्रंथाची निर्मिती केल्याचे कवींद्र सांगतो,

'हे सुमते, जी जी कृत्ये या पृथ्वीवर मी केली आहेत व करीत आहे, त्या सर्वांचे तू वर्णन कर. माझे आजोबा प्रसिद्ध मालोजीराजे यांच्यापासून प्रारंभ करून हे महाभागा, तू ही महनीय कथा सांग.'[११०]

या ग्रंथात छत्रपती शिवाजी महाराजांविषयीचे अनेक प्रसंग अत्यंत चांगल्या पद्धतीने वर्णिले आहेत. शहाजी महाराजांना दगाफटका करून पकडण्यात आले तेव्हा त्यांच्या सुटकेसाठी आदिलशाहने शिवाजी महाराजांकडे सिंहगड किल्ल्याची मागणी केली. यामुळे शिवाजी महाराजांची प्रचंड चिडचिड झाली होती. या प्रसंगात काय काय घडले, याचे वर्णन करताना कवींद्र लिहितो,

माझे वडील शहाजी महाराज स्वतःच्या संपत्तीने युक्त असतानाही मुस्तफाखानावर विश्वास ठेवल्यामुळे संकटात सापडले, ही केवढी खेदाची गोष्ट! बंगरूळी राहणारा,

*१०९ मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड १५, लेखांक २६८*

*११० शिवभारत, अध्याय पहिला, श्लोक २४ ते २८.*

फरादखानादींनी वेढलेला, अत्यंत मानी असा माझा भाऊ तेथे युद्ध करील आणि मी ह्या गडांचे रक्षण करीत अगदी निर्धास्तपणे सज्ज सैन्यानिशी येथे शत्रूशी लढेन. इकडे मी स्वतः आणि तिकडे शंभूराजे असे दोघेही युद्ध करू व वडिलांस मुक्त करू. अत्यंत गर्विष्ठ अशा महम्मदशहाचा आम्हाकडून पराभव झाला, की तो आपल्या गर्वाबरोबरच महाराजांस सोडील. स्वधर्मनिष्ठ अशा आमच्या पूज्य पित्यास जर महमूद सोडणार नाही, तर तो आपल्या कर्माची फळे खास भोगील. जर आदिलशाह मूर्खपणाने महाराजांस अपाय करील, तर बाबाच त्याला त्याच्या साह्यकर्त्यासह लगेच ठार करतील.'[१११]

आपल्या वडिलांविषयी प्रचंड अभिमान, पितृनिष्ठा, थोरल्या बंधूच्या पराक्रमावर विश्वास आणि शहाजी महाराजांच्या दराऱ्याची शिवाजी महाराजांना असलेली कल्पना, अशा कितीतरी गोष्टी यामधून आपल्यासमोर उभ्या राहतात. शिवाजी महाराजांच्या मुद्रेवर उमटलेले करारी, क्रोधीत आणि पराक्रमाच्या स्फूर्तीतून आलेल्या संमिश्र भावांचे कल्पनाचित्र आपण सहज नजरेसमोर उभे करू शकतो. शिवाजी महाराज बोलत असताना त्यांच्या सभोवती जमलेल्या हजारो सैनिकांच्या अंगात वीरश्री संचारली अन् त्यांनी गगनभेदी सिंहगर्जना केली, असे वर्णन पुढे परमानंदाने केले आहे. शिवाजी महाराजांचे एवढे करारी शब्द ऐकून आपल्यालाही स्फुरण चढले नाही तर नवलच म्हणावे. शिवाजी महाराजांच्या आयुष्यात घडलेल्या सर्वांत महत्वाच्या आणि जीवघेण्या प्रसंगांपैकी एक म्हणजे अफझलखान वध. या एका घटनेने शिवाजी महाराजांच्या पराक्रमाची कीर्ती इराणच्या बादशाहपावेतो जाऊन पोहचली होती. शिवाजी महाराजांच्या युद्धनीतीचा सर्वोच्च कळस म्हणजे अफझलखानास जावळीच्या घनदाट जंगलात ओढून आणणे व त्याच्या सैन्याची धूळधाण उडवणे. याची सिद्धता शिवाजी महाराजांनी नेमकी कशी केली होती, याविषयी अत्यंत थोडक्यात कवींद्र परमानंद माहिती देतो. अफझलखान वधासमयी तो गडावर हजर असावा, असे काही इतिहास अभ्यासकांचे म्हणणे आहे. परमानंद लिहितो,

'मी बोलवण्यावरून सैन्यासमवेत तो मोठा आश्रय असलेला यवन संधी करण्याच्या इच्छेने इकडेच येत आहे. म्हणून माझ्या आज्ञेने तुमच्याकडून अडथळा न होता आलेली ही शत्रूसेना, हे अरण्य पाहू दे. एकांतात माझ्या भेटीची इच्छा करणारा तो शस्त्रास्त्रांनी सज्ज असलेले तुम्ही माझ्याबरोबर आहात हे ऐकून कदाचित भीतियुक्त

---

*१११ कित्ता, अध्याय १३*

शंकाही घेईल. म्हणून तुम्ही सर्वांनी सज्ज असूनही जवळच, गहन अरण्याच्या आत शत्रूला न कळत दडून राहावे. स्वतः करार करूनसुद्धा जर तो संधी करणार नाही, तर आमच्या दुदुंभीचा ध्वनी होताच त्याची सेना कापून काढावी.'[११२]

अफझलखान भेटीच्या आधी शिवाजी महाराजांनी अगदी याचप्रकारे आपल्या सर्व सैन्याला प्रोत्साहन दिले असेल, संपूर्ण रणनीती समजावून सांगितली असेल. शिवरायांच्या तोंडून बाहेर पडलेले शब्द अगदी जशास तसे परमानंदाने लिहिले नसले तरीही अर्थावरून आपण सहजपणे शिवाजी महाराजांच्या भावनांचा अंदाज लावू शकतो. खरे तर, संपूर्ण 'शिवभारता'त अनेक प्रसंग आहेत ज्यामध्ये शिवाजी महाराजांचे संवाद ग्रंथनिर्मात्याने रंगवले आहेत. ज्याप्रकारे शिवभारत शिवाजी महाराजांच्या समकालीन आहे, अगदी त्याचप्रकारे डिंगल भाषेत लिहिलेल्या राजस्थानी पत्रांचाही समकालीन अस्सल साधन म्हणून विचार करणे क्रमप्राप्त आहे. पुरंदरच्या तहानंतर शिवाजी महाराजांना औरंगजेबाच्या वाढदिवसाच्या निमित्ताने आग्र्यास ज्याण्याचा प्रसंग उद्भवला. ही घटना सतराव्या शतकातील सर्वात मोठी आणि भारताच्या मध्ययुगीन इतिहासाला कलाटणी देणारी ठरली. एका अर्थाने छत्रपती शिवाजी महाराज आणि औरंगजेबाचाही या घटनेनंतर नवीन जन्म झाला. या एका घटनेमुळे छत्रपती शिवाजी महाराजांचे स्वराज्य पुढे जाऊन अफगाणिस्तानच्या सीमेपावेतो जाऊन पोहोचले आणि औरंगजेबाला मात्र सर्वस्व लुटलेल्या एखाद्या फकिराप्रमाणे दख्खनच्या रानावनात भटकावे लागले. या घटनेचे सविस्तर वर्णन या राजस्थानी पत्रांतून आपल्याला वाचायला मिळते. परकालदासने १२ मे १६६६ रोजी कल्याणदासला लिहिलेल्या पत्रात औरंगजेबाच्या दरबारात घडलेल्या प्रसंगाचे सविस्तर वर्णन केले आहे. आधी पत्रात काय लिहिले आहे, ते पाहूया. सदर पत्रात शिवाजी महाराजांच्या तोंडी हिंदी वाक्य घातले आहेत. उत्तरेत राजपूत सरदार असतील किंवा इतर व्यक्ती असतील, त्यांच्याशी संवाद साधायला शिवाजी महाराजांनी हिंदी भाषेचा आधार घेतलेला असावा, असा अंदाज आपण यावरून लावू शकतो. कारण, संपूर्ण पत्रव्यवहार हा राजस्थानी 'डिंगल' भाषेत आहे. शिवाजी महाराज कोणकोणत्या प्रसंगांत काय बोलले, हे विषद करताना हिंदी शब्दांची उपाययोजना केल्याचे दिसून येते. रामसिंगाला उद्देशून शिवाजी महाराज म्हणाले,

'तुम देखो, तुम्हारा बाप देख्या, तुम्हारा पातशाहा देख्या। मैं ऐसा आदमी हो जो

---

११२ कित्ता, अध्याय २०

मुझे गोर करने खडा रखो। मैं तुम्हारा मनसबी छोड्या। मुझे खडा तो करीना सीर रख्या होता।

या वाक्यांचा मराठी अर्थ पहा, 'तुम्ही पाहीले, तुमच्या वडिलांनी पाहीले, बादशाहने सुद्धा पाहीले की मी कशाप्रकारचा मनुष्य आहे. असे असूनही मला मुद्दाम इतका वेळ उभे करण्यात आले. मी तुमची मनसब टाकून देतो. मला उभे करायचे होते तर रीतसर व्यवस्थितपणे आणि योग्य पद्धतीने करायचे होते.' यापुढे औरंगजेबाला पाठ दाखवून दरबारातून निघून जाणाऱ्या शिवाजी महाराजांना रामसिंगाने अडवण्याचा प्रयत्न केला. त्याच्या अडवण्याला विरोध करत शिवाजी महाराज उद्गारले,

म्हारो मरण आयो। यो तो तुम मुझे मारोगे या मै अपघात कर मरोंगा। मेरा सिर काटकर ले जावो तो ले जावो, मैं पातशाहजी की हुजूरी नहीं चलता। तरीही रामसिंगाने शिवाजी महाराजांची समजूत काढणे सोडले नाही. त्यात औरंगजेबाने मुल्तफतखान, अकिलखान आणि मुखलीसखानास आज्ञा केली, 'शिवाजीला मानाची वस्त्रे देऊन दरबारात घेऊन या'. पण, त्यावर शिवाजी महाराजांनी औरंगजेबाला जे प्रत्युत्तर दिले, त्याने मुघलांच्या बाबरपासून निर्माण झालेल्या गर्वाचा डोलाराच कोसळला. शिवाजी महाराज म्हणाले,

*'मैं सरोपाव न लौ। मुझे पातशाह जसवंतसिंगसों तलो खडा गौर करीने खडा करो। सो मै एसा आदमी हो जू मुझे असौ गौर करीने खडा करो। मैं पातशाहजी का मनसब नहीं लेता। चाकर नहीं रहता। मुझे माऱ्योचाहो तो मारो। कैद मे किया चाहो कैद करो। सरोपाव न पहरौ।'* [११३]

– मला मारायचंय तर मारा, कैद करायचंय तर कैद करा पण मी बादशाहने दिलेली खिलतीची वस्त्रे स्वीकारणार नाही. मी बादशाहची चाकरी करणार नाही.

केवढे तेजस्वी उद्गार, तेही खुद्द औरंगजेबाच्या दरबारात! मुघलांच्या दरबाराचे रितीरिवाज कमालीचे कडक होते. एकदा बादशाहने दरबारात प्रवेश केला, की समोर असलेल्या सरदारांनी आपापल्या नजरा जमिनीकडे वळवायच्या. उभ्या असलेल्या जागेवर साधी हालचाल करण्याचीसुद्धा परवानगी नव्हती, दरबारातून निघून जाण ही तर दूरची गोष्ट. बादशाहला सजदा करावा लागत असे. त्याची 'चाहर तस्लीम' आणि 'जमीनबोसी' (जमिनीचे चुंबन घेणे) कदमबोसी करावी लागत असे. काही बोलायचे असेल तर आधी बादशाहची परवानगी घ्यायची. त्याने परवानगी दिलीच

---

*११३ छत्रपती नि त्यांची प्रभावळ*

तर तोंडासमोर रुमाल धरून एकदम हळू आवाजात बोलायचे. छोटीशी चूक झाली, दरबाराचे रीतीरिवाज पाळले गेले नाहीत तर त्याची नोंद घेण्यास माणसे ठेवलेली असत. जागेवर त्या व्यक्तीस शिक्षा मिळत असे. अशा या मुघलांच्या दरबारात त्यांच्या सर्वांत शक्तिशाली बादशाहच्या, औरंगजेबाच्या पन्नासाव्या वाढदिवसाला 'मै पातशाहजी की हुजुरी नहीं चलता।' अशी गर्जना करत त्याला पाठ दाखवून शिवछत्रपती दरबारातून बाहेर पडले. हा केवळ औरंगजेबाचा अपमान नव्हता, तर काबुलपासून बंगालपावेतो आणि काश्मीर ते दख्खनपावेतो पसरलेल्या अवाढव्य मुघल साम्राज्याला दिलेला जबरदस्त तडाखा होता.

यानंतर शिवाजी महाराजांना औरंगजेबाने कडेकोट पहाऱ्यात नजरकैदेत टाकले. पुढच्या तीन-चार महिन्यांत शिवाजी महाराजांचा संवाद अनेक वेळेस परकालदासने नोंदवून ठेवलेला आहे. या राजस्थानी पत्रांमधून छत्रपती शिवाजी महाराजांनी औरंगजेबाच्या दरबारात कोणते शौर्य गाजवले होते याची नेमकी माहिती मिळते. कारण, दरबारात घडलेल्या आणि त्यानंतर घडलेल्या एकूणएक महत्त्वाच्या घटनांचे सविस्तर वर्णन या सर्व पत्रांमध्ये आहे. डॉ. रघुबीर सिंग आणि प्रा. यदुनाथ सरकार यांच्या कष्टामुळे हा इतिहासातील महत्वाचा पुरावा उजेडात आला आणि त्यामधून शिवाजी महाराजांच्या आग्रा भेटीवर अधिक प्रकाश पडला. शिवाजी महाराजांनी स्वबळावर आणि बुद्धीचातुर्याने औरंगजेबाच्या नजरकैदेतून स्वतःची सुटका करून घेतली. १७ ऑगस्ट १६६६ रोजी शिवाजी महाराज आग्र्याहून निसटले, पण आज एवढ्या वर्षांनंतर सुद्धा शिवाजी महाराजांनी सुटकेसाठी कोणते उपाय योजले होते याविषयी कोणतेही ठोस विधान करता येत नाही. १८ ऑगस्ट रोजी लिहिलेल्या पत्रात परकालदास म्हणतो,

'सवाराही सेवाजी अठास्यो भागो.' या एका वाक्याने मुघल साम्राज्य मुळापासून उखडायला सुरुवात झाली. या घटनेनंतर शिवाजी महाराजांविषयी अनेक अफवांनी मुघलांच्या साम्राज्यात जोर धरला. शिवाजी महाराज दहा-पंधरा फूट उंच उडी मारू शकतात, ते कुठूनही गायब होऊन कुठूनही प्रकट होऊ शकतात अशी चर्चा सर्वसामान्य लोकांमध्ये रोज होऊ लागली. या अफवांच्या कचाट्यातून खुद्द औरंगजेब सुद्धा सुटू शकला नाही. मशिदीत नमाज पडायला जात असताना अभूतपूर्व सैन्य घेऊन तो निघत असे. मशिदीच्या प्रत्येक पायरीवर एकेक सैनिक संरक्षणासाठी उभा करी. शिवाजी महाराज निसटून गेल्यानंतर, १८ तारखेच्या रात्री खुद्द औरंगजेब प्रचंड दहशतीखाली वावरत होता. तो एवढा घाबरला होता, की त्याला झोप आली नाही.

स्वतःच्या संरक्षणासाठी शयनकक्षाच्या आत आणि बाहेर त्याने चिलखतधारी सशस्त्र अंगरक्षक नेमले होते. कवी भूषण जेव्हा शिवाजी महाराजांच्या आश्रयास आला तेव्हा या घटनेचे वर्णन करताना त्याने या सर्व अफवांचासुद्धा उल्लेख केला आहे. तो म्हणतो,

**चारि चारि चौकी जहाँ चकताकी चहूं ओर**
**सांझ अरु भोर लगि रही जियलेवा की।**
**कांधे धरि कावर चल्यौ, जब चाव सेंती एक**
**लिये जात एक जात चले देवा की।**
**भेष को उतारि डरि डंमर निवारि डारयौ**
**धरयौ भेष और जब चल्यौ साथ मेवा की।**
**पौन हौ कि पंछी हौ, कि गुटकाकि गौन हो**
**कि देखो कौन भांती गयौ करामात सिवाकी।।**

चुगताई वंशाच्या औरंगजेबाचे जीवघेणे कडेकोट पहारे चारही बाजूंनी असताना शिवराय वेष बदलून, खांद्यावर कावड ठेवून मिठाईच्या पेटाऱ्याबरोबर निघून गेले. ते पक्षी बनून उडून गेले, की ते हवेत विरून गेले? की गुटका (जादुई चूर्ण) खाऊन गायब झाले? इतक्या प्रचंड पहाऱ्यातून ते निसटलेच कसे, या गोष्टीचे सगळीकडे आश्चर्य व्यक्त केले जात आहे. शिवाजी महाराजांच्या या बुद्धीचातुर्याने भले भले स्तिमित झाले आहेत.

भलेही या पत्रातील शिवाजी महाराजांच्या उच्चारलेल्या उद्गारांवर राजस्थानी बोलीचा प्रभाव जाणवत असला तरीही परकालदास याने त्या पत्रांचे लिखाण केले आहे हे विसरून चालणार नाही. बोलण्याची लकब, त्यामागील आशय शिवाजी महाराजांच्या बोलण्याच्या पद्धतीचे दर्शन घडवतेच, पण परकालदासच्या लिखाणामुळे शिवाजी महाराजांच्या स्वाभिमानी आणि बाणेदार वृत्तीची झलक आपल्याला सहजपणे अनुभवायला मिळते. या गरूडभरारीचे पडसाद साऱ्या भारतभर उमटले. आसामचा वीर योद्धा लचित बरफुकन आणि कूचबिहारच्या राजामध्ये जो पत्रव्यवहार झाला, त्यामध्ये औरंगजेबाच्या कैदेतून जिवंत निसटून जाणारे शिवाजी राजे हे महानायक झाले आहेत असे गौरवोद्गार वाचायला मिळतात. याच महान प्रेरणेतून अहोम सैन्याला रामसिंगाविरोधात लढण्याची प्रेरणा मिळाली. या घटनेचा प्रचंड परिणाम साऱ्या उत्तर भारतावर झाला होता. शिवाजी महाराजांपासून प्रेरणा घेऊन आणखी एका राजाने औरंगजेबाविरोधात दंड थोपाटले. त्याला खुद्द छत्रपती शिवाजी महाराजांनी

प्रेरणा दिली होती. त्याचे नाव वीर छत्रसाल बुंदेला. शिवाजी महाराजांच्या सैन्यात सामील होण्यासाठी छत्रसाल महाराष्ट्रात पळून आला होता (इसवी सन १६६७. तेव्हा छत्रसालचे वय १८-१९ वर्षांचे असेल). पण त्या महान योद्ध्याला छत्रपती शिवरायांनी आपल्या फौजेत सामील करून न घेता स्वतंत्र राज्य प्रस्थापित करण्याची प्रेरणा दिली. त्यासाठी लागेल त्या स्वरूपाची मदत करण्याचे वचनसुद्धा महाराजांनी दिले. एवढेच नव्हे, तर आपल्याकडे असणारी एक तलवार त्यांनी छत्रसालाला भेट म्हणून दिली. याच प्रेरणेतून छत्रसालने मुघलांविरोधात मोठा लढा उभारला. पुढे जेव्हा त्याच्या राज्यावर शत्रूचे परचक्र चालून आले तेव्हा महाराष्ट्रावर शिवरायांचे नातू शंभूपुत्र थोरले शाहू छत्रपती अधिराज्य गाजवत होते. शिवाजी महाराजांनी दिलेल्या वचनाची आठवण करून देत थोरल्या शाहुंकडे छत्रसालने मदत मागितली आणि बाजीराव पेशवे, पिलाजीराव जाधव यांच्या रूपात बुंदेलखंडात छत्रपतींनी मदत पोहचवलीसुद्धा. आजही छत्रसाल बुंदेलाच्या समाधीवर 'शिवाजी पीछे हुआ बुंदेला बलवान, प्राणनाथ का शिष्य यह छत्रसाल महान' अशा आशयाचे कवन कोरलेले दिसून येते. छत्रसाल बुंदेलाला शिवाजी महाराजांनी नेमक्या कोणत्या शब्दांत स्वाभिमानाचा मार्ग दाखवला, याविषयी 'छत्र प्रकाश' या समकालीन ग्रंथात सविस्तरपणे वाचायला मिळते. पुढील उतारा हा शिवाजी महाराजांच्या एकूणच संभाषणाचा आशय असावा. शिवाजी महाराज छत्रसालला म्हणाले,

'हे पराक्रमी राजन, तू आपल्या शत्रूचा नाश कर आणि विजय संपादन कर. आपल्या देशावर अधिकार मिळवून तेथे आपले राज्य स्थापन कर. बादशाहच्या सैन्याची पर्वा करू नकोस. कपटी तुर्कांवर विश्वास ठेवू नकोस. मोगलांचा नाश कर. मोगल तुझ्यावर आक्रमण करतील तर मी तुला सहाय्य करीन. तुला स्वतंत्र ठेवण्याचे मी वचन देतो. तू सत्वर आपल्या देशात परत जा. सैन्य तयार कर आणि शत्रूला बुंदेलखंडातून हाकलून लाव. सदैव आपल्या हातात नागवी तलवार बाळगून युद्धासाठी सज्ज रहा. परमेश्वर तुला जरूर यश मिळवून देईल.'[११४]

राजस्थानी पत्रांबरोबरच इंग्रज, डच, पोर्तुगीज पत्रांचासुद्धा इथे विचार करणे महत्त्वाचे आहे. कित्येक परकीय व्यक्तींना शिवाजी महाराजांसोबत प्रत्यक्ष भेटण्याचा-बोलण्याचा योग आला. सर्व भेटींमध्ये घडलेल्या गोष्टी त्यांनी त्यांच्या मातृभाषेत अनुवादित करून ठेवल्या आहेत. यामधून शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाचा

---

*११४ विस्तारभयास्तव सर्वच उतारा येथे देणे उचित ठरणार नाही. परंतू, छत्रसालला दिलेला*

मागोवा आपण घेऊ शकतो काय, हे पाहणे मोठे उद्बोधक ठरणारे आहे. निकोलाओ मनूचीसारख्या परकीय प्रवाशाने शिवाजी महाराजांच्या भेटीचे केलेले सविस्तर वर्णन मागील प्रकरणात आपण पाहिलेच आहे. यातून शिवाजी महाराजांच्या चौकस बुद्धीचे दर्शन होते. महाराष्ट्रातल्या सह्याद्रीत वावरणाऱ्या शिवाजीराजांना जगात काय चालले आहे, हे जाणून घेण्याची उत्सुकता पाहून मनूचीसुद्धा चाट पडला होता. इंग्रजांचा तर शिवाजी महाराजांना भेटण्याचा भरपूर वेळेस योग आला. राज्याभिषेकाआधी मुंबईकर इंग्रज आणि शिवाजी महाराजांमध्ये झालेल्या भेटीचे सविस्तर वर्णन वाचायला मिळते. मे १६७३ साली इंग्रजांचा वकील थॉमस निकोल्स हा शिवाजी महाराजांसोबत व्यापारी सवलतींवर चर्चा करण्यासाठी रायगडावर आला, यावेळेस शिवाजी महाराज आणि निकोल्स यांमध्ये झालेली चर्चा अभ्यासण्यासाठी फार सुंदर आहे. त्याने लिहून ठेवलेल्या दैनंदिनीमध्ये या प्रसंगाचे सविस्तर वर्णन आहे. निकोल्स रायगडावर शिवाजी महाराजांची वाट पाहत बैठकीच्या खोलीत बसला होता. शिवाजी महाराज येताच तो उठला. महाराजांनी अतिशय प्रेमपूर्वक त्याचा हात धरून त्याला त्याची बसण्याची जागा दाखवली. शिवाजी महाराजांच्या बैठकीच्या डाव्या बाजूला निकोल्स बसला. शिवाजी महाराजांनी त्यास येण्याचे प्रयोजन विचारल्यावर तो म्हणाला,

राजापूरच्या वखारीचा प्रश्न आपल्या मैत्रीपूर्ण वातावरणात निवळेल, असे चित्र निर्माण झाले होते. त्यासाठी प्रेसिडेंटकडून सर्व तयारी सुरू होती. पण तुमच्या काही माणसांनी हुबळीची वखार लुटल्याचे समजले. त्यामुळे आपल्या राज्यात वखारी करण्याचा निर्णय प्रेसिडेंटने तूर्तास बाजूला टाकला आहे. हुबळीच्या वखारीत जे घडले त्यास आपली संमती आहे काय व ते आपल्याच हुकमावरून घडले आहे काय, हे जाणून घेण्यासाठी त्यांनी मला इथे पाठवले आहे.' यावर शिवाजी महाराजांनी उत्तर दिले,

'इंग्रजांच्या वखारींचे नुकसान व्हावे अशी आज्ञा मी कोणालाच दिलेली नाही. इंग्रजाबद्दल माझे मत नेहमीच अनुकूल व चांगले राहिले आहे.' त्यावर निकोलस म्हणाला,

'आपण हे स्पष्टीकरण दिले. आमचे नुकसान झाले असले तरीही आम्ही आपल्याला

---

*स्वराज्यस्थापनेचा संदेश अतिशय थोडक्यात आणि जितके महत्वाचे वाटेल तितक्या ओळींचे प्रयोजन प्रस्तुत उताऱ्यात केले आहे. यावरून आपण शिवाजी महाराजांच्या भूमिकेचा योग्य तो अंदाज बांधू शकतो. सदर घटनेचे सविस्तर वर्णन इतिहास संशोधक वा. सी. बेंद्रे यांच्या 'छत्रपती शिवाजी महाराज' या ग्रंथात आले आहे.*

उत्तम स्नेही समजतो. आमचे जे काही लुटले गेले, त्याची मित्र म्हणून आपण भरपाई कराल, अशी अपेक्षा करतो.' याला शिवाजी महाराजांनी दिलेले उत्तर किचकट राजकीय विषयांना कशा प्रकारे सांभाळून घ्यावे, याचेच उदाहरण आहे. शिवाजी महाराज म्हणतात,

'माझी माणसे अद्यापही घटनास्थळी आहेत. या प्रकरणाविषयी अद्याप मला कुठल्याही प्रकारचे पत्र आलेले नाही. ती माणसे कोण होती, कुणाच्या अधिकाराखाली होती आणि कोणत्या सामानाची लूट झाली, याबाबतचे तपशील मला समजणे आवश्यक आहे. याशिवाय तुमच्या मागण्यांना दुसरे कोणतेही उत्तर मी देऊ शकत नाही.'

इंग्रजांनी शिवाजी महाराजांना शब्दात पकडण्याचा प्रयत्न केला. परंतु अत्यंत हजरजबाबी शिवरायांनी इंग्रजांचे सर्व मनसुबे उधळून लावले. हुबळीच्या लुटीची जबाबदारी घेतली तर नाहीच, उलट इंग्रजांच्या नुकसानभरपाईचे स्वप्न सुद्धा पूर्णत्वास जाऊ दिले नाही. राजापूरच्या वखारीचा प्रश्न या भेटीमध्ये निकोलस निकालात काढता आला नाही. राज्याभिषेकाची धावपळ सुरूच होती. तेव्हा, शिवाजी महाराजांना राज्याभिषेक प्रसंगी शुभेच्छा द्याव्यात आणि आपल्याला हव्या त्या मागण्या पदरात पाडून घेता याव्यात, म्हणून इंग्रज वखारीतून हेन्री ओक्झेंडनची रवानगी करण्यात आली. हेन्रीच्या मध्यस्थीमुळे इंग्रजांच्या पदरात झुकते माप पडले. 'तुम्ही माझ्या राज्यात निर्धास्तपणे व्यापार करू शकता. माझ्याकडून तुम्हाला कोणताच उपमर्द होणार नाही, असे वचन शिवाजी महाराजांनी इंग्रजांना देऊ केले. राज्याभिषेकाच्या वर्षभरानंतर, २३ मार्च १६७५ रोजी शिवाजी महाराजांची हेन्री ओक्झेंडनसोबत राजापूरच्या वखारीजवळ पुन्हा एकदा भेट झाली. शिवाजी महाराज येईपर्यंत हेन्री आणि त्याचे साथीदार एका झऱ्याच्या किनारी, झाडाखाली थांबले. त्यांच्या समोर आल्यावर शिवाजी महाराजांनी आपली पालखी थांबवली आणि हेन्रीला जवळ बोलावून घेतले. त्याच्या डोक्यावर असणाऱ्या टोपीच्या बटा शिवाजी महाराजांनी स्वतःच्या हातात घेऊन बराच वेळ करमणूक केली. सोबत बरीच चर्चा झाली, अनेक प्रश्न महाराजांनी विचारले. यासोबतच, हेन्रीस व्यापारी सवलतींसाठी आणखी काही मागण्या मान्य करून हव्या होत्या, त्यासाठीसुद्धा संपूर्ण समाधान होईल, सर्व मागण्या पूर्ण होतील, अशी शिवाजी महाराजांनी ग्वाही दिली.

पण पुढे महिनाभरातच राजापूरची वखार लुटली गेली. त्यावेळेस सॅम्युअल ऑस्टीन शिवाजी महाराजांची भेट घेण्यासाठी रायगडावर गेला. शिवाजी महाराजांनी मात्र

'याविषयी मला काहीच कल्पना नाही. चौकशी झाल्यावर या प्रकरणाचा निकाल लागेल.' असे सांगून ऑस्टीनची पाठवणी केली. यावेळेस ऑस्टीनने एक गोष्ट नोंदवून ठेवली. तो संपूर्ण हकीकत शिवाजी महाराजांना सांगत असताना त्यांचा चेहरा तसेच रूंद पसरलेले कपाळ अतिशय निर्विकार होते. त्यावर कुठूनही कसल्याही प्रकारच्या भावनेचा लवलेशही डोकावत नव्हता. त्यांची भेट झाल्याच्या तीन महिन्यांनी म्हणजेच १५ सप्टेंबर १६७५ रोजी अतिशय मोजक्या शब्दांत शिवाजी महाराजांनी ऑस्टीनला समज दिली,

'तुमच्याकडून मिळालेल्या वस्तूंचा तपशील माझ्या सेनापतीकडून मला मिळाला नाही. तुमच्या काही ताटांची माहिती सोडल्यास इतर गोष्टींविषयी काहीच तपशील मिळत नाही. तुमच्या मागण्या पूर्णपणे अमान्य आणि अयोग्य आहेत. वखारीचे संरक्षण होईल अशा साध्या भिंतीही तुम्ही उभारू शकला नाहीत. माझ्या सेनापतीची आज्ञा नसताना कोण्या टोळीवाल्यांनी अथवा गुंडांनी हे कृत्य केले असेल तर त्याची भरपाई मी देण्याचे काहीच कारण नाही.' यावर इंग्रजांचाही नाईलाज झाला. शिवाजी महाराजांकडून कोणत्याही प्रकारे त्यांना भरपाई मिळाली नाही. सर्वप्रकारे केलेले उपाय वाया गेले. शिवाजी महाराजांसमोर इंग्रजांची मुत्सद्देगिरी कुचकामी ठरली.

दक्षिणेच्या स्वारीस गेल्यावर पॉन्डिचेरीचा फ्रेंच गव्हर्नर मार्टिन यास दोन वेळेस शिवाजी महाराजांनी कडक शब्दांत दम दिला होता. या कर्नाटक स्वारीने दक्षिणेत प्रचंड राजकीय उलथापालथ झाली. संपूर्ण दख्खन शिवाजी महाराजांच्या आश्रयात समाधान शोधू लागली होती. अशातच पॉन्डिचेरीच्या मार्टिनला त्याच्या वकीलामार्फत शिवाजी महाराजांनी निरोप पाठवला,

'तुम्ही (फ्रेंच) पॉन्डिचेरीमध्ये सुरक्षित राहा. कोणत्याही पक्षाला मिळू नका. आमच्या माणसांना तुम्ही थोडी जरी इजा पोहचवलीत, तर याद राखा. तुमच्यावर येथे काय अगर राजापूरच्या वखारीत काय, कसलीही दयामाया दाखवण्यात येणार नाही.'

शिवाजी महाराजांचा निरोप मार्टिनपर्यंत पोहचल्यावर त्याने अनेक पत्रे लिहून आपला आणखी एक ब्राम्हण वकील महाराजांकडे पाठवला. त्या पत्रांनी शिवाजी महाराजांचे समाधान झाले. तरीही एकही फ्रेंच व्यक्ती महाराजांना भेटण्यास आली नाही, याचे त्यांना आश्चर्य वाटले. त्या ब्राम्हण वकिलाने काहीतरी बोलून वेळ मारून नेली. पण, शिवाजी महाराजांच्या भेटीचा वृत्तांत मार्टिनला पत्राद्वारे कळवताना लिहिले होते, 'जर तुम्हाला पॉन्डिचेरी टिकवायची असेल, तर एखादा मुख्य माणूस

भेटीदाखल वस्तू देऊन पाठवणे आवश्यक आहे.'

या सर्व वर्णनांचा विचार केल्यास शिवाजी महाराजांचे एक स्पष्ट व्यक्तिमत्त्व नजरेसमोर तरळते. आग्र्याच्या दरबारात आपल्या अपमानाला जोरदारपणे विरोध करणारा स्वाभिमानी बाणा आपल्याला दिसतो. मनूचीसोबत बोलत असताना जगाची माहिती घेण्यामागे असलेले कुतूहल आणि उत्सुकता आपल्याला ठळकपणे जाणवते. शहाजी महाराजांची अटक असेल अथवा अफझलखान वध प्रसंग, शिवाजी महाराजांच्या कणखर आणि स्फूर्तिदायी व्यक्तिमत्त्वाची छाप आपल्यावर पडते. राजापूरच्या वखारीबाबत कडक आणि रोखठोक राजकीय भूमिकेमुळे त्यांच्यातील सावधपणा नजरेत भरतो. फ्रेंचांना त्यांच्या चुकांची जाणीव करून देताना तसेच आपल्या लोकांना त्रास होऊ नये, म्हणून भरलेला सज्जड दम त्यांच्या ताकदीचे, सामर्थ्याचे अफाट दर्शन घडवते. एकूणच काय, तर शिवाजी महाराज हे परिपूर्ण व्यक्ती म्हणून सतराव्या शतकात वावरले. या आणि अशा अनेक छोट्या-मोठ्या प्रसंगांतून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक अपरिचित आणि दुर्लक्षित पैलू आपल्याला दिसून येतात आणि शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाची संपूर्ण प्रतिमा तयार होण्यास मदत होते.



## ४

शिवाजी महाराजांच्या सर्व समकालीन चित्रांवर चर्चा करताना एक गोष्ट ठळकपणे नजरेस येते. ती म्हणजे शिवाजी महाराजांचे एकाही मराठी व्यक्तीने काढलेले समकालीन चित्र आज उपलब्ध नाही.[११५] परंतु याचा अर्थ असाही नव्हे, की मराठा साम्राज्यात चित्रकलेला राजाश्रय मिळाला नाही. शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना केली.

एखादे राज्य जेव्हा आर्थिक, सामाजिक तसेच राजकीयदृष्ट्या स्थिरस्थावर असते तेव्हाच त्या राज्यामध्ये कला सर्वांगाने फुलते, कलेला राजाश्रय मिळतो आणि नवनवीन कलात्मक गोष्टींची निर्मिती होऊन त्या राज्याची सांस्कृतिक परंपरा उज्ज्वल होते. पण त्यासाठी सर्वार्थाने स्थैर्य येणे महत्त्वाचे. शिवाजी महाराजांच्या काळात स्वराज्याचे रोपटे फुलले होते. संभाजी महाराज तसेच राजाराम महाराज, ताराराणीसाहेबांचा काळ मोठ्या धामधुमीचा. खासा औरंगजेब सर्व सामर्थ्यानिशी दख्खनेत उतरला होता. तब्बल सत्तावीस वर्षे मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध चालले. काही प्रसंगी तर नेतृत्वाविना मराठमंडळी मुघलांविरोधात लढली. इथल्या मातीतला

---

*११५ सातारा जिल्ह्यातील 'जयराम स्वामींचे वडगाव' हे अतिशय महत्वाचे ऐतिहासिक स्थान. या गावात असणाऱ्या जयराम स्वामींच्या मठावरून गाव ओळखले जाते. जयराम स्वामी शिवकाळातील एक महत्वाचे धार्मिक व्यक्तिमत्व. सतराव्या शतकात रचलेल्या 'अपरोक्षानुभूती' ग्रंथातील एक चित्र आज सर्व अभ्यासकांचे लक्ष वेधून घेत आहे. 'जयराम स्वामी आणि छत्रपती शिवाजी महाराजांचे चित्र' या ग्रंथाच्या तिसऱ्या अध्यायाच्या शेवटी छापलेले होते (चित्र क्र. २७). ग्रंथाचा काळ इसवी सन १६६५ ते ७० च्या दरम्यानचा सांगितला जातो. या चित्राच्या काळाविषयी अनेक अभ्यासकांत मतभेद आहेत. पण जर हे चित्र समकालीन आहे, असे मानले तर या चित्राचे वेगळेपण उठून दिसेल. कारण, हे मराठी माणसाने/चित्रकाराने काढलेले महाराजांचे एकमेव समकालीन आणि रंगीत चित्र ठरेल. सदर ग्रंथाचे लिखाण 'अंबाजी नरसिंह' याने जयराम स्वामींच्या आज्ञेवरून केल्याचे सांगण्यात येते. याच अंबाजी नरसिंह लिखित ज्ञानेश्वरी ग्रंथाची सतराव्या शतकातील एक प्रत आज उपलब्ध आहे.*

स्वाभिमान जागवणाऱ्या छत्रपतींच्या चार पिढ्यांचे ते यश. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर थोरले शाहू छत्रपती महाराष्ट्रात आले. सातारा शहरात त्यांनी आपला राज्याभिषेक करवून घेतला. किल्ल्यावर असणारी मराठ्यांची राजधानी जमिनीवर आणली. इसवी सन १७१७-१८पर्यंत राजधानी सातारा हे शहर संपूर्ण हिंदुस्थानच्या राजकारणाचे केंद्र बनले होते. मराठ्यांचे 'साम्राज्य' स्थिरस्थावर झाले, अन् थोरल्या शाहू छत्रपतींच्या आश्रयाखाली कलेचा विकास होण्यास सुरुवात झाली. यातूनच 'मराठा शैलीतील भित्तिचित्रे' अस्तित्वात आली. सातारा, धोम, वाई, मेणवली, लिंब, साप, माण-खटाव, औंध, पुणे यांसारख्या कित्येक ठिकाणी मराठा शैलीतील मंदिरांची निर्मिती झाली. भलेथोरले वाडे उभा राहिले. वाड्यांच्या भिंतींवर मराठी कलाकारांनी आपल्या कुंचल्याने प्राण ओतले. कित्येक वाड्यांतील, मंदिरांतील भित्तिचित्रे आजही सुस्थितीत आहेत. शाहू छत्रपतींच्या काळात कलाकारांना मिळालेला राजाश्रय पुढे मराठा साम्राज्याच्या अस्तापर्यंत म्हणजेच सन १८१८पर्यंत कायम होता. दक्षिणेत सरफोजीराजेंच्या काळात तंजावर राज्यातसुद्धा मराठा कलेचा विकास झाला होता. एवढ्या सगळ्या गोष्टी, एवढे पुरावे असूनही मध्यंतरीच्या काळात 'मराठा शैली' नावाची शैली चित्रकलेत आहे, हेच बऱ्याच अभ्यासकांना मान्य नव्हते. परंतु, म. श्री. माटे, शिवराममूर्ती, बी. के. आपटे, कमल चव्हाण, एस. बी. देशमुख यांसारख्या अभ्यासकांनी मराठा शैली अस्तित्वात असल्याचे सप्रमाण सिद्ध केले.[११६]

मराठा साम्राज्यात अनेक नावाजलेले चित्रकार होऊन गेले. यांमध्ये शिवराम चितारी, सदाशिव चितारी, माणकोजी, दामू, गंगाराम तांबट, महादू चितारी ही काही महत्त्वाची नावे आहेत. यांनी मराठ्यांच्या इतिहासातील अनेक महत्त्वाच्या व्यक्तींची चित्रे काढली आहेत. या सर्वांमध्ये शिवराम चितारी हा अत्यंत प्रसिद्ध चित्रकार होता. त्याच्या चित्रांची तुलना अनेक समकालीन आणि प्रसिद्ध चित्रकारांशी करण्यात आली आहे. 'पहाडी' चित्रशैलीतील प्रसिद्ध चित्रकार मोलाराम याचा नैसर्गीक भूप्रदेश

---

*११६. कमल चव्हाण यांचा "Maratha Murals' नावाने शोधप्रबंध प्रकाशित आहे. आपटे यांनी लिहिलेले तसेच महाराष्ट्र शासनाने प्रकाशित केलेले "Maratha wall Paintings' नावाने पुस्तक प्रसिद्ध आहे. ज्यामध्ये कित्येक महत्त्वाच्या आणि दुर्मिळ चित्रांचा समावेश आहे. एस. बी. देशमुखांची याच विषयावर दोन पुस्तके डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या प्रकाशन विभागाने प्रकाशित केलेली आहेत. ती आज दुर्मिळ असली तरीही मराठ्यांच्या चित्रकलेवर प्रकाश टाकणारी व दुर्मिळ माहिती देणारी असल्याकारणाने अतिशय महत्वाची आहेत. 'साउथ इंडियन पेंटींग्स' या पुस्तकात सी. शिवराममूर्ती यांनी पान क्र. १५७-५८ वर मराठा शैलीतील दोन चित्रांचे उदाहरण दिलेले आहे. याचबरोबर अनेक मराठी पुस्तकांतूनसुद्धा या चित्रशैलीवर प्रकाश पाडण्याचे काम मागील काही वर्षांपासून सातत्याने सुरू आहे. अलीकडचे उदाहरण घ्यायचे झाल्यास इतिहास अभ्यासक उदय कुलकर्णी सरांच्या 'जेम्स वेल्स' पुस्तकातून गंगाराम तांबट यांच्या प्रसिद्ध चित्रांना परत एकदा उजाळा देण्यात आला आहे.*




चित्र क्र. ३१

रेखाटण्यात हातखंडा होता. मुघल दरबारात काम करणाऱ्या मनोहरचे व्यक्तिचित्रावर प्रभुत्व होते. मध्ययुगीन काळात होऊन गेलेला आणखी एक प्रसिद्ध चित्रकार म्हणजे मन्सूर होय. पक्षी, प्राणी तसेच पाना-फुलांच्या चित्रकलेत त्याने महारथ मिळवली होती. या तिन्ही वेगवेगळ्या प्रकारच्या चित्रशैलींत 'मास्टर' समजल्या जाणाऱ्या तीन चित्रकारांसोबत शिवराम चितारीच्या कलेची तुलना झाली, ही फार मोठी गोष्ट आहे. शिवराम चितारीने काढलेली काही प्रसिद्ध चित्रे आपण पाहणारच आहोत. उत्तर मराठा काळातील अजून एक प्रसिद्ध चित्रकार म्हणजे गंगाराम तांबट. सवाई माधवरावांच्या काळात आणि नंतरसुद्धा त्याने अनेक चित्रे काढली. शनिवारवाड्यातील 'गणेश दरबाराचे' जेम्स वेल्स आणि गंगाराम तांबटने काढलेले चित्र तर प्रसिद्धच आहे. याचबरोबर पेशव्यांच्या नगारखान्यात ठेवलेल्या मंगलवाद्यांचे, काही महत्त्वाच्या मराठा सरदारांचे चित्र, वेरूळच्या लेण्यांमधील काही शिल्पांचे चित्र, तसेच वाघ, उंट यांसारख्या अनेक प्राण्यांचे चित्र त्याने काढले होते. दामू चितारी यांनी काढलेली काही चित्रे आज औंधच्या संग्रहालयात आहेत. नाना फडणवीस हे सुद्धा अतिशय प्रसिद्ध चित्रसंग्राहक होते. त्यांच्या वैयक्तिक संग्रहात असणारी अनेक चित्रे आज बडोद्याच्या संग्रहालयात असल्याचे सांगण्यात येते. या कलाकारांसोबतच आणखीन काही नावे मराठ्यांच्या कागदपत्रांतून समोर येतात. जसे की निधमल, मुहम्मद सालेह, दलचंद, उस्ताद शामदास, गुलाम अली, नरसप्पा चितारी, भोजराज मिनगर, रामजी दास, साहेबराम, शामलाल चितारी, अली सिराजी, हसन खान, मिर्झा अकबरी[११७] इत्यादी नावे सांगता येतील. मराठा शैलीतील चित्रांवर पांढऱ्या, पिवळ्या, काळ्या, निळ्या आणि लाल रंगांचा सर्रास वापर झाल्याचे आढळून येते. यातील काही प्रसिद्ध चित्रांचा मागोवा आपण या लेखात घेणार आहोत, भलेही या पुस्तकाचा चर्चेचा मुख्य विषय हा शिवाजी महाराजांची चित्रे असला तरी. शिवाजी महाराज पर्यायाने मराठ्यांच्या इतिहासाशी निगडित अत्यंत महत्त्वाच्या दोन व्यक्तींची चित्रे आणि त्यामागील कहाणी अतिशय रोचक असल्यामुळे इथे सांगणे भाग आहे. त्या दोन महत्त्वाच्या व्यक्ती म्हणजे स्वराज्याचे दुसरे छत्रपती संभाजी महाराज आणि संभाजी महाराज पुत्र थोरले शाहू छत्रपती.

संभाजी महाराजांची सहा-सात चित्रे आज उपलब्ध आहेत, जी अस्सल समकालीन आणि वास्तवाच्या जवळपास जाणारी आहेत असे आपण सांगू शकतो. त्यापैकी एक चित्र ब्रिटिश म्युझियम, लंडन येथे आहे. दोन चित्रे डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या इतिहास विभाग संग्रहालयात आहेत. एक चित्र

---

११७ *Maratha Painting*

'रिक्सम्युझियम'मध्ये तर दुसरे भारतातच एका व्यक्तीच्या खासगी संग्रहात आहे. सध्या तरी एवढ्या चित्रांचा मागोवा ऐतिहासिक निकषांवर घेता येतो. ब्रिटिश म्युझियममध्ये असलेल्या चित्राच्या इतिहासाचा मागोवा फारसा कुणी घेतल्याचे दिसून येत नाही. म्युझियमच्या 'एशिया आणि आफ्रिका' विभागात एक भारतीय चित्रांचा अल्बम संग्रहित करून ठेवला आहे, ज्यात केवळ आठ चित्रांचा समावेश आहे. 'रसिकप्रिया' या केशवदासनामक कवीच्या ग्रंथातील पाच चित्रांचा यात समावेश आहे व इतर दोन चित्रे मराठ्यांच्या इतिहासाशी निगडित आहेत. त्यापैकी एक सवाई माधवराव पेशवे यांचे आणि दुसरे छत्रपती संभाजी महाराजांचे (चित्र क्र. २८). पिवळा-लाल-पांढऱ्या रंगात रंगवलेले आणि सोन्याच्या कलाकुसरीने नटलेले हे चित्र १४६×२२० मिमी. (१७ सेंमी उंच आणि ११ सेंमी रुंद) एवढ्या आकाराचे आहे. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात म्हणजेच इसवी सन १६९०च्या आसपास कधीतरी हे चित्र काढल्याचे समजते. कागदाच्या मागील बाजूस केलेल्या नोंदीवरून हे चित्र सन १८५६मध्ये F. S. Haden Esq. यांनी ब्रिटिश म्युझियमला भेट दिल्याची नोंद आहे. सन १८५५-५६ मध्ये जेव्हा हा चित्रांचा सेट लंडनला नेण्यात आला तेव्हा त्याची पुनर्बांधणी झाली. त्यातील चित्रांना वेगवेगळ्या कागदांवर चिकटवण्यात आले, त्यामुळे या चित्रांचे भारताशी संबंध दर्शवणारे सर्व महत्त्वाचे पुरावे संपुष्टात आले. हे चित्र सर्वांत प्रथम जेरेमी लोस्टी यांनी समोर आणले.

या अल्बमच्या सुरुवातीचेच चित्र छत्रपती संभाजी महाराजांचे आहे. यात छत्रपती संभाजी महाराज हे वीरासनात बसलेले असून त्यांनी उजव्या हातात फूल धरलेले आहे. डोक्यावर संभाजी महाराजांचे वैशिष्ट्यपूर्ण पांढऱ्या रंगाचे पागोटे आहे. त्यात एक मोत्यांचा तुरा खोवलेला असून चेहऱ्याच्या मागील बाजूस प्रभावळ दाखवलेली आहे. अंगात पिवळा आणि पांढरा रंग असलेला अंगरखा आहे. गळ्यात मोत्यांच्या दोनपदरी माळेसोबतच एक सोन्याची माळ आपल्याला दिसून येते. उजव्या हाताच्या करंगळीमध्ये एक आणि डाव्या हाताच्या तर्जनीमध्ये एक, अशा दोन अंगठ्या संभाजी महाराजांनी घातल्याचे चित्रित केले आहे. लोड-तक्क्यांची बैठक दाखवलेली असून पाना-फुलांची नक्षी केलेला गालिचा खाली पसरलेला आहे. या चित्रात संभाजी महाराजांचा चेहरा अतिशय करारी भासतो. टोकदार मिशा आणि दाढीसोबतच छत्रपती शिवाजी महाराजांप्रमाणेच संभाजी महाराजांचेही मोठे डोळे आणि बाकदार नाक या चित्रात दाखवलेले आहे. चित्रकाराने संभाजी महाराजांच्या कपाळी नामगंध रेखाटलेला आहे जो शिवाजी महाराजांच्या एकाही समकालीन चित्रात दिसून येत नाही. मराठ्यांच्या दुसऱ्या छत्रपतींचे हे चित्र अतिशय सुंदर आणि आकर्षित करणारे आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या 'इतिहास विभाग' संग्रहालयात

असणारी दोन्ही चित्रे अठराव्या शतकाच्या मध्यान्हात कधीतरी तयार करून घेतल्याचे समजते. हा तोच काळ, जेव्हा मराठ्यांचा जरीपटका हिंदुस्थानावर अखंड तळपत होता आणि त्याला कारणीभूत होते थोरले शाहू छत्रपती. अठराव्या शतकाच्या पहिल्या पन्नास वर्षांत थोरल्या शाहू छत्रपतींनी अर्ध्या भारतावर आपले वर्चस्व प्रस्थापित केले. होते. उत्तरेसोबतच भारताची पूर्व किनारपट्टी आणि दक्षिणेत तामिळनाडूपर्यंत थोरल्या शाहू छत्रपतींचे साम्राज्य पसरले होते. एक प्रकारचे स्थैर्य मराठा साम्राज्याला प्राप्त झाले. याच काळात अनेक मोठ्या मंदिरांची, गढ्यांची निर्मिती झाली. मराठ्यांच्या कलेचा विकास होण्यास सुरुवात झाली. थोरल्या शाहू छत्रपतींचे बालपण जरी औरंगजेबाच्या छावणीत, त्याच्या नजरकैदेत गेले असले तरीही त्यांच्यावर महाराष्ट्राच्या मातीचे आणि भोसले कुळाचे संस्कार करण्यात महाराणी येसूबाईसाहेब कुठेही कमी पडल्या नाहीत. थोरल्या शाहू छत्रपतींना आपल्या महाबली पित्याचा, संभाजी महाराजांचा अतिशय कमी सहवास लाभला, परंतु  शाहू छत्रपतींनी संभाजी महाराजांच्या तसबिरी तयार करवून घेतल्या होत्या. यापैकी पहिले चित्र अतिशय प्रसिद्ध आणि सर्रास वापरात असल्याचे दिसून येते. त्यांची माहिती घेणे क्रमप्राप्त वाटते.

संभाजी महाराजांच्या या दोन चित्रांपैकी एका चित्रात संभाजी महाराज उभे असलेले दाखवले आहेत, तर दुसऱ्या चित्रात संभाजी महाराज आणि त्यांच्या मांडीवर बाल शाहू दाखवले आहेत. यातील पहिल्या चित्राचा आकार २८×४० सेंमी. (आयताकृती) एवढा आहे (चित्र क्र. २९). भलेही कागदावर कुठेही चित्र काढणाऱ्या चित्रकाराचे नाव नसले तरीही कागदाच्या मागील बाजूस 'संभाजी महाराजांची तसबीर' असा मजकूर लिहिलेला आढळतो. पण चित्राच्या एकूणच कलाकृती आणि सजावटीकडे पाहता हे चित्र नक्कीच शिवराम चितारी याने काढले असावे, अशी शक्यता अभ्यासकांकडून वर्तवण्यात येते.[११८] हे दुर्मिळ चित्र आहे. चित्राची मागील बाजू फिकट हिरव्या रंगात रंगवलेली दिसून येते. संभाजी महाराजांचा चेहरा उजळ दाखवला आहे. त्यांचा अंगरखा गुलाबी रंगाचा असून तो पारदर्शक आहे. डोक्यावर धारण केलेली पगडी विशिष्ट पद्धतीची असून देशमुखांच्या मते ती अहमदनगर पद्धतीची आहे.[११९] अंगाभोवती घेतलेला शेला लाल रंगाचा असून कमरेभोवती गुंडाळलेल्या शेल्याचा आणि पायात घातलेल्या चोळण्याचा रंग जांभळा आणि किनखाबी हिरवा असल्याचे दिसून येतो. या कपड्यांचे काठ पिवळ्या रंगात रंगवले आहेत. संपूर्ण कपड्यावर फुलांची नक्षी दिसते. विशेष म्हणजे, शिवाजी महाराजांच्या अंगावर असणाऱ्या कपड्यांवरसुद्धा फुलांचीच नक्षी असल्याचे आपण मागील प्रकरणात पाहिले आहे.

११८. *Maratha Painting; The art of Chhatrapatis and Peshwas.*
११९. *कित्ता*

संभाजी महाराजांची भरगच्च पिळदार शरीरयष्टी, व्यवस्थित ठेवलेल्या दाढी-मिशा, कल्ले या चित्रातून ठळकपणे नजरेत भरतात. महाराजांनी आपल्या हातात दांडपट्टा धरलेला असून त्यांच्यासोबत तलवार आणि कट्यारसुद्धा दिसून येते. या चित्रातील आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे संभाजी महाराजांनी डाव्या हातात धरलेले फूल. हातात फूल धरण्याची पद्धत मुघलांच्या चित्रांमधून आपल्याला दिसून येते. हे चित्र पूर्णपणे मराठा शैलीतले असले तरी तेव्हाच्या चित्रकलेवरील मुघल शैलीचा प्रभाव सहजपणे आपल्या ध्यानात येतो.

इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी काही काळापूर्वी 'List of paintings in Chhatrapati's Palace at Satara' या शीर्षकाखाली एक लेख लिहिला होता. प्रतापसिंह महाराजांच्या जामदारखान्यात असणाऱ्या लहान-मोठ्या अडीचशे चित्रांच्या पाच याद्या राजवाड्यांनी प्रकाशित केल्या होत्या.[१२०] यातील तिसऱ्या क्रमांकाची यादी अतिशय महत्त्वाच्या नोंदींनी भरलेली होती. यादीत असणाऱ्या ६४ चित्रांपैकी दोन चित्रे संभाजी महाराजांची आहेत, पाच चित्रे थोरल्या शाहू छत्रपतींची आहेत. यासोबतच छत्रपती राजाराम महाराज, थोरले बाजीराव पेशवे, सातारा शहराच्या निर्मितीत महत्त्वपूर्ण योगदान देणारे बसाप्पा खोजे, शाहू छत्रपतींचा लाडका कुत्रा 'खंड्या', थोरल्या शाहू छत्रपतींचे मानसपुत्र फत्तेसिंह बाबा भोसले यांसारख्या ऐतिहासिक व्यक्तींचीसुद्धा चित्रे असल्याची नोंद त्या यादीत आढळून येते. संभाजी महाराजांच्या एका चित्राचे वर्णन 'संभाजी महाराज मांडीवरी शाहू महाराज' असे केलेले आढळते, तर शाहू महाराजांच्या चित्राचे वर्णन 'शाहू महाराज छत्रपती घोड्यावर', 'शाहू महाराज छत्रपती हुक्का ओढताना', 'शाहू महाराज छत्रपती मांडीवरी मुलगी', 'शाहू महाराज तिरंदाजी करिताना, 'शाहू महाराज छत्रपती मांडीवरी दोन मुली' अशा प्रकारे केल्याचे दिसून येते. देशमुख आपल्या पुस्तकात संभाजी महाराजांच्या चित्राचे वर्णन करताना सदर चित्र द. बा. पारसनीस यांच्या संग्रहातून प्राप्त झाल्याचे नमूद करतात. एवढेच नव्हे, तर पारसनीस यांच्या संग्रहातून मिळालेले आणि सध्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर विद्यापीठात असणारी संभाजी महाराज आणि शाहू महाराजांची चित्रे ही कदाचित राजवाड्यांनी प्रकाशित केलेल्या यादीतीलच असावीत; म्हणजेच साताऱ्यातील थोरल्या शाहू महाराजांच्या काळात तयार झालेली असावीत असे त्यांच्या लिखाणातून समजते. तसेच, Mrs. Falkland नावाच्या एका ब्रिटिश महिलेने सन १८५७-५८च्या काळात साताऱ्याला भेट दिली होती. त्या भेटीनंतर साताऱ्याच्या

---

*१२० पेशवे दप्तरातील 'पेशव्यांच्या रोजनिशीतील उतारे' या भागात रागमालेतील ३६ चित्रे 'खाशा पेशव्यांनी' तब्बल २०० रुपयांना विकत घेतल्याचे पत्र वाचायला मिळते. त्यामुळे, अठराव्या शतकात मराठ्यांना चित्रकलेत रस होता, हे समजते.*

एका वाड्यात संभाजी महाराजांच्या आयुष्यात घडलेल्या वेगवेगळ्या प्रसंगांवर तब्बल दोनशे भित्तिचित्रे पाहिल्याची नोंद करून ठेवली आहे.[१२१] सदरची माहिती असेल किंवा राजवाड्यांनी प्रकाशित केलेल्या त्यांच्या यादीतील आणि विद्यापीठात असलेल्या चित्राची सांगड घालण्याचा देशमुखांचा प्रयत्न असेल, किंवा शिवराम चितारी यानेच हे चित्र काढले असावे हा दावा करणारे सूर्या दोशी असतील, किंवा चित्राची शैली असेल, या सर्व निरीक्षणांतून एक गोष्ट मात्र स्पष्ट होते, ती म्हणजे सदर चित्राचा निर्मितीकाळ हा अठराव्या शतकातील आहे. म्हणजेच, थोरल्या शाहू छत्रपतींच्या आज्ञेवरून या चित्राची निर्मिती झाली असावी, असे अनुमान आपण काढू शकतो.

संभाजी महाराजांच्या दुसऱ्या चित्रात महाराज जमिनीवर तक्क्याला टेकून बसलेले दिसून येतात. त्यांच्या मांडीवर बाळ शाहू बसलेले दाखवले आहेत (चित्र क्र. ३०). या चित्राचा आकार १९×२४ सेंमी एवढा असून निर्मितीकाळ अंदाजे अठरावे शतक सांगण्यात येते. राजवाड्यांनी प्रकाशित केलेल्या तसबिरींच्या यादीत या चित्राचा स्पष्ट उल्लेख आढळून येतो. संभाजी महाराजांच्या एका हातात गुलाबांचा एक गुच्छ दिसून येतो. भव्य कपाळ आणि त्यावर स्पष्ट दिसणारा चंदनाचा टिळा, भेदक आणि मोठे डोळे, रेखीव दाढी-मिशा हे संभाजी महाराजांच्या राजेशाही व्यक्तिमत्त्वाची झलक दाखवतात. हे चित्र अनेक प्रकारे वैशिष्ट्यपूर्ण आहे. या चित्रात संभाजी महाराजांच्या कपाळावर असलेला चंदनाचा लेप स्पष्ट दिसून येतो, जो शिवाजी महाराजांच्या एकाही समकालीन चित्रात आपल्याला दिसत नाही. तसेच, संभाजी महाराजांनी धारण केलेले सर्व दागिने सहजपणे ओळखू येतात. गळ्यात मोत्यांची माळ, मोत्यांचे कर्णालंकार, डोक्यावरच्या पगडीत चार मोत्यांच्या माळा, दोन सोन्याच्या अंगठ्या एवढ्या गोष्टी आपण पाहू शकतो. अंगावरील कापड अतिशय उत्तम प्रतीचे असून महाराज तक्क्याला आरामात मागे रेलून बसल्याचे दाखवले आहे. अजून एक वैशिष्ट्य म्हणजे संभाजी महाराजांच्या मागे उभा असणारा चौरीधारक सेवक. ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचे असणारे हे चित्र अत्यंत सुबक आणि देखणे आहे.

अगदी याच पद्धतीचे अजून एक चित्र नेदरलँड येथील रिक्सम्युझियममध्ये आहे (चित्र क्र.३१) ज्याची चर्चा इथे करणे अपरिहार्य वाटते. हे चित्र डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठात असलेल्या चित्रापेक्षा अत्यंत वेगळ्या पद्धतीने रेखाटले आहे. या चित्रातील 'कथित' संभाजी महाराज आणि शाहू महाराज काहीसे वेगळे दिसतात. त्यांच्या अंगावरील पेहराव, तसेच चेहऱ्यावरील दाढी-मिशांची ठेवण चित्रकाराने मुघल पद्धतीने रेखाटली असल्याचे पाहायला मिळते. चित्रात मध्यभागी असणाऱ्या

१२१ *Maratha Painting; Indian Painting*

व्यक्तीच्या मागील बाजूस एक लहान मूल उभे असलेले दाखवले आहे. या दोघांच्याही अंगावर एकसारखेच कपडे दाखवले असून मध्यभागी असणारी व्यक्ती वीरासनात बसलेली आहे. तिने डाव्या बाजूला पकडलेल्या तलवारीची म्यान वेगवेगळ्या रत्नांनी सजलेली आपल्याला दिसून येते. तसेच, त्या व्यक्तीच्या समोर एक तांबूस रंगाचे कपडे परिधान केलेला सेवक हातात आरसा घेऊन बसला आहे. त्या आरशामध्ये सदरील व्यक्तीचे प्रतिबिंब चित्रकाराने अत्यंत खुबीने दाखवले आहे, एकाच चित्रामध्ये एकाच व्यक्तीच्या चेहऱ्याची बाजू दोन प्रकारे आपल्याला पाहायला मिळते, हे या चित्राचे सर्वात मोठे वैशिष्ट्य आहे. 'कथित' संभाजी महाराजांच्या अंगात गडद हिरव्या रंगाचा पेहराव असून पायात लाल-पिवळ्या-हिरव्या रंगाच्या रेषांनी तयार केलेली तंग विजार आहे. कमरेला लाल रंगाचा शेला गुंडाळलेला असून, त्यात कट्यार खोवलेली आहे. डोक्यावरील पगडी पूर्णपणे मुसलमानी पद्धतीची दाखवलेली आहे. सदर व्यक्ती बागेच्या झरोक्यात बसल्याचे चित्रण चित्रकाराने केले आहे. लोड-तक्क्यांची बैठक, हवा घालण्यासाठी मागे उभा असलेला चामरधारी सेवक, बैठकीसमोर एक कारंजे आणि पाण्यात पोहणारी काही बदके दाखवली आहेत. बागेत अनेक प्रकारची झाडे सुद्धा चित्रकाराने अत्यंत खुबीने दाखवली आहेत. या चित्राचा काळ इसवी सन १६९९च्या आसपास सांगण्यात येतो. रिक्सम्युझियम येथील नोंदीनुसार सदरचे चित्र दख्खनेत (गोवळकोंडा) काढण्यात आले असून या चित्राची नोंद 'मराठा राजा शंभूजी'(?) अशी करून ठेवली आहे. म्युझियम स्वतः हे चित्र संभाजी महाराजांचे आहे याविषयी खात्रीशीर कोणतेही वक्तव्य करत नाही. तसेच, लंडन येथील संभाजी महाराजांच्या चित्रात आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर विद्यापीठात असणाऱ्या चित्रात संभाजी महाराजांच्या कपाळावरील गंधाचे चित्रण, कर्णालंकार इ. गोष्टी दिसतात ज्या प्रामुख्याने मध्ययुगीन हिंदूधर्मीय व्यक्तीच्या अंगावर सर्रास आढळून येत असत. पण सदरच्या चित्रात मात्र राजेशाही थाट वाटावा अशी कोणतीही लक्षणे, उदाहरणार्थ डोक्यावर तुरा, अंगावर मोत्यांच्या माळा इत्यादी दाखवण्यात आलेली नाहीत. संभाजी महाराजांच्या इतमामाला साजेल असे त्या व्यक्तीस दाखवण्यात आले नाही. तसेच, त्या मध्यवर्ती व्यक्तीच्या पुढे-मागे उभ्या असलेल्या व्यक्तीसुद्धा पेहराव तसेच चेहरा-शरीराची ठेवण यावरून मराठे वाटत नाहीत. चित्रावर मुघलांच्या जीवनशैलीचा आणि चित्रशैलीचा प्रचंड प्रभाव दिसून येतो. इतिहासअभ्यासक श्री. मनोज दाणी यांनी काही वर्षांपूर्वी सदरचे चित्र संभाजी महाराजांचे नाही, हे सांगणारा एक लेख प्रकाशित केला होता. त्यामध्ये त्यांनी सदरील चित्र नंदुरबार येथील 'शंभूजी देसाई' याचे असावे, असा अंदाज वर्तवला आहे. कारण सन १७००च्या आसपास शंभूजी देसाई नावाचा एक इसम या भागात होऊन गेला आणि औरंगजेबाच्या अखबारात त्याने मुस्लीम धर्म स्वीकारल्याचे उल्लेख आहेत.

याचबरोबर चित्राच्या वरील बाजूस फारसी भाषेत काही ओळी लिहिलेल्या दिसून येतात. बारकाईने निरीक्षण केले असता त्या ओळी उलट्या आहेत, असे समजते. म्हणजेच दुसऱ्या कागदाचा छाप त्यावर उमटलेला असून, त्या ओळींचा संबंध हा कोण्या धार्मिक वर्णनाशी असल्याचे आणि त्यात कुठेही 'शंभूजी' या शब्दाचा उल्लेख नसल्याचे श्री. दाणी सर स्पष्ट करतात. या सर्व गोष्टी लक्षात घेता हे चित्र संभाजी महाराजांचे असावे, याविषयी शंका येते. आजही बऱ्याच ठिकाणी सदरील चित्र संभाजी महाराजांचे म्हणूनच अनेकजण वापरतात. पण जोवर या चित्राबाबत ठोस पुरावा मिळत नाही, तोवर सदरील चित्र संभाजी महाराजांचेच आहे, हे सांगणे धाडसाचे ठरेल.

संभाजी महाराजांच्या चित्रासोबतच थोरल्या शाहू छत्रपतींच्या दोन चित्रांचा धावता आढावा घेणे उचित ठरेल. सदरील दोन्ही चित्रांचे सद्यस्थान हे डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठातच असून ही चित्रे थोरल्या शाहू छत्रपतींच्या हयातीत तयार करण्यात आलीत. म्हणजेच ही चित्रे समकालीन आहेत हे आपण सांगू शकतो. पहिल्या चित्रात शाहू छत्रपती घोड्यावर बसलेले असून हुक्का ओढताना दाखवले आहेत (चित्र क्र. ३२). हुक्का ओढणे ही त्यांच्या आवडीची गोष्ट होती आणि विशेष म्हणजे उपलब्ध असणाऱ्या त्यांच्या जवळ जवळ सर्वच चित्रांत थोरल्या शाहू छत्रपतींना हुक्का पिताना दाखवले आहे. या चित्रात शाहू महाराज घोड्यावर बसलेले असून घोड्यासोबत एक सेवक हुक्क्याचे भांडे घेऊन उभे असल्याचे चित्रित केले आहे. चित्राचा आकार २८×३४.५ सेंमी एवढा असून त्याचा निर्मितीकाळ हा अठराव्या शतकाच्या सुरुवातीचा सांगितला जातो. चित्र मराठा शैलीत पूर्ण केलेले आहे. फिकट तपकिरी रंगाच्या सजवलेल्या घोड्यावर थोरले शाहू छत्रपती बसलेले आहेत. त्यांचे पांढरे केस मानेवरून खाली खांद्यावर रुळताना चित्रकाराने अत्यंत खुबीने दाखवले आहेत. त्यांचा चेहरा शांत असून, उजव्या हातात हुक्क्याची नळी, तर डाव्या हाताने घोड्याचा लगाम धरलेला आहे. पायांत हिरव्या रंगाची विजार असून अंगावर पांढऱ्या रंगाचे उपरणे घेतलेले दिसून येते. शाहू महाराजांच्या आजूबाजूला असलेल्या चारही सेवकांच्या पगड्या वेगवेगळ्या प्रकारच्या आहेत. महाराजांच्या मागील बाजूस चवरी धरलेले दोन सेवक असून एकाने महाराजांवर अब्दागीर धरल्याचे पाहायला मिळते. घोड्यासमोर चालणाऱ्या व्यक्तीने हातात एका पक्ष्याला (बहुदा गरुड) दोरीच्या सहाय्याने पकडलेले असून या ताफ्यासोबत दोन कुत्री चालताना दाखवली आहेत. विशेष बाब अशी, की या दोन्ही कुत्र्यांच्या गळ्यात सोन्याच्या माळा घातल्याचे पाहावयास मिळते. मात्र, भरतवर्षसम्राट थोरल्या शाहू छत्रपतींच्या अंगावर कुठेही, कसल्याही प्रकारचा दागिना आपल्याला दिसून येत नाही. यामागे एक प्रसिद्ध कथा आहे.

एकदा शाहू छत्रपतींचे एक सरदार त्यांची भेट घेण्यासाठी साताऱ्यास आले. ही बातमी ऐकून एका हुजऱ्याने ताबडतोब शाहू महाराजांसमोर पागोटे धरले. 'सरदार आमच्या भेटीस येत आहेत की पागोट्याच्या?' असा प्रश्न त्यांनी सेवकांना केला. थोरल्या शाहू छत्रपतींचा 'खंड्या' नावाचा एक लाडका कुत्रा होता. त्याला थोरल्या शाहू महाराजांनी पालखीचा मान दिला आणि पाच हजार रुपयांची वार्षिक नेमणूक करून दिलेली होती. आपल्या जवाहीरखान्यात असलेले सर्व सोने त्या कुत्र्याच्या अंगावर चढवून त्याला उंची पोषाख घालून सरदाराच्या भेटीसाठी दरबारात पाठवून दिले. या घटनेनंतर शाहू छत्रपतींनी कधीही भरजरी वस्त्रे घातली नाहीत, अलंकार ल्यायले नाहीत अथवा कधीही डोक्यावर पगडी धारण केली नाही.[१२२] अत्यंत विरक्त आणि साधेपणाचे जीवन त्यांनी स्वीकारले आणि आजन्म त्याचे पालन केले. सरसेनापती दाभाडे घराण्याच्या तळेगाव दाभाडे येथील राहत्या गढीत थोरल्या शाहू छत्रपतींचे आणि सरसेनापती खंडेराव दाभाडे यांचे एक भित्तिचित्र होते. त्या एकमेव चित्रात शाहू छत्रपतींच्या डोक्यावर पगडी घातल्याचे दाखवले आहे. वाड्याच्या ज्या भिंतीवर हे चित्र काढण्यात आले होते ती भिंत काही कारणाने नष्ट झाली, परंतु हे ऐतिहासिक चित्र सरसेनापती दाभाडे घराण्याचे विद्यमान वंशज श्री. सत्यशीलराजे दाभाडे यांनी जतन करून फार मोठे कार्य केले आहे. अन्यथा, आज शाहू छत्रपतींचे पगडीयुक्त दर्शन झाले नसते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर विद्यापीठात असणाऱ्या चित्राच्या मागील बाजूस चित्रकाराने सही केली आहे, 'राजा शाहू नकाष सदाशिव चितारी'. म्हणजेच, शाहू राजाचे हे चित्र सदाशिव चितारी याने काढले आहे.

थोरल्या शाहू छत्रपतींचे शिकारीच्या लवाजम्यासोबत असलेले चित्र हे सर्वात भव्य आणि श्रीमंत प्रकारातील आहे. चित्राची शैली मराठा असून त्याचा आकार तब्बल ४७×३०.५ सेंमी इतका आहे (चित्र क्र. ३३). या चित्रात जवळ जवळ ४२ व्यक्ती असून शिकारीच्या विविध प्रसंगांचे सुंदर चित्रण यातून आपल्याला घडते. चित्राच्या मध्यभागी थोरले शाहू छत्रपती मनसदीवर बसलेले दाखवले आहेत. खांद्यावर रुळणारे पांढरेशुभ्र केस, डाव्या हातात हुक्क्याची नळी आणि उजव्या हातात धरलेला पक्षी त्यांच्या राजबिंड्या रुपात अधिकच भर घालते. पायात लाल रंगाची आणि त्यावर पांढऱ्या ठिपक्यांची सजावट केलेली विजार घातली आहे. त्यांच्या मागे उभ्या असलेल्या सेवकाने उजव्या हातात चामर धरलेले असून डाव्या हातात एक छातीपर्यंत येणारी उंच तलवार धरली आहे. बहुतेक करून राजेरजवाडे यांच्या चित्रामध्ये त्यांची

---

*१२२ काही ठिकाणी शाहू महाराजांना भेटण्यास आलेल्या सरदाराचे नाव इंद्रोजी कदम असे सांगण्यात येते, तर काही ठिकाणी सुलतानजी निंबाळकर.*

शस्त्रे सेवकांनी घेतल्याचे पाहवयास मिळते. शाहू छत्रपतींच्या अगदी समोर एक मराठा योद्धा मोठ्या अदबीने बसलेला आहे. ही व्यक्ती म्हणजेच श्रीमंत नानासाहेब पेशवे. बाकी चित्रातील इतर व्यक्तींना ओळखणे कठीण. चित्राच्या खालील बाजूस काही लोक बंदुका घेऊन सावजाचा माग काढताना दिसत आहेत, तर काही लोक हत्तीवर बसून शिकारीचा अंदाज घेत आहेत. थोरल्या शाहू छत्रपतींची पालखी एका बाजूला ठेवलेली दिसून येते. पालखी उचलणारे भोई दमून गेल्यामुळे त्यांनी तिथेच हिरव्या गवतात बसकण मांडल्याचे आपल्याला दिसते. उजव्या कोपऱ्यात एक टांगेवाला आपल्यासोबत एका चित्त्याला घेऊन उभारलेला दिसून येतो. चित्त्याच्या गळ्यात बांधलेला पट्टा स्पष्ट दिसतो. त्या चित्त्याला खाण्यासाठी टांग्याला खालील बाजूस एक मेलेले हरीण बांधल्याचे सुद्धा दिसते. चित्राच्या वरच्या बाजूस अनेक मराठा सरदार घोड्यावर, हत्तीवर बसून शिकार शोधताना दाखवले आहेत. काहींच्या हातात तलवारी, तर काहींच्या हातात भाले-बंदुका दाखवल्या आहेत. या चित्रात दाखवलेल्या सर्व व्यक्तींच्या पगड्या विशेष लक्ष आकर्षित करण्यायोग्य असून त्यांच्यामध्ये प्रचंड वैविध्य आहे. तसेच, मराठ्यांचे निशाण असलेला भगवा ध्वज या चित्रातील अनेक व्यक्तींनी हातात धरल्याचे चित्रकाराने दाखवले आहे. चित्र समकालीन असल्यामुळे यात चित्रित केलेल्या गोष्टींना ऐतिहासिक महत्त्व प्राप्त होते.

थोरल्या शाहू छत्रपतींना प्राण्यांचा प्रचंड नाद. शेरीलिंब येथे तर महाराजांचे वैयक्तिक प्राणीसंग्रहालय होते. त्यांच्या प्रत्येक शिकारस्वारीमध्ये कुत्री हमखास असत. सन १७४२ सालच्या एका पत्रात शाहू महाराजांकडे असणाऱ्या कुत्र्यांची संख्या तब्बल १४ एवढी दिलेली आहे. बसंत, बंता, मिठू हे महाराजांचे कुतेवान. एवढेच काय, तर शाहू छत्रपतींना खूष करण्यासाठी पेशव्यांतर्फे सतत कोणत्या ना कोणत्या प्राण्याची भेट साताऱ्यास पाठवली जात असे. ८ ऑगस्ट १७४९ साली पेशव्यांनी लक्ष्मण शंकर नावाच्या सरदाराला भारतातील सर्वोत्तम कुत्र्यांच्या २४ जाती मागवून घ्यायला सांगितले होते. त्यांच्या लाडक्या कुत्र्याच्या, खंड्याच्या मृत्यूनंतर शाहू महाराजांनी संगम माहुली येथे त्याची समाधी बांधली आहे. असे हे थोरल्या शाहू महाराजांचे प्राणिप्रेम. चित्रातील वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट म्हणजे याही चित्रावर असणारी चित्रकाराची सही (क्र. ३४). म्हणजेच सदरचे चित्र प्रसिद्ध चित्रकार शिवराम चितारी' याने काढल्याचे समजते. अर्थात, या चित्रावरून तरी शिवरामची तुलना तत्कालीन सर्वोत्तम चित्रकारांशी का केली जात असावी, याची तुम्हाला कल्पना येईल.

थोरल्या शाहू छत्रपतींची उपलब्ध असणाऱ्या समकालीन चित्रांची संख्या जवळपास पंधराच्या घरात आहे. विशेष म्हणजे, या सगळ्यांची शैली 'मराठा' आहे. पण, या दोन चित्रांची रचनाच श्रीमंत धाटणीची आहे. नंतरच्या काळातसुद्धा अनेक सुंदर

चित्रांची निर्मिती झाली. या चित्रांमधून मराठा साम्राज्याचा सुवर्णकाळ आपल्याला अनुभवता येतो. थोरल्या शाहू छत्रपतींच्या शिकारस्वारीचे चित्र पाहून शिकारीची सिद्धता नेमकी कशा प्रकारे होत असे, याचा अंदाज आपण सहजपणे बांधू शकतो. छत्रपती शाहू शिकार करत असताना चित्त्यांचाही वापर करत, हेसुद्धा या चित्रातून आपल्याला समजते. गंगाराम तांबट आणि जेम्स वेल्स यांच्या कलाकारीमधून तयार झालेलं शनिवारवाड्यातील 'गणेश महाला'चे चित्र हे याचे आणखी एक उदाहरण. त्या काळातील अनेक मुत्सद्दी व्यक्ती पेशव्यांच्या बाजूने बसलेल्या दिसून येतात. मनसदीच्या मागील बाजूस दोन देवतांच्या मूर्ती दिसतात. त्यातील एक गणेशाची तर दुसरी चतुर्भुज विष्णूची. दरबाराच्या छतावर 'दशावतार'सारख्या पौराणिक कथांचे प्रसंग चितारून ठेवले होते, हे सुद्धा समजते. आज शनिवारवाड्याची केवळ तटबंदीच शिल्लक आहे. आतील सर्व वास्तू वाड्याला लागलेल्या आगीत भस्मसात झाल्या. या चित्रामुळे का होईना, शनिवारवाड्याची रचना कोणत्या धाटणीची, होती याचा आपण सहज अंदाज बंधू शकतो. त्यामुळे चित्रांचा तत्कालीन इतिहास जाणून घेण्यामध्ये फार मोठा हात आहे. चित्रामागे कलाकाराच्या पोटापाण्याच्या गणितासोबत घडून गेलेल्या घटनांना एकाच जागी स्तब्ध करून ठेवण्याची ताकद असते. मराठी साहित्यात या चित्रांचे महत्त्व विशद करताना अनेक तत्त्वज्ञांनी सुंदर विवेचन केले आहे. 'लीळाचरित्र' या ग्रंथात भित्तिचित्रांविषयी आलेले वर्णन रोचक स्वरूपातील आहे. दहाव्या सूत्रात 'चरित्रकार' म्हणतो,

चित्रीची स्त्री न पाहावी
चित्रोचि एथ भिंतींसी लिहावी
जडरूपडे तेंही न पहावे.

मराठीचे गोडवे गाणाऱ्या संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर महाराजांची अजोड कलाकृती म्हणजे 'ज्ञानेश्वरी'. सर्वसामान्यांची गीता. या महान ग्रंथात चित्रांविषयी ज्ञानेश्वर महाराज अकराव्या अध्यायात म्हणतात,

**किंबहुना त्रैलोक्यपती तुझिया एकेकाचि अवयवाचिये भिंती।**
**इथे चतुर्दशभुवने चित्राकृती। अंकुरली जाणो।।६०।।**
**आणि तेथिचि जे जे लोक ते चित्ररचना अनेक ।**
**ऐसे देखतसे अलौकिक गांभीर्य तुझे ।।६१।।**

त्याच्या पुढेच, पंधराव्या अध्यायात महाराज म्हणतात,

**का प्रतिभिंती चोखटे। समोरील चित्र उमटे।**
**तैसा अर्जुने आणि वैकुंठे। नांदतसे बोधु।।४४।।**

इसवी सन १६०२मध्ये रचलेली एक महत्त्वाची रचना म्हणजे कृष्णमुनीलिखित

'रुक्मिणी स्वयंवर'. या ग्रंथाच्या चाळिसाव्या अध्यायात,

**रतीरमण कळांची आसने कामचित्री**
**त्रिभुवन रचना ते दीसती चित्र ओळी**
**सुरनर उरगांची रूपडी नाममेळी**
**झळकतो ठीगडी ते भित्तिभंगी सुढाळी ।।४०।।**

असे चित्रांचे वर्णन वाचायला मिळते. मराठ्यांनी चित्रकलेद्वारे अठराव्या शतकातील महाराष्ट्र आपल्या नजरेसमोर उभा करण्याचे काम केले. लिंब व सातारा येथील मंदिरांमध्ये असणारी भित्तिचित्रे अतिशय आकर्षक आहेत. वाईच्या मोतीबाग येथील रास्तेवाड्यामधील चित्रे आजही सुस्थितीत आहेत. याच वाड्यात थोरल्या शाहू छत्रपतींचे तरुणपणीचे चित्र पाहायला मिळते. पुढे पुण्यश्लोक अहल्याबाई होळकर यांच्या काळात जीर्णोद्धारित झालेल्या अनेक मंदिरामध्ये रेखाटलेली चित्रे दिसून येतात. अहल्याबाईंच्या काळात वेरुळच्या कैलास लेणीला पूर्ण पांढरा रंग देण्यात आला होता आणि त्यावर नक्षीदार चित्रे रेखाटण्यात आली होती. आजही कैलास लेणीच्या भिंतीवर अवशेषरूपात दिसणारे चित्रकाम अहल्यादेवींच्याच काळात निर्माण झालेले आहे. असा हा मराठ्यांच्या चित्रकलेचा घेतलेला धावता आढावा. जर सी. शिवराममूर्ती, म. श्री. माटे, बी. के. आपटे, कमल गोखले, एस. बी. देशमुख यांसारख्या अभ्यासकांनी मराठा चित्रकलेवर संशोधनात्मक प्रकाश टाकला नसता, तर आजही ही चित्रशैली उपेक्षितच राहिली असती.



छत्रपती शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाने जगातील अनेक चित्रकारांना आकर्षित केले होते. आजही जागतिक दर्जाचे कित्येक चित्रकार आपल्या नजरेतून शिवरायांच्या व्यक्तिमत्त्वाचा वेध घेण्याचा प्रयत्न करतात. शिवरायांच्या चरित्रातील एखादा प्रसंग आपल्या कुंचल्यातून साकार व्हावा, हीच त्यांची इच्छा असते.

इतिहाससंशोधक वा. सी. बेंद्रे यांनी शिवरायांचे चित्र इसवी सन १९२०-२१ च्या आसपास प्रकाशित केले असले तरीही, त्याआधी बऱ्याच ठिकाणी शिवरायांच्या चित्रांना प्रसिद्धी मिळाली होती. फरक एवढाच, ही चित्रे भारतात पोहचायला बराच उशीर झाला. म्हणजे, महाराष्ट्रनायकाच्या चित्रांना जगभर प्रसिद्धी मिळाली होती, पण महाराष्ट्रात शिवाजी महाराजांचे चित्र सर्वसामान्यांपर्यंत फार उशिरा पोहोचले. आपले दुर्दैव म्हणावे की, परकीय लोकांचे शिवरायांविषयी असलेले प्रचंड आकर्षण म्हणून उत्साहित व्हावे, ही संभ्रमाची गोष्ट आहे. श्री. बेंद्रे यांच्याआधी कोणकोणत्या चित्रांना जगभर प्रसिद्धी मिळाली होती आणि बेद्रें यांच्या ऐतिहासिक कामगिरीनंतर महाराष्ट्रात घरोघरी पोहोचलेली शिवरायांची चित्रे कुणी तयार केली, याचा मागोवा या प्रकरणात आपण घेणार आहोत.

'फ्रांस्वा व्हॅलेंटीन' याच्या "Oud en Nieuw Oost Indien' या पुस्तकात इसवी सन १७२६ साली प्रकाशित झालेले शिवाजी महाराजांचे चित्र आणि त्यामागील इतिहास आपण दुसऱ्या प्रकरणात पाहिला आहे. शिवाजी महाराजांचे छापून प्रकाशित झालेले हे पहिले चित्र. म्हणजे, बरोबर ३०० वर्ष आधी शिवाजी महाराजांचे चित्र पहिल्यांदा कोणत्यातरी पुस्तकात प्रसिद्ध झाले, हा सुद्धा मराठा रियासतीचा इतिहासच म्हणावा लागेल. मागील तीनशे वर्षांपासून ही परंपरा अबाधितपणे सुरू आहे. यात

कोणताही खंड पडलेला नाही. यानंतर, सन १७८२ साली "Historical Fragments of Mogul Empire' हे रॉबर्ट ऑर्म याचे पुस्तक प्रकाशित झाले. सन १८०५ साली या पुस्तकाच्या प्रकाशित झालेल्या आवृत्तीमध्ये शिवाजी महाराजांचे चित्र पान क्रमांक ७ वर छापण्यात आले. अलीकडच्या काळात शिवचरित्रावर सखोल संशोधन करणारे इतिहासतपस्वी गजानन भास्कर मेहेंदळे सर यांनी सदरील चित्र व्हॅलेंटीनच्या पुस्तकात प्रकाशित झालेल्या चित्रावरून प्रेरणा घेऊन तयार करण्यात आल्याचे सांगितले. या दोन्ही चित्रांमध्ये बरेच साम्य आहे. यानंतर, दोन परकीय इतिहासकारांचा इथे उल्लेख करणे महत्त्वाचे वाटते. यातील पहिले नाव म्हणजे 'विलियम इर्विन'. निकोलाओ मनूचीच्या 'स्टोरिया दी मोगोर' या ग्रंथाचे इंग्रजीमध्ये भाषांतर करणारा हा अवलिया. याच इर्विनच्या हाती मनूचीने काढलेल्या चित्रांचा दस्ता कसा लागला, हे आपण दुसऱ्या प्रकरणात पाहिलेच आहे. इर्विनने सन १९१३ साली पुस्तक प्रकाशित करताना काही मोजकी चित्रे 'कृष्णधवल' रंगांमध्ये पुस्तकाच्या अखेरीस छापली. त्यामध्ये औरंगजेब, मिर्झा राजा जयसिंग, बहादूरखान कोकल्ताश, राजा जसवंतसिंग, शाहिस्तेखान, शाह आलम, दिलेरखान यांच्यासोबतच शिवाजी महाराजांचेही चित्र छापण्यात आले होते. सर्वार्थाने हे चित्र 'श्रीमंत' प्रकारातील आहे. दुसरी व्यक्ती म्हणजे विक्टर सरीज (Victor Surridge). भारताच्या मध्ययुगीन इतिहासावर विशेषतः मुघल आणि मराठ्यांच्या इतिहासकाळावर विक्टरने एक पुस्तक लिहिले, "Romance of Empire : India'. साडेतीनशे पानांचे हे पुस्तक लंडन शहरात सन १९०९ मध्ये प्रकाशित करण्यात आले. विक्टर हा एक उत्तम चित्रकार होता. या पुस्तकाची सुरुवात विक्टरने शिवाजी महाराजांच्या इतिहासापासून केली. सतरा प्रकरणांपैकी बारा प्रकरणे केवळ मराठ्यांच्या इतिहासाने भरलेली आहेत. त्याने काढलेल्या चित्रांना नंतर D. M. Cormic ने रंगवले. या पुस्तकात दोन चित्रे फार महत्त्वाची आहेत. पहिले म्हणजे इंग्रजांनी विजयदुर्ग किल्ल्यावर केलेला हल्ला. 'Storming of Geriah 1756' या मथळ्याखाली सदर चित्र छापण्यात आले. यामध्ये मराठे आणि इंग्रजांची भलीमोठी जहाजं रंगवली आहेत. समुद्री युद्धामुळे उडालेल्या धुराळ्यात विजयदुर्ग किल्ला पूर्ण झाकोळून गेला आहे. केवळ एक बुरुज त्या धुरातून डोकावतो आहे, असे ते चित्र आहे. दुसरे महत्त्वाचे चित्र पान क्र. २६ वर छापण्यात आले. शिवाजी महाराज आग्र्यास औरंगजेबाच्या भेटीस गेले असता जो काही थरारक, रोमांचक प्रसंग घडला त्याचे चित्रण अतिशय कुशलतेने या चित्रात करण्यात आले आहे (चित्र क्र. ३५). औरंगजेबाच्या सिंहासनासमोर असलेल्या पायऱ्यांवर उभा राहून, छाती बाहेर

काढून, बेदरकारपणे औरंगजेबाच्या डोळ्यात डोळे घालून उभे असलेले आवेशपूर्ण शिवाजी महाराज, असे या चित्राचे स्वरूप आहे. या चित्रात शिवाजी महाराजांची दाढी काहीशी अखूड दाखवली असून कल्ले कानाच्या खालच्या बाजूस वळवले आहेत. डोक्यावरील जिरेटोप काहीसा वेगळा आहे. शिवाजी महाराजांनी अंगावर इंग्रज घालतात त्याप्रमाणे लाल रंगाचा कोट घातला असल्याचे चित्रकाराने दाखवले आहे. अत्यंत आवेशपूर्ण वाटणारे हे चित्र आजही प्रसिद्ध आहे. "Sivaji openly defies the Great Moghul' असे या चित्राखाली लिहिले आहे.

व्हॅलेंटीन असो, ऑर्म असो, इर्विन असो, नाहीतर विक्टर, प्रत्येकाने आपल्या पुस्तकातून शिवाजी महाराजांचे तेजस्वी रूप प्रकाशित करण्याचा प्रयत्न केला होता. मराठ्यांच्या इतिहासाचे भीष्माचार्य वा. सी. बेंद्रे यांच्या थोर कार्यामुळे महाराष्ट्राला, महाराष्ट्रातील सर्वसामान्य लोकांना शिवाजी महाराजांचे अस्सल रूप पाहता आले. जगाला शिवाजी महाराजांच्या रुपाची झलक या चार लेखकांनी आधीच दाखवली होती, याची नोंद घेणे इथे महत्त्वाचे आहे. सन १९३५ साली शिवजयंतीचा मुहूर्त साधून साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांच्या मार्गदर्शनाखाली श्री. बेंद्रे यांनी शिवाजी महाराजांच्या चित्राचे लोकार्पण केले. इथूनच सुरु झाली शिवरायांच्या काही सुप्रसिद्ध चित्रांची गोष्ट. ज्याचे नायक होते औंधचे संस्थानिक भवानराव पंतप्रतिनिधी, 'दैवी' चित्रकार राजा रवी वर्मा, अतुलनीय कलाकार महादेव विश्वनाथ धुरंधर, रंगाचे जादूगार दीनानाथ दलाल, कलामहर्षी बाबूराव पेंटर, आबालाल रेहमान, कलायोगी कांबळे आणि कलानिर्मिती करणारे शेकडो हात.

'महादेव विश्वनाथ धुरंधर' हे विसाव्या शतकातील एक गाजलेले व्यक्तिमत्त्व. आपल्या ७७ वर्षांच्या तूफान कारकिर्दीमध्ये धुरंधरांनी पाच हजारांपेक्षा जास्त चित्रे काढली. पाच सुवर्ण आणि इतर असंख्य पदकांनी त्यांना सन्मानित करण्यात आले होते. 'सर जे. जे. कला महाविद्यालया'चे डायरेक्टर म्हणून नियुक्त होणारे धुरंधर हे पहिले भारतीय ठरले. तत्कालीन 'बॉम्बे आर्ट स्कूल'तर्फे सुवर्णपदक मिळवलेले पहिले भारतीय, हा विक्रमसुद्धा धुरंधरांच्या नावावर आहे. सन १९३४मध्ये इंग्रजांनी त्यांना 'राव बहादूर' ही पदवी देऊन सन्मानित केले होते. आजही 'बकिंगहम' राजवाडा आणि 'किंग्स्टन' संग्रहालयात धुरंधरांनी काढलेली दोन चित्रे पाहावयास मिळतात. भारतातील कित्येक राजेरजवाड्यांना, संस्थानिकांना धुरंधरांच्या कुंचल्यातून चित्र काढून घेण्याचा मोह आवरता आला नाही. 'आबालाल रेहमान हे आपले आदर्श आहेत, चित्रकलेतील प्रेरणा आहेत' असे धुरंधर सांगत. छत्रपती शिवरायांच्या

आयुष्यावर त्यांनी काढलेली चित्रे आजही 'प्रमाण' समजली जातात. त्यांना ही चित्रे काढण्यास प्रेरित केले औंध संस्थानाधिपती भवानराव ऊर्फ बाळासाहेब श्रीनिवास पंतप्रतिनिधी यांनी. आपल्या कलेस राजाश्रय देणाऱ्या या महान संस्थानिकाविषयी धुरंधर काय म्हणतात, ते त्यांच्याच शब्दात पाहू या,

'औंध संस्थानाधिपती श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव पंडित प्रतिनिधी राजेसाहेब यांनी आमचेकडून Water colourमध्ये श्री शिवछत्रपती यांचे चरित्रातील काही चित्रे तयार करवून घेतली. श्रीमंतांस आमचे कलेबद्दल इतके कौतुक आहे की, त्यांनी ही सर्व चित्रे आपले नित्य बसण्याचे दिवाणखान्यात नेहमी दृष्टीसमोर राहतील अशी लावून ठेवली आहेत. प्रत्येक चित्र तयार करून पाठवले की श्रीमंतांकडून गौरवपर अभिनंदन येत असे. ते पाहून मनास अत्यंत आनंद होऊन एकप्रकारे स्फूर्ती येत असे. ही सर्व चित्रे त्यांनी 'श्रीशिवाजी अल्बम'मध्ये छापून प्रसिद्ध केली. आणि त्याबद्दल प्रस्तावनेत सर्वोत्कृष्ट उद्गार लिहिले आहेत.'[१२३]

धुरंधरांना शिवचरित्राकडे आकर्षित करणारे औंध संस्थानाचे अधिपती भवानराव पंतप्रतिनिधी हे सर्वगुणसंपन्न शासनकर्ते होते. भारत देश स्वतंत्र होण्याआधी तब्बल दहा वर्षे त्यांनी आपल्या संस्थानात यशस्वीपणे लोकशाही राबवली. लोकांच्या अन्न-वस्त्र-निवारा या मूलभूत गरजांसोबतच प्रत्येकाला शिक्षण सक्तीचे केले. विशेष म्हणजे शिक्षण मोफत होते. साखर कारखाने, हातकागदांचे कारखाने उभारण्यास त्यांनी हातभार लावला. भारत देश स्वतंत्र झाल्यावर औंध संस्थान भारतात विलीन झाले, ते एक लोकशाही राज्य म्हणूनच. यांना विविध गोष्टींचा व्यासंग होता. व्यायामाविषयी त्यांचे लिखाण प्रसिद्ध तर आहेच. 'रामायण' या ग्रंथामध्ये त्यांनी साठपेक्षा जास्त चित्रे काढली. त्यांच्याकडे कलादृष्टी होती. कितीतरी मौल्यवान गोष्टींचा भवानरावांनी संग्रह केला होता. त्यांचे आत्मचरित्रसुद्धा लोकांना आकर्षित करण्यास यशस्वी ठरले. शिवछत्रपतींच्या आयुष्यावरील अनेक पुस्तकांचे त्यांनी लिखाण केले. त्या पुस्तकांतील कित्येक चित्रे स्वतः भवानरावांनी रेखाटली होती. शिवाजी महाराज हे आपले प्रेरणास्थान आहेत, श्रद्धास्थान आहेत असे ते म्हणत. याच प्रेरणेतून महाराष्ट्रातल्या काही प्रसिद्ध चित्रकारांकडून त्यांनी फार सुंदर चित्रे तयार करवून घेतली. एक उदाहरण घ्यायचे झाल्यास त्यांनी लिहिलेले दि. २९ ऑक्टोबर १९२९ रोजीचे एक पत्र पाहा,

---

१२३ कलामंदिरातील , पृ. १६६.

'रा. रा. एस. एल. हळदणकर, आर्टिस्ट

मु. मुंबई यांस

भवानराव श्रीनिवास पंडित, प्रतिनिधी संस्थान औंध, नमस्कार विनंती विशेष.

तुमचे तारीख २७-१०-१९२९ इ. चे पत्र दाखल जाहले. श्री शिवाजी आल्बमकरिता तुम्ही काढलेले चित्र तयार असल्याचे लिहिले, ते समजले. चित्र पुरे होणेस वेळ लागला त्याजबद्दल आमची मुळीच हरकत नाही.

तुम्ही गुदस्साली आर्ट एक्झिबिशनमध्ये अफझुलखान-शिवाजीचे चित्र ठेवले होते, ते विकत घेण्याची आमची इच्छा आहे. सदर चित्र विकत देत असाल तर दोन्ही चित्रे एकदमच इकडे पाठविणे सोपे होईल. सबब दोन्ही चित्रांस काय किंमत पडेल ते कळवावे.

तुमची चित्रे आम्हास फार आवडतात. तुम्ही काढलेली पाच चित्रे आमच्या संग्रही आहेत. तुमचा आमचा प्रत्यक्ष परिचय नाही. सबब तुम्ही चार दिवसांचे सवडीने इकडे येण्याचे करावे, म्हणजे आमच्या संग्रहातील चित्रे तुम्हास पाहणेस मिळून परिचयही होईल. आमचा मुक्काम ता. १४ नोव्हेंबरपर्यंत येथेच आहे. त्याचे आत येणार असल्यास केव्हा येणार याजबद्दल आगाऊ आठ दिवस कळवावे, म्हणजे रहिमतपूर स्टेशनवर वाहनाची सोय करणेत येईल. औंधास येणेस सदर्न मराठा रेल्वेचे रहिमतपूर स्टेशनवर उतरावे लागते. तेथून औंध १३ मैल आहे. उत्तर यावे.

कळावे, ही विनंती.

चीफ ऑफ औंध.

सन १८५७ मध्ये मुंबईत सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट ची स्थापना झाली. या विद्यालयाने अनेक चित्रकार या देशाला दिले. याच महाविद्यालयाशी निगडित महत्त्वाचे नाव म्हणजे सावळाराम लक्ष्मण ऊर्फ सा. ल. हळदणकर. जलरंग प्रकारात महारथ मिळवलेल्या हळदणकरांची चित्रे अतिशय प्रगल्भ होती. हळदणकरांना असे इफेक्ट कसे जमत असावेत, ह्या प्रश्नावर हजारो लोक चर्चा करत. पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या हस्ते त्यांना 'कलामहर्षी' या पदवीने सन्मानित करण्यात

आले. दिल्लीच्या संसद भवनात असलेले पंडित मदनमोहन मालवीय यांचे चित्र हळदणकरांनीच काढलेले आहे. तसेच, औंधच्या पंतप्रतिनिधींनी दिलेल्या आज्ञेवरून हळदणकरांनी काही ऐतिहासिक चित्रेसुद्धा रंगवली. त्यातील रोहीडेश्वराची शपथ, अफझलखान वध या चित्रांना विशेष महत्त्व आहे.

धुरंधरांनी काढलेल्या चित्रांमध्ये वेगळेपण आहे. या चित्रांमधून शिवकाळातील अनेक प्रसंग जिवंत झाल्याचा भास निर्माण होतो. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचे चित्रण करताना धुरंधरांनी शंभरएक व्यक्ती चित्रात रेखाटल्यात. विशेष गोष्ट अशी, की एवढ्या प्रचंड प्रमाणात व्यक्तींचे चित्रण एका ठिकाणी केल्यावर सुद्धा चित्र पाहताना कसलाही गोंधळ उडत नाही. यातील एकही व्यक्तीचा चेहरा सारखा नाही. कोणत्याही दोन स्त्रियांच्या अंगावर समान साड्या धुरंधरांनी चित्रित केल्या नाहीत. केवढी ही विविधता! शिवाजी महाराज वीरासनात बसलेले दाखवले असून, सिंहासनासमोर इंग्रज अधिकारी मोठ्या नम्रपणे अभिवादन करताना दाखवले आहे. मागच्या बाजूस गागाभट्ट शिवरायांवर राजछत्र धरून उभारले आहेत. इतके सुंदर चित्र रेखाटणाऱ्या धुरंधरांच्या कल्पनाशक्तीला सलाम! शिवचरित्रातील अजून एक रोमहर्षक प्रसंग म्हणजे शिवाजी महाराज आणि मिर्झा राजे जयसिंगची भेट. शिवाजी महाराज जयसिंगाला भेटायला जात आहेत, या प्रसंगाचे चित्रण धुरंधरांनी केले. घोड्यावर स्वार होऊन आपला उजवा हात उंचावून शिवाजी महाराज आपल्या सैनिकांना 'काळजी घ्या' असाच संदेश देत असल्याचा आभास धुरंधरांनी मोठ्या खुबीने उभा केला आहे. समोर उभे असलेले मावळे शिवाजी महाराजांना मुजरा घालण्यासाठी अर्धवट वाकले आहेत, तर कुणी शिवरायांचा जयजयकार करत आहे. धुरंधरांचे वैशिष्ट्य म्हणजे चित्रात दाखवण्यात आलेले सर्वसामान्य मावळे आणि त्यांची वेशभूषा, डोक्यावर धारण केलेली पगडी आणि चेहऱ्यांची ठेवण. प्रथमदर्शी हे चित्र समकालीनच वाटावे, एवढ्या कलात्मकतेने तयार करण्यात आले आहे. शाहिस्तेखानावर घातलेला धाडसी छापा, पावनखिंडीची लढाई, आग्र्याची भेट असे प्रसंग धुरंधरांनी आपल्या कुंचल्यातून रेखाटलेत. धुरंधरांची दोन चित्रे अतिसुंदर आहेत. त्यातील पहिले, आग्र्याच्या दरबारात घडलेला प्रसंग (चित्र क्र. ३६). शिवचरित्रात घडलेला एक स्फूर्तिदायक प्रसंग. ज्या एका घटनेमुळे सतराव्या शतकाचा इतिहास बदलला, त्याचे अतिशय सुंदर चित्र धुरंधर यांनी काढले आहे. औरंगजेबाच्या दरबारात शिवाजी महाराजांनी जो काही पुरुषार्थ दाखवला, त्याचे रसरशीत वर्णन हजारो लेखकांनी सविस्तरपणे करून ठेवले आहे. या चित्रात शिवाजी महाराजांच्या आजूबाजूस मुघल दरबारातील अनेक मान्यवर दाखवले

आहेत. संभाजी महाराज सुद्धा शिवाजी महाराजांच्या बाजूला चित्रित केले आहेत. शिवाजी महाराजांच्या गर्जनेने दरबारातील सर्वच सरदार आवक झाले आहेत. त्यांच्या चेहऱ्यावर भीती, आश्चर्य आणि अचंबित झालेली भावना मोठ्या खुबीने दाखवली आहे. शिवाजी महाराजांचे करारी रूप पाहून नक्कीच मन रोमांचित होते. धुरंधरांच्या सर्वश्रेष्ठ कलाकृतींमध्ये या चित्राचे स्थान सर्वोच्च आहे.

दुसरे चित्र शिवचरित्रातील एका रोमहर्षक प्रसंगावर तयार केले आहे. स्वामिनिष्ठेचा आदर्श घालून देणाऱ्या तानाजी मालुसरे यांचे चित्र (क्र. ३७). आपल्या मुलाच्या लग्नाचे निमंत्रण द्यायला गडावर आलेल्या तानाजी मालुसऱ्यांना शिवरायांच्या नव्या मोहिमेविषयी समजते. रायबाचे लग्न बाजूला ठेवून हा नरव्याघ्र कोंढाण्याची मोहीम स्वतःच्या शिरावर घेतो आणि प्राणांचे मोल देऊन कोंढाणा किल्ला स्वराज्यात सामील करतो, ही गोष्ट ऐकत महाराष्ट्रातील कित्येक पिढ्या मोठ्या झाल्यात. या घटनेची भुरळ धुरंधरांना पडली नसती, तरच नवल. या चित्रात एकूण पाच व्यक्ती आहेत. चित्राच्या मध्यभागी जिजाऊ माँसाहेब बसलेल्या असून त्यांना अतिशय सुंदरपणे रेखाटले आहे. जिजाऊ माँसाहेब नेमक्या कशा दिसत असाव्यात, हे समजण्यासाठी धुरंधरांनी काढलेले चित्र प्रमाण आहे. जिजाऊ मासाहेबांच्या उजव्या बाजूस शेलारमामा आणि रायबा अतिशय आदबीने उभे आहेत, तर तानाजी मालुसरे अतिशय उत्साहात कोंढाणा मोहिमेस जाण्याची प्रतिज्ञा घेत असल्याचे चित्रित केले आहे. शिवाजी महाराज काहीसे उदास झालेले दाखवले आहेत. आपल्या बालसवंगड्याच्या घरी एवढे मंगलकार्य आहे तरीही स्वराज्यकार्यासाठी सर्व सुखदुःख सोडून तो मोहिमेवर जाण्याचा हट्ट करतोय, त्याला कोणत्या भाषेत समजवावे, या विचारात उभे असलेले शिवाजी महाराज दाखवले आहेत. जिजाऊ मासाहेबांच्या पायाजवळ खडीसाखरेची वाटी, नारळ आणि पानसुपारीचा मानाचा विडा मांडलेला दिसतो. हे रायबाच्या लग्नाचे आमंत्रण होते. या चित्राचे अजून एक वैशिष्ट्य म्हणजे तानाजी मालुसरे आणि शिवाजी महाराजांचा चेहरा. दाढी, मिशा आणि नाकाची ठेवण अगदी सारखीच आहे. तानाजींचा मजबूत बांधा ठळकपणे नजरेत भरतो, तर पांढऱ्या दाढी-मिश्या शेलारमामांच्या उतरत्या वयाची जाणीव करून देतात. तसेच, शेलारमामांच्या डोक्यावरील मावळी पगडी विशेष आहे. याचबरोबर आणखी एका चित्राविषयी इथे सांगावेसे वाटते (चित्र क्र. ३८). आपल्या सैनिकांसमवेत घोड्यावर स्वार झालेले छत्रपती शिवरायांचे हे चित्र जोशपूर्ण आहे. हातात नागवी तलवार घेऊन अश्वारूढ शिवरायांच्या बाजूने काही सैनिक आपल्याला दिसून येतात. अशाच प्रकारची

वेशभूषा, डोक्यावरील पगडी, चेहऱ्यांची ठेवण 'ताराबाई राणीसाहेबांच्या' चित्रामध्ये सुद्धा आपल्याला पहावयास मिळते. या चित्रातील घोडा अतिशय रुबाबदार असून त्यास अनेक अलंकारांनी सजवले आहे. अगदी याचप्रकारचे चित्र राजा रवी वर्मांनी रेखाटले होते, जे आज सुप्रसिद्ध आहे. चौथीच्या पुस्तकापासून ते शासनदरबारी या चित्राचा प्रसार आपल्याला दिसून येतो. तत्कालीन काळात शिवाजी महाराज रेखाटायचे म्हटले, की टोकदार दाढी, लांब कल्ले, बाकदार नाक यांसोबतच तलवार आणि घोडा या दोन गोष्टी सुद्धा 'प्राथमिक घटक' मानण्यात येत असत. अशी ही धुरंधरांची जादू. 'संपूर्ण शिवकाळ' आपल्या कुंचल्यातून उभा करण्याची ताकद फार कमी जणांकडे होती. त्या सर्वांमध्ये धुरंधरांचे स्थान सर्वोच्च मानले पाहिजे.

आबालाल रेहमान यांचे शिवाजी महाराजांचे 'शिकारचित्र' प्रसिद्ध आहेच. अतिशय वेगळ्या पद्धतीने रेखाटलेले हे चित्र त्या प्रकारातील एकमेव म्हटले पाहिजे. बाबूराव पेंटर, चंद्रकात मांडरे यांची शिवरायांवरील चित्रे अजरामर आहेत. दीनानाथ दलाल यांच्या चित्रांनी तर बाबासाहेब पुरंदरे यांचे 'राजा शिवछत्रपती' जिवंत झाले. आजही कित्येक पुस्तकप्रेमी, वस्तूसंग्राहक आणि कलाप्रेमी दलालांनी रंगवलेले पुस्तक पडेल त्या भावाने विकत घेतात. 'दीनानाथ दलाल' या नावावर प्रेम करणारे लोक आजही आहेत. असाच एक अवलिया कलाकार म्हणजे ग. ना. जाधव. जाधवांना त्याकाळी 'मुखपृष्ठ चित्रकार' म्हणून ओळखत. जाधवांनी काढलेले शिवाजी महाराजांचे चित्र थेट 'राष्ट्रपती भवन'च्या संग्रहात जमा झाले आहे. त्याचीसुद्धा कहाणी विलक्षण. मार्च १९५७ मध्ये भारतीय कृषिसंघाचे पहिले अखिल भारतीय अधिवेशन दिल्लीत भरले होते. महाराष्ट्रातील कृषिउद्योगाशी निगडित 'किर्लोस्कर' कंपनी या अधिवेशनासाठी निमंत्रित होती. शेतीशी निगडित असणाऱ्या गोष्टींचे एक प्रदर्शनसुद्धा तिथे भरणार होते. तत्कालीन राष्ट्रपती राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते या प्रदर्शनाचे उद्‌घाटन होणार होते तर पंडित जवाहरलाल नेहरू प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित राहणार होते. आपल्या 'किर्लोस्कर', 'स्त्री', 'मनोहर' या तीन मासिकांची, जाहिरात व्हावी, या उद्देशाने काही मोजके लेखक, संपादक आणि चित्रकार मंडळी किर्लोस्करांच्या समूहासोबत उपस्थित राहणार होती. यातील काही मोजक्या आणि आकर्षक मुखपृष्ठांची मूळ चित्रे प्रदर्शनात लावायची, असे एकमताने ठरले. ही चित्रे प्रदर्शनाचे प्रमुख आकर्षण असणार, हा सर्वांनाच विश्वास वाटत होता. प्रदर्शनाच्या उद्‌घाटनाचा दिवस उजडला तरी चित्रांची पेटी अजून पोहचली नव्हती. सर्वच नियोजन फिस्कटले. सर्वांचा हिरमोड झाला. त्यात अचानक वादळवाऱ्यासह तूफान पाऊसही सुरू झाला. कार्यक्रमाचा

विचका झाला. या सर्व धावपळीत एक गोष्ट मात्र चांगली झाली. नशिबाने चित्रांची पेटी पोहचली नव्हती, नाहीतर जलरंगात तयार झालेल्या त्या अद्भुत कलाकृती नष्ट झाल्या असत्या. दुसऱ्या दिवशी राष्ट्रपतींकडून किर्लोस्करांच्या समूहातील काही निवडक व्यक्तींना राष्ट्रपती भवनात येण्यासाठी निमंत्रण आले. तोवर चित्रांची पेटी येऊन पोहोचली होती. याप्रसंगी पंडित जवाहरलाल नेहरू उपस्थित होते. नेहरूंना त्यांचेच एक चित्र भेट देण्यात आले, तर राजेंद्रप्रसादांना महाराष्ट्रातल्या इतिहासातील एक अत्यंत प्रेरणादायी प्रसंग 'कल्याणच्या सुभेदाराची सून' हे चित्र भेट देण्यात आले. ही दोन्ही चित्रे काढणारा महान कलाकर म्हणजे ग. ना. जाधव हे होत. किर्लोस्करांच्या मासिकांचे हे एकमेव चित्रकार, कलामहर्षी बाबूराव पेंटर हे त्यांचे गुरु. बाबूरावांचे त्यांच्या आयुष्यातील अखेरचे चित्र काढणारे चित्रकार म्हणूनही जाधव प्रसिद्ध आहेत. आजही ते चित्र राष्ट्रपती भवनात मोठ्या दिमाखाने विराजमान आहे.[१२४]

कोल्हापूरच्या मातीतून उदयास आलेले अजून एक महान कलावंत म्हणजे कलायोगी जी. कांबळे. अनेक कलावंतांनी 'पोस्टर सम्राट' असा त्यांचा उल्लेख केला आहे. भारताच्या चित्रपटक्षेत्राला ज्या निर्मितीने कलाटणी दिली, त्या 'मुघल-ए-आझम' चित्रपटासाठी सर्वोत्कृष्ट पोस्टर जी. कांबळे यांनी तयार केले होते. असे म्हणतात, की राणी एलिझाबेथ ज्या मार्गाने जात होती, त्या मार्गावर कांबळे यांनी काढलेले एक पोस्टर लावले होते. आपली मिरवणूक थांबवून राणी एलिझाबेथने बराच काळ ते चित्र न्याहळले होते. त्यांचे खरे नाव 'गोविंद कांबळे'. या नावाने ते कोल्हापुरात प्रसिद्ध नव्हते, पण 'जी. कांबळे' कुठे राहतात, असे विचारल्यावर लहान मुलगाही त्यांचे घर दाखवीत असे. कमी-जास्त प्रमाणात साऱ्या महाराष्ट्रात हीच परिस्थिती होती. या कलायोग्याने आपल्या आयुष्यात एक प्रचंड मोठे कार्य केले आहे. तब्बल पाच वर्षे अभ्यास करून कांबळे यांनी शिवाजी महाराजांचे एक अत्युत्कृष्ट चित्र तयार केले. सन १९७० वर्षी तयार झालेले हे चित्र महाराष्ट्र शासनाने शिवाजी महाराजांचे 'अधिकृत चित्र' म्हणून स्वीकारले. या चित्राच्या बदल्यात कांबळे यांनी एकही रुपया घेतला नाही. खऱ्या अर्थाने ते कलायोगी होते. आजही त्यांनी काढलेले चित्र आपल्याला शासनदरबारी दिसते. शिवाजी महाराजांची चित्रे रेखाटण्याच्या परंपरेत कांबळ्यांचे फार मोठे योगदान मानावे लागेल. राजा रवी वर्मा, बाबूराव पेंटर, दीनानाथ दलाल, आबालाल रेहमान, धुरंधर, जी. कांबळे, हळदणकर, जाधव आणि अशा कित्येक

---

*१२४ बॉम्बे स्कूल.*

कलाकारांनी छत्रपती शिवाजी महाराजांना घरोघरी पोहचवले. शिवाजी महाराज महाराष्ट्राला माहीत नव्हते अशातली गोष्ट नाही, पण त्यांच्या तेजस्वी रूपाचे विविध पैलू पुन्हा एकदा जिवंत करणाऱ्या या 'विश्वकर्म्यांना' या निमित्ताने जरी आठवले, तरी त्यांच्या उत्तुंग कार्यास दिलेली ती मानवंदनाच असेल. त्यांनी शिवचरित्राची पारायणे केली, संशोधन केले, कित्येक दिवस, महिने, वर्षे खर्ची घातली तेव्हा कुठे या अजोड कलाविष्काराची निर्मिती झाली.

दुर्गमहर्षी प्रमोद मांडे सर नेहमी म्हणायचे, 'ज्यांनी ज्यांनी शिवछत्रपतींना आदर्श मानले, त्या प्रत्येकाने त्यागाची परिसीमा गाठली.' या आदर्शवादाचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे हे सर्व कलाकार.

औंध संस्थानाचे अधिपती असणाऱ्या भवानराव पंत प्रतिनिधींचे शिवप्रेम आपण पाहिलेच आहे. आपल्या धन्याप्रति असलेला निष्ठेचा वारसा पुढे त्यांचे पुत्र 'आप्पासाहेब पंत प्रतिनिधी' यांनी समर्थपणे चालवला. शिवाजी महाराजांच्या आयुष्यावर आधारित चित्रमय शिवचरित्राचे धनुष्य भवानरावांनी लीलया पेलले. या कामी अनेक एतद्देशीय चित्रकारांची त्यांना मदत झाली. स्वतः भवानराव उत्कृष्ट चित्रकार होते, पण त्यांच्या पुत्राने, आप्पासाहेबांनी सातासमुद्रापार असलेल्या एका कलाकाराला शिवरायांची चित्रे काढण्याची जबाबदारी दिली. आज ती चित्रे 'जगातील दुर्मिळ चित्रांपैकी एक' समजली जातात.

'ऑक्सफर्ड विद्यापीठा'त शिक्षण घेत असताना आप्पासाहेबांची एका चित्रकाराशी ओळख झाली. 'Camden road' वर असलेल्या त्याच्या स्टुडिओमध्ये आप्पासाहेब, तो चित्रकार आणि आप्पासाहेबांचा एक मित्र अशा तिघांची बैठक जमली. त्या चित्रकाराचे नाव 'इर्विन बॉसनी' (Ervin Bossanyi). आप्पासाहेबांनी इर्विनला शिवरायांच्या आयुष्यातील काही महत्त्वाच्या प्रसंगांवर नऊ चित्रे बनवण्याचे काम दिले. पण हे काम जरा वेगळे होते. ही सर्व चित्रे काढायची होती ३×३ मीटरच्या ग्लासवर. औंध येथे नव्याने तयार होत असलेल्या 'न्यू शिवाजी हॉल' मध्ये ही वैशिष्ट्यपूर्ण काच बसवण्यात येणार होती. यासाठी आप्पासाहेबांनी इर्विनला शिवरायांच्या आयुष्यावर आधारित काही पुस्तके भेट दिली, ज्यामध्ये त्यांच्या वडिलांनी, भवानराव पंत प्रतिनिधींनी लिहिलेले शिवचरित्रसुद्धा होते. तसेच, भवानरावांच्या संग्रही असणाऱ्या राजा रवी वर्मा, धुरंधर, जामिनी रॉय, नंदलाल बोस, अरबिंदनाथ टागोर, हळदणकर तसेच हेन्री मूर यांनी काढलेल्या शिवरायांच्या काही अप्रतिम कलाकृतींविषयी माहिती पुरवली. इर्विन हे प्रचंड मोठे आणि ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचे काम करायला तयार

झाला, पण त्याच्या जुन्या स्टुडिओत हे काम होणे शक्य नव्हते. कारण स्टुडिओ लहान होता. इर्विनने 22 Field End Road, Eastcote, Middlesex या भागात भाडेतत्त्वावर नवीन घर घेतले. घराच्या मागील बाजूस असलेल्या गार्डनमध्ये त्याने नवीन वर्कशॉप सुरू केले. त्याच्या वर्कशॉपला दोन मोठ्या खिडक्या होत्या. त्यांमधून येणाऱ्या प्रकाशात त्याने महागड्या काचांवर काम सुरू केले.

काचांचा रंग, त्याच्या सौंदर्याला बाधा न येऊ देता केलेले नक्षीकाम आणि त्यास पाण्यापासून धोका निर्माण होणार नाही, या गोष्टीकडे जातीने लक्ष देत इर्विन कामाला लागला. इतर कोणत्याही गोष्टीकडे लक्ष न देता दिवस-रात्र तो शिवाजी महाराजांच्या चित्राचे काम करत असे. अशा रीतीने सन १९४५-४६पर्यंत इर्विनने आपल्यावर सोपवलेली जबाबदारी पूर्ण केली. पण तोपर्यंत भारतात परिस्थिती बदलली होती. देश स्वतंत्र होण्याच्या मार्गावर होता आणि औंध संस्थान 'बॉम्बे स्टेट'चा एक भाग म्हणून भारतात विलीन होणार होते. पूर्वी संस्थानात असायची तशी आर्थिक स्वायत्तता आता राहिली नव्हती. या सर्व कामाचा एकूण खर्च होणार होता तीन लाख पन्नास हजार रुपये. १९४७मध्ये साडेतीन लाख रुपये म्हणजे केवढी मोठी रक्कम! सुरुवातीला आप्पासाहेबांनी काही पैसे दिले होते, पण अजून फार मोठी रक्कम येणे बाकी होती. काम संपल्यावर उर्वरित रक्कम देण्याचे आप्पासाहेब आणि इर्विनच्या संमतीने ठरले होते. इकडे इर्विनने एवढ्या मोठ्या कामाच्या जीवावर व्याजाने रक्कम उचलली होती. घरा-दारावर, नवीन उभ्या केलेल्या स्टुडिओवर कर्ज होते. इर्विन आर्थिक दिवाळखोरीच्या फेऱ्यात अडकला. यात चूक ना आप्पासाहेबांची होती, ना इर्विनची. परिस्थितीच पूर्णपणे पालटली होती. आप्पासाहेब एवढी मोठी रक्कम एकहाती देऊ शकत नव्हते. रक्कम काय थोडी होती?

पुढे आफ्रिकेत आणि लंडनमध्ये काही वर्षे उच्चायुक्त म्हणून आप्पासाहेबांनी काम पाहिले. त्यांचे आणि नेहरूंचे घनिष्ठ संबंध होते. महाराष्ट्राचे तत्कालीन मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण लंडन येथे आले असता आप्पासाहेब तिथे त्यांना भेटले. Eastcote या ठिकाणी असलेल्या इर्विनच्या वर्कशॉपला त्यांनी भेट दिली. त्या चित्रांचे महत्त्व सांगितले. ही कहाणी ऐकून यशवंतराव प्रचंड प्रभावित झाले. आप्पासाहेबांनी ही सर्व काचेवरील चित्रे राजधानी रायगडावर एक विशेष संग्रहालय तयार करून सर्वसामान्य लोकांना पाहण्यासाठी उपलब्ध करावी, अशी योजना मांडली. यशवंतरावांकडून या प्रोजेक्टला संमती मिळाली. पुढे चर्चावर चर्चा झडत गेल्या, पण कालांतराने हा विषय मागे पडला. यशवंतराव चव्हाण, आप्पासाहेब पंतप्रतिनिधी आणि इर्विन या

तिघांच्या मृत्यूनंतर मात्र अशी चित्रे अस्तित्वात आहेत, याची कुणाला सुतराम कल्पना नव्हती. इर्विनने तीन चित्रे तयार केली (त्यापैकी एक चित्र क्र. ३९). बाकी सहा काचांवर पैशांअभावी त्याला काम करता आले नाही. पण, त्यासाठी इर्विनने कागद आणि लाकडावर सहा चित्रांचा कच्चा आराखडा तयार करून ठेवला होता. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलाने तीन काचांवर तयार केलेले हे चित्र 'विक्टोरिया-अल्बर्ट म्युजियम'ला भेट स्वरुपात सुपूर्द केले.

आजही ही चित्रे लंडनमध्ये आहेत. महाराष्ट्रातल्या भूमीत जन्मलेल्या एका थोर शिवप्रेमीचे स्वप्न अजूनही अपूर्ण आहे. कित्येक दशकांपासून ती तीन चित्रे मायभूमीत येण्याच्या प्रतिक्षेत आहेत. ज्या दिवशी ती चित्रे महाराष्ट्रात येतील, औंध किंवा रायगडावर तयार करण्यात आलेल्या खास दालनात विराजमान होतील, तो दिवस सुगीचा असेल. स्व. आप्पासाहेब पंत प्रतिनिधी आणि यशवंतराव चव्हाण यांच्या कार्याला वाहिलेली ही सर्वात मोठी श्रद्धांजली ठरेल हे निश्चित. अशी ही एक दुर्दैवी पण विलक्षण कहाणी शिवछत्रपतींच्या अद्भुत चित्रनिर्मितीची.



# संदर्भ

* AWLASKAR, S.V., 2008, *रायगडाची जीवनकथा,* महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.
* BAHULKAR, SUHAS, २०१५, *बॉम्बे स्कूल आठवणीतले, अनुभवलेले,* ग्रंथाली प्रकाशन, मुंबई.
* Bendre, V. S., 2013, *श्री छत्रपती शिवाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र,* पार्श्व पब्लिकेशन्स, कोल्हापूर.
* Brinen, Rebecca Parker, 2017, Nicolaes Witsen's Collection, his influence and the primary of image, *The primacy of the image* in *Northern European art 1400-1700*, pp. 222-38.
* Bruijn, J. R. et. -l., *Dutch--siatic shipping in the 17th and 18th centuries,* The Hog.
* Chaubal, J. S., 1974b *असे होते मोगल,* महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, पुणे.
* Coolhaas, W.Ph., 1971, *Generale missieven Van Gouverneurs-Generaal en Raden aan Heren XVII der verenigde Oostindische Compagnie 1657-85, volume 4,* The Hague.
* Cousens, Henry, 1916, *Bijapur It's -rchitectural remains,* Delhi.
* Desai, Vishakha, 1985, *Life at court : Art for India's Rulers,* 16th-19th centuries, Catalogue of Boston museum of Fine arts, US-.
* Deshmukh, S. B., 1992, *Maratha Painting (part 1),* Registrar, Dr. Babasaheb Ambedkar Marathwada University.
* Deshmukh, S. B., 1984, *सरदार नाईक बावणे संग्रहातील रंगचित्रे,* History Department, Dr. Babasaheb Ambedkar Marathwada University.
* Dhere, R. C., 2014, *आज्ञापत्र,* पद्मगंधा प्रकाशन, पुणे.
* Divekar, S.M., 1998, *शिवभारत,* शब्दवेध प्रकाशन.
* Doshi, Saryu, 1992, *Shivaji and the Facets of Maratha Culture,* Marg publications, Bombay.

* Doshi, Saryu, 1996, *The art of Chhatrapatis and Peshwas,* Marg publications, Bombay.
* Falk, T. Archer M., 1981, *Indian miniature paintings in the India office Library,* London.
* Goetz, Hermann, 1934, Een belongrijk Indisch miniaturen album in het Rijksprentenbkabinet te Amsterdam, *Maandblad voor Beeldende kunsten, volume 11,* pp. 310-14.
* Ghare, Deepak, 2018, *कलामंदिरातील एकेचाळीस वर्षे* Majestic पब्लिशिंग हाऊस, मुंबई.
* Gommans, Jos et. Al., 2001, Dutch sources on South Asia, C. 1600-1825, *Bibliography and Archival Guide to the National archives at The Hague (The Netherlands), volume 1,* Delhi.
* Gommans, J., 2002, *Mughal Warfare : Indian Frontiers and High roads to Empire 1500-1700,* London.
* Havart, Daniel, 1693, *Op-en ondergang Van Coromandel,* Amsterdam.
* Heeres, J. E., 1907-55, Corpus diplomaticum Neerlando-Indica, *Bijdragen tot de taal-land-en, volkenkunde van Nederlandsch-Indie,* The Hague.
* Jagtap, Neelambari, *Indian Miniatures,* History Department, Dr. Babasaheb Ambedkar Marathwada University, Aurangabad.
* Joshi, S. N., 1960, *कृष्णाजी अनंत सभासद* विरचित *छत्रपती श्री शिवाजीराजे यांची बखर,* चित्रशाळा प्रकाशन, पुणे.
* Joshi, S. N., 1930, *शिवकालीन पत्रसार संग्रह (खंड १ व २),* भारत इतिहास संशोधक मंडळ मा. क्र. ४४, पुणे.
* Khare, G.H. *शिवाजी महाराज व डच वकील यांची भेट,* भारत इतिहास संशोधन मंडळ मा. क्र. ४७, पुणे.Kramrisch, Stella, 1937, *A Survey of Paintings in the Deccan,* London.
* Kruijtzer, Gijs, 2010, Pomp Before Disgrace : a Dutchman commissions two Golconda miniatures on the eve of the Mughal conquest, *Journal of The David Collection, volume 3,* pp. 160-82.
* Kruijtzer, Gijs, 2014, The fighting on the wall : Animal

symbolism of the Deccan in a Eurasian perspective, *The visual world of the Muslim Deccan,* London.

* Kruijtzer, Gijs, 2009, *Xenophobia in Seventeenth-century India, Leiden university press,* Leiden.
* Laurijnessesns, K., 2001, *'Dit Vuijle Nest gesuijvert' het correctief endiplomatiek optreden van de commisie van Reede tot Drakestein in Bengalen en Noord-Coromandel,* 1686-1691, London.
* Losty, J. P., 1996, Deccani painting styles, Dictionary of *Art, volume 15,* London.
* Manucci, Niccolao, (ed. By William Irvine), 1907, *Storia do Mogor or Mogul India (1653-1708),* London.
* Marion Peters and Ferry Andre de la Porte, 2002, In steen geschreven : leven en sterven van VOC-dienaren op de kust van coromandel in India, *Uitgeverij Bas Lubberhuizen, Amsterdam,* pp. 280.
* Mulk Raj Anand, 1977, *Persian Paintings,* Arnold Heinemann Publishers.
* Pagdi, Setu Madhavrao, 2011, *श्री छत्रपती नि त्यांची प्रभावळ,* परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई.
* Pagdi, Setu Madhavrao, 2011, *श्री छत्रपती नि त्यांची प्रभावळ,* परचुरे प्रकाशन, मुंबई
* Pagdi, Setu Madhavrao, 2019, *छत्रपती शिवाजी,* कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे
* Pagdi, Setu Madhavrao, 1963, *छत्रपती शिवाजी,* कॉन्टेटिनेटल प्रकाशन, पुणे
* Pagdi, Setu Madhavrao, 1963, *मोगल आणि मराठे (तारीखे दिल्कुशा),* ठोकळ प्रकाशन, पुणे.
* Pawar, Jaysing Rao, 2011, *छत्रपती शिवाजी महाराज स्मृतिग्रंथ,* महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.
* Pawar, Rohit, २०२१, *परकियांच्या नजरेतून छत्रपती शिवाजी महाराज (अनु.),* पार्श्व पब्लिकेशन्स, कोल्हापूर.

Ramdas, Ravindranath Vaman, 1966, Herbert de Jager : A Dutch envoy to Shivaji (1677-78 AD), *proceedings of Indian History Congress, Volume 28,* pp. 52-53.

* Sarkar, Jadunath, 1925, *Anecdotes of Aurangzib,* M C Sarkar & Sons, Calcutta.
* Sawant, Indrajit, 2015, *शोध भवानी तलवारीचा,* कोल्हापूर.
* Scheurleer, P. L. & Kruijtzer, Gijs, 2005, Camping with the Mughal Emperor : A Golconda artist portrays a Dutch ambassador in 1689, *Arts of Asia, Vol. 35-3,* pp. 48-60.
* Scheurleer, P. L., 2016, The Indian miniature in the Canter Visscher Album, *The Rijksmuseum bulletin, volume 64(3),* pp. 194-245.
* Scheurleer, P. L., 1996, Het Witsenalbum : Zeventiende-eeuwse Indiase portretten op bestelling, *Bulletin van het Rijksmuseum, Jaarg. 44, Nr. 3,* pp. 167-254.
* Sivaramamurti, C., 2002, *Indian Painting,* National Book Trust, India.
* Stapel, F. W., 1931, Nog eengie gegevens over Herbert de Jager, *Bijdragen tot de taal Land-en Volkenkunde van Nederlandsch Indie, volume 88,* pp. 314-16.
* Sullivan, Edward, 1866, Conquerors, *Warriors &Statesmen in India,* London.
* Topsfield, Andrew & Milo Cleveland Beach, 1991, *Indian paintings and drawings from collection of Howard Hodgkin,* London.
* Vogel, J.Ph., 1937, *Journal van J. J. Ketelaar's hofreis naar den Groot Mogol te Lahore 1711-1713,* The Hague.
* Yule, Henry & Burnell, A. C., 1904, *Hobson-Jobson : the Anglo-Indian dictionary,* London.
* Zebrowski, Mark, 1983, *Deccani Painting,* Sotheby Publications, London.

***



सुंदरता गुरुता प्रभुता भनि भूपन होती है आदरजामे ।
सज्जनता औ दयालुता दीनता कोमलता झलके परजा में ।
दान कुपानहु को करिबो करिबो अभे दानन को बर जामे ।
साहन सौं रन टेक विवेक इते गुण एक सिवा सरजा में ।।